श्रीहरी:

श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य श्रीशंकराचार्य
विरचित

# विवेक-चूडामणि.

पदच्छेद, पदान्वय, पदार्थ सरळ, मराठी भाषांतर,
तात्पर्य, पाठभेद व निर्णायक टीपा-यांसहित

हा ग्रंथ

उरण-कुलाबा येथें विरक्ताश्रमांत श्रीमत्परमहंस-
**श्रीजीवन्मुक्त स्वामी यांच्या कृपाछत्रा खालीं**
**श्रीयुत-रा. ल. घरत**
यांनीं तयार केला.

तो

बेळगाव येथें
**आबाजी रामचंद्र सावंत**
यांनीं

आपल्या " श्रीराम तत्त्वप्रकाश " छापखान्यांत
छापून प्रसिद्ध केला.

शके १८३५ सन १९१४ इसवी.

किं १॥ रुपया.

# अर्पणपत्रिका.

शुद्धानंद स्वरूपी परमात्म्याचे ठाईं ज्यांची
अचल भक्ती; विकाररहित अशा अविनाशी
आत्म्याला ज्ञानदृष्टीनें पाहून आत्मसाक्षा-
त्कार अनुभविण्याची ज्यांची प्रबल
लालसा; जें केवळ अद्वैतसत्य, त्या
निर्विकल्प पूर्ण ब्रह्माच्या ठायीं लय
पावलेल्या जीवन्मुक्त सद्गुरुंच्या
चरणीं ज्यांचीं नम्र भावना
अशा विमल चरित

## संत सज्जनानां

हा बहुमोल प्रासादिक ग्रंथ

अर्पण असो.

फोडिलें भांडार । धन्याचा हा माल ।
मी तों हा हमाल । भार वाही ॥

प्रकाशक.

# प्रस्तावना.



पाश्चात्य शिक्षणामुळें भौतिक शास्त्रें व भौतिक ज्ञान ह्यांलाच महत्व देऊन केवळ त्या शास्त्रांच्या अध्ययनाकडे व त्या ज्ञानाच्या संपादनाकडेच लक्ष्य देण्याचा जो गेल्या शतकांतील भरतखंडांतल्या आंग्लविद्या विभूषित विद्वानांचा एकच ठाम ग्रह होऊन गेला होता त्याचा काल आतां जाऊन प्राचीन आर्यधर्मतत्त्वांत व त्या तत्त्वांच्या विवेचनपद्धतींत बरेंच तथ्य आहे असें त्यांपैकीं पुष्कळांस वाटूं लागलें आहे. ही गोष्ट विशेष समाधान मानण्यासारखी आहे. वेदशास्त्रें व पुराणें ह्मणजे मतलबी ब्राह्मणांनीं आपल्या चरितार्थाचीं कांहींतरी साधनें भोळ्यालोकांस फसविण्याकरितां करून ठेविलीं आहेत; त्यांस धर्मशास्त्रें ह्मणतां येणार नाहीं; पूर्वीचे विद्वान ह्मणजे कांहींतरी शुष्क शब्दवाद करणारे होते आणि त्यांच्या चुका काढणारे खरे विद्वान काय-ते हल्लींच्या काळांतच निर्माण झाले आहेत! असें ह्मणणारे एकदेशीय विचार करणारे लोक हल्लींच्या काळांत नाहींत असें नाहीं. तथापि अलिकडे कांहीं वर्षांत जी विशेष धर्मजागृति झाली आहे ती खरोखरच अभिनंदनीय आहे. धर्मतत्त्वें अमुक कालांत अमुक तऱ्हेचीं असावींत व कालांतरीं परिस्थितीला अनुरूप असा त्यांचा विपर्यासच केला पाहिजे असें ह्मणणें यथार्थ विचारी पुरुषास कधींच संमत होणार नाहीं. पूर्वीच्या ऋषींनीं आपल्या सोईप्रमाणें व बुद्धीप्रमाणें धर्मतत्त्वांचा विचार केला तसा हल्लींच्या विद्वानांनीं आपल्या सवडी प्रमाणें व बुध्यनुरूप विचार कां करूं नये असें ह्मणणें तर अगदींच असंबद्ध आहे. धर्म सोईकरितां करून ठेविलेला नसतो व तो बुद्धीचेंहि कार्य नाहीं. बुद्धिकौशल्य हा धर्म नव्हे तर ज्याच्या सत्तेनें बुद्धि अनेक कुशल व्यवहार करण्यास समर्थ होते, त्या आत्मस्वरूपाच्या धारणेस धर्म ह्मटलें आहे. जीव कोण, ईश्वर कोण, जीवेश्वरांचा संबंध काय इत्यादि विचारांच्या योगानें आत्मस्वरूपाचा निश्चय करून. आत्मनिष्ठ असणें हाच मुख्य धर्म होय, व तो सर्वकाळ एकच असणार. आत्मसांनिध्यानेंच देहेंद्रियमनःप्राणादिकांस जीवन प्राप्त झालें आहे, ह्मणून त्या सर्वांचें धारण करणारा जो आत्मा त्याच्या ठिकाणीं निष्ठा असणें असाच धारणाद्धर्मः ह्या व्युत्पत्तिदृष्टीनें धर्म-शब्दाचा अर्थ होतो. आचार्यांनीं वाक्यवृत्तींत ह्मटलें आहे, "धर्ममेघमिमं

प्राहुः समाधिं योगवित्तमाः, " कर्माचरणादि जे धर्म आहेत ते या मुख्य धर्माचीं अंगें असल्यामुळें त्यांस देखील धर्म ही संज्ञा प्राप्त झाली आहे; परंतु आत्मस्वरूपीं राहणें हाच मुख्य धर्म आहे, व तो ज्या ईश्वरप्रणीत वेदशास्त्रांत सांगितला आहे तेच धर्मग्रंथ होत.

वेदांतील धर्मतत्त्वांचा विचार करितांना प्राचीन ऋषींच्या विचारसरणींत भेद दिसून येतो, तथापि स्वरूपनिष्ठारूप जो मुख्य धर्म त्याबद्दल चार्वाकादि नास्तिकांशिवाय सर्वांचें एकच मत आहे. परमात्मस्वरूपप्राप्तीच्या उपायादिकांबद्दल मतभेद होऊन जे अनेक पंथ झाले त्यांचेंच खंडण श्रीमच्छंकराचार्यांनीं केलें. श्रुत्युपदिष्ट अद्वैत सिद्धांताचा विपर्यास होऊन अनेक पाखंड मतें प्रचलित होऊं लागलीं, व त्यांत विशेषें करून बौद्ध व जैन ह्यांच्या मतांचा ज्यास्त प्रसार झालेला पाहून उमापति श्रीभगवान् शंकर हे सुमारें एक हजार वर्षांपूर्वीं श्रीशंकराचार्य या नांवानें दक्षिणहिंदुस्थानांत मलबार प्रांतीं अवतीर्ण होऊन व सर्व भरतखंडभर संचार करून प्रबल युक्तीनीं पाखंड मतांचा पराजय करून सनातन वैदिक धर्माचें पुनरुज्जीवन करिते झाले हें सर्वश्रुत आहेच. ह्या वादांत व पूर्वींच्या श्रीमद्योगवासिष्ठादि ग्रंथांत धर्मतत्त्वांचा इतका कांहीं ऊहापोह झाला आहे कीं त्यापेक्षां अधिक सूक्ष्म विचार करण्यास आधुनिक विद्वानांस जागाच राहिली नाहीं ह्मटलें तरी चालेल. जी जी शंका आतां कोणास येण्यासारखी असेल तिचें समाधान पूर्वींच करून ठेविलेलें आढळतें. नवीन मतांच्या नांवाखालीं सांप्रत जें कांहीं प्रकट होत आहे तें सर्व जुन्याचाच अपरपर्याय आहे असें सहज लक्ष्यांत येण्यासारिखें आहे. प्रार्थनेचीं वगैरे पुस्तकें तुकाराम, रामदास इत्यादि साधूंच्या कवितांचींच रूपांतरें आहेत असें आपल्या पाहण्यांत येत नाहीं काय? एका अतिप्रेमळ गणेशोत्सवांत समर्थांचींच करुणाष्टकें ह्मणतात, परंतु त्यांत श्रीरामाच्या नांवाबद्दल श्रीगणेशाचें नांव घेण्यांत येतें इतकेंच.

कर्म, उपासना व ज्ञान असा त्रिकांडात्मक वेद परमेश्वरानें मानव जातीला धर्म ह्मणून दिला. सकाम कर्में करीत असतां निष्काम कर्माकडे व उपासनादि साधनांकडे प्रवृत्ति होऊन सद्गुरूपदेशानें ज्ञानप्राप्ति व्हावी या हेतूनेंच श्रुतीनें जीवास सकाम कर्में करावयास सांगितलें. फलश्रुतीच्या आमिषावांचून कर्माकडे प्रवृत्ति होणेंच मुळीं दुरापास्त आहे. मुलानें कडू औषध घ्यावें ह्मणून ज्याप्रमाणें माता प्रथम त्यास गोड पदार्थ खावयास देते, तद्वत्

श्रुतिमातेनेंहि प्रथम सकाम कर्मांच्या फलांचें आमिष दाखविलें आहे. यास्तव श्रुतिस्मृतींचा विरोध आहे असें जें ह्मणणें तेंहि निरर्थक आहे. प्रगल्भ विचार करणारास सनातन वैदिक धर्मांतील सर्व कांहीं सुगम व सुसंगत आहे असेंच कळून येतें.

श्रीमदाचार्यांनीं प्रथम उपनिषद्भाष्य, ब्रह्मसूत्रभाष्य व गीताभाष्य असें प्रस्थानत्रय निर्माण करून कर्मोपासनादि शुभ साधनें आत्मज्ञानास कशीं उपयोगी पडतात हें दाखवून कुशल युक्तींनीं व प्रमाणांनीं अद्वैत सिद्धांत दृढतर प्रस्थापित केला. तथापि प्रस्थानत्रयांतील प्रौढ भाषा व गहन अर्थ समजण्याचें सामर्थ्य नसलेल्या मुमुक्षु जनांस आत्मज्ञानाचा सहज लाभ व्हावा ह्मणून परमकारुणिक आचार्यमहाराजांनीं अनेक लहान व सुगम ग्रंथ आणि स्तोत्रें केलीं, त्यांत सर्ववेदांतसारसंग्रहरूप विवेकचूडामणि नांवाचा गुरुशिष्य-संवादात्मक अत्युत्तम ग्रंथ निर्माण केला. ह्या ग्रंथांत एकच नित्यशुद्धबुद्धमुक्तस्वभाव, जीवेश्वरजगद्भेदभावरहित, कूटस्थ, नित्य, निर्विकल्प, निराकार, निराधार, सच्चिदानंदरूप, प्रत्यगभिन्न परमात्मस्वरूप मात्र सत्य आहे, व तदितर सकल दृश्यभास मिथ्या आहे हा जो सर्ववेदांतांचा तात्पर्यार्थ तो सुगम रीतीनें प्रतिपादिला आहे. यांतील विषय मंगलाच्या प्रथमपद्यांतच " सर्ववेदान्तसिद्धान्तगोचरं गोविन्दं " या पदांत संकलित केला आहे. वेदान्त ह्मणजे उपनिषद्भाग, त्यांतील गो ह्मणजे वाक्यें, त्या वाक्यांच्या योगानें ज्याचें ज्ञान होतें त्या " गोभिरेव यतो वेद्यो गोविन्दः समुदाहृतः ।,, अशा परमात्मस्वरूपाचा लाभ हाच यांतील विषय आहे. हा जो ग्रंथप्रतिपाद्य विषय तो प्रतिपादक जीं वेदांतवाक्यें त्यांनींच प्राप्त होणारा आहे; अशा प्रकारचेंच यांत निरूपण असल्यामुळें प्रतिपाद्य प्रतिपादक भावरूप जो ग्रंथांतील द्वितीयानुबंध संबंध तो सहजच सिद्ध आहे. " परमानंदं " या पदानें नित्यनिरतिशयसुखरूप जो परमात्मा तोच आपण आहों ह्या ज्ञानानें सर्वदुःखनिवृत्ति व निरतिशयसुखप्राप्ति हें प्रयोजन सूचित केलें आहे. तसेंच या ग्रंथाची जर अशी योग्यता आहे तर मग जो जो हा ग्रंथ वाचील, त्या प्रत्येकास त्या वाचनानेंच निरतिशयसुखानंदप्राप्ति झाली पाहिजे; परंतु तसें होणें संभवनीय नाहीं, या शंकेचें उत्तर ह्मणून " सद्गुरुं प्रणतः " हीं अधिकारसंपत्तिद्योतक पदें योजून अधिकारीलक्षण सांगितलें आहे. साधनचतुष्टयसंपन्न मुमुक्षूनें श्रीगुरूंची उपासना करूनच आपल्या शंकांचें समाधान

करून घेतलें पाहिजे. एकटाच नुसते ग्रंथ वाचीत राहिला असतां खरें समाधान होणार नाहीं. ग्रंथ वाचते वेळीं वाचणारा आपल्या ठरलेल्या मतांप्रमाणेंच प्रायः वाक्यांतून श्लेष काढून अर्थग्रहण करीत असतो; ह्मणून वाक्याचा वास्तविक अभिप्राय त्यास कळत नसतो. श्रीगुरु हे उत्तम मार्गदर्शक असल्यामुळें त्यांच्या समागमानें शिष्याकडून विपरीतार्थग्रहणाचा संभवच नसतो. मनन करण्याच्या व विचार वाढविण्याच्या कामीं ग्रंथांचें फारच साहाय्य होतें. ग्रंथांपासून होणारा हा लाभ सामान्य नाहीं. ह्मणून ग्रंथ हेहि श्रेष्ठ गुरुच आहेत. तथापि व्यक्तिविषयक शंकांचें समाधान श्रीगुरुमुखानेंच ऐकिलें पाहिजे हें या दोन पदांवरून ध्वनित होत आहे.



# विशेष सूचना



प्रस्तुत भाषांतर तयार करतेवेळीं संपादकापाशीं केवळ मूळ श्लोकांची एक प्रत, मराठी भावार्थासह श्लोकांची एक प्रत, हिंदी व्याख्यानयुक्त दोन प्रती, व श्रीस्वामिकेशवाचार्य निर्मित संस्कृत टिका व श्रीनारायणमुनिकृत भाषाटीका या टीकाद्वयानें अलंकृत अशी एक प्रत अशा पांच प्रती होत्या. या प्रती जवळ असल्यामुळें टीपांत पाठभेद, अर्थवैचित्र्य वगैरे गोष्टी देतां आल्या. भाषांतरांत संशयात्मक स्थळीं विशेषें करून संस्कृत टीकेचाच आधार घेतला आहे. मूळ श्लोक देऊन त्यांच्या खालीं त्यांचा केवळ भावार्थच दिला असतां संस्कृताचें ज्ञान नसलेल्या वाचकांस मूळांतील शद्बलालित्याचें व अर्थगांभीर्याचें रहस्य कळून जसा आनंद व्हावा तसा होत नसल्यामुळें, प्रथम श्लोक, त्याच्या खालीं पदच्छेद व प्रत्येक पदावर मराठी वाक्य जुळेल अशा धोरणानें अन्वयाचा अंक देऊन त्याच्या खालीं सरळ मराठी अर्थ दिला आहे. छापण्याच्या सोईकरितां अर्थाच्या योजनेंत पदावरील अन्वयाचा अंक वाक्यांत प्रथम घालून त्यापुढें त्या पदाचा सरळ अर्थ लिहिला आहे, व जेथें त्या अर्थाचा विशेष खुलासा हवा असें वाटलें, तेथें त्या अर्थापुढें आडव्या दोन रेघांमध्यें लिहिलेल्या दुसऱ्या शब्दांनीं तो केला आहे. मूळ पदांच्या शब्दार्थांनीं जेथें वाक्यपूर्ति व अर्थद्योतन झालें नाहीं, तेथें जे अधिक शब्द घालावे लागले ते वर्तुलाकार कंसांत दाखविले आहेत. उदाहरणार्थ, श्लोक ३ यांत " महापुरुष संश्रय: " ह्या पदाचा अर्थ देतांना थोर पुरुषांचा ह्मणजे ब्रह्मनिष्ठ विद्वानांचा असा खुलासा केला आहे; व " देवानुग्रह हेतुकं " या पदाचा ईश्वरीकृपा कारण आहे असा अर्थ देतांना त्यामागें स्पष्टीकरणार्थ 'त्या प्राप्त होण्यास' हे शब्द कंसांत घातले आहेत. वाक्यांत अंक व कंस कां घातले आहेत हें ह्या वरून लक्ष्यांत येईलच. अंक व कंस नाहींत असें समजून व रेघेपुढें " ह्मणजे " हा शब्द घालून अर्थ वाचला असतां सरळ मराठी वाक्य होतें.

ग्रंथ छापत असतां रा० रा० देवजी अप्पूराव देशपांडे व छापखान्यांतील शास्त्री यांनीं बरेच श्रम करून प्रुफें तपासलीं, तथापि कंस, रेघा, अंक वगैरे संबंधानें कांहीं अशुद्धें राहिलीं आहेत. तीं सुज्ञ वाचकांच्या सहज लक्ष्यांत येतील. कांहीं अशुद्धें शुद्धिपत्रांत दुरुस्त केलीं आहेत.

रा० ल० घरत.

# अनुक्रमणिका.



श्री.

# अथ सार्थ विवेकचूडामणि.



## मंगल.

**सर्ववेदान्तसिद्धान्तगोचरं तमगोचरम् ।**
**गोविन्दं परमानन्दं सद्गुरुं प्रणतोऽस्म्यहम् ॥ १ ॥**

सर्ववेदान्तसिद्धान्तगोचरम्[१] । तम्[६] । अगोचरम्[२] । गोविन्दम्[३] । परमानन्दम्[४] । सद्गुरुम्[५] । प्रणतः[८] । अस्मि[९] । अहम्[७] ॥ १ ॥

अर्थ[१]–१ ( जो ) सर्व उपनिषदांच्या सिद्धांतांचा मुख्य विषय ( आहे ), ( गो ह्मणजे मन, वाणी इत्यादि ) २ इन्द्रियांचा अविषय ( आहे, गो ह्मणजे तत्त्वमस्यादि वेदान्त ) ३ वाक्यांनीं प्राप्त होणारा ( आहे, पक्षीं गोविंदपूज्यपाद हें ज्याचें नांव आहे, जो ) ४ निरतिशयानंदस्वरूप ( आहे, जो ब्रह्मादि ) ५ श्रेष्ठांचा गुरु, ( पक्षीं माझा सद्गुरु आहे ), ६ त्या ( परब्रह्मस्वरूपाला, पक्षीं गोविंदपूज्यपादगुरूला ) ७ मी ८ नमस्कार करीत ९ आहें. ॥ १ ॥

ह्या श्लोकावरून जीवब्रह्मांचें ऐक्य हा विषय, अनर्थनिवृत्ति व परमानंदप्राप्ति हें प्रयोजन, साधनचतुष्टयसंपन्न अधिकारी व प्रतिपाद्यप्रतिपादकभाव हा संबंध असे ग्रंथाचे चार अनुबंध ध्वनित होतात. कारण जीवब्रह्मांचें ऐक्य हाच सर्वोपनिषत्सिद्धांत आहे, व तद्दर्शक पद श्लोकारंभीं आहे तें ग्रंथांतील विषयाचें सूचक आहे. याप्रमाणेंच परमानंदपदानें प्रयोजन व प्रणतपदानें अधिकारिलक्षण सुचविलें आहे. प्रतिपाद्यप्रतिपादकभावरूप संबंध मंगलानें आरंभिलेल्या ग्रंथांत सहजच आहे ॥ १ ॥

**जन्तूनां नरजन्म दुर्लभमतः पुंस्त्वं ततो विप्रता**
**तस्माद्वैदिकधर्ममार्गपरता विद्वत्त्वमस्मात्परम् ।**

---

१ गोविंदपूज्यपाद हें आचार्यांच्या गुरूचें नांव होतें.

**आत्मानात्मविवेचनं स्वनुभवो ब्रह्मात्मना संस्थिति-**
**र्मुक्तिर्नो शतजन्मकोटिसुकृतैः पुण्यैर्विना लभ्यते ॥ २ ॥**

जन्तूनाम्[1] । नरजन्म[2] । दुर्लभम्[3] । अतः[4] । पुंस्त्वम्[5] । ततः[6] । विप्रता[7] । तस्मात्[8] । वैदिकधर्ममार्गपरता[9] । विद्वत्त्वम्[12] । अस्मात्[10] । परम्[11] । आत्मानात्मविवेचनम्[13] । स्वनुभवः[14] । ब्रह्मात्मना[15] । संस्थितिः[16] । मुक्तिः[20] । नो[22] । शतजन्मकोटिसुकृतैः[17] । पुण्यैः[18] । विना[19] । लभ्यते[21] ॥ २ ॥

**अर्थ**–१ जीवांना २ मनुष्याचा जन्म ३ दुर्लभ आहे, ४ त्याहून ५ पुरुषदेह ( दुर्लभ आहे ), ६ त्याहून ७ ब्राह्मण्य ( दुर्लभ आहे ), ८ त्याहून ९ वेदोक्त धर्ममार्गाच्या ठायीं तत्परता ( दुर्लभ आहे ), १० त्याहून ११ पलीकडे १२ विद्वत्ता ( दुर्लभ आहे ), ( त्याहून ) १३ आत्मा व अनात्मा यांचा विचार ( दुर्लभ आहे ), ( त्यापेक्षां आत्मसाक्षात्काररूप ) १४ उत्तम अपरोक्ष अनुभव ( दुर्लभ आहे ), ( त्यापेक्षां ) १५ ब्रह्माशीं अभेदरूपानें १६ राहणें–केवळ ब्रह्मनिष्ठा–( दुर्लभ आहे ). ( अशा रीतीनें ) १७ शेंकडों जन्मांत कोट्यवधि ( सत्कर्में करून जोडलेल्या ) १८ पुण्या–१९ शिवाय २० मुक्ति २१ मिळत २२ नाहीं. ॥ २ ॥

ह्या श्लोकांत सर्वांत मुक्ति दुर्लभ असल्यामुळें तिजबद्दल अवश्य यत्न करावा असें सुचविलें आहे. ॥ २ ॥

**दुर्लभं त्रयमेवैतद्देवानुग्रहहेतुकम् ।**
**मनुष्यत्वं मुमुक्षुत्वं महापुरुषसंश्रयः ॥ ३ ॥**

दुर्लभम् । त्रयम् । एव । एतद् । देवानुग्रहहेतुकम् । मनुष्यत्वम् । मुमुक्षुत्वम् । महापुरुषसंश्रयः ॥ ३ ॥

**अर्थ**—१ मनुष्यजन्म, २ मोक्षाची इच्छा, ३ थोर पुरुषाचा—ब्रह्मनिष्ठ विद्वानाचा—समागम, ४ ह्या ५ तीन ( गोष्टी ) ६ च ( अगोदर ) ७ दुर्लभ ( आहेत ), ( त्या प्राप्त होण्यास ) ८ ईश्वरी कृपा कारण आहे.

ह्या श्लोकाचें तात्पर्य मनुष्यत्वादि तीन दुर्लभ गोष्टी ईश्वरी कृपेनें प्राप्त होतात, व त्या प्राप्त झाल्या असतां मोक्षाकरितां यत्न करण्यास आळस करूं नये असें आहे. ॥ ३ ॥

**लब्ध्वा कथंचिन्नरजन्म दुर्लभं**
**तत्रापि पुंस्त्वं श्रुतिपारदर्शनम् ।**
**यस्त्वात्ममुक्तौ न यतेत मूढधीः**
**स ह्यात्महा स्वं विनिहन्त्यसद्ग्रहात् ॥ ४ ॥**

लब्ध्वा[6] । कथंचित्[5] । नरजन्म[4] । दुर्लभम्[3] । तत्र[7] । अपि[8] । पुंस्त्वम्[9] । श्रुतिपारदर्शनम्[10] । यः[1] । तु[11] । आत्ममुक्तौ[12] । न[14] । यतेत[13] । मूढधीः[2] । सः[15] । हि[16] । आत्महा[17] । स्वम्[19] । विनिहन्ति[20] । असद्ग्रहात्[18] ॥ ४ ॥

**अर्थ**—१ जो ( मोह पावली आहे बुद्धि ज्याची असा ) २ मूर्ख पुरुष ३ दुर्लभ ४ मनुष्यजन्म ५ मोठ्या प्रयासानें ६ मिळवून ७ त्यांत ८ हि ९ पुरुषत्व ( व ) १० वेदान्तशास्त्र जाणण्याची योग्यता ( प्राप्त होऊन ) ११ सुद्धां १२ आपणास मोक्ष व्हावा म्हणून १३ यत्न करणार १४ नाहीं, १५ तो १६ निश्चयानें १७ आत्महत्या करणारा ( असून ) १८ असत्य-अनात्म—वस्तूंचें ग्रहण करीत असल्यामुळें १९ स्वतःचा २० नाश करितो.

दुर्लभ गोष्टी प्राप्त करून घेऊन मुक्तीकरितां यत्न न करणारा आत्मघाती आहे असें यांत सांगितलें आहे. ॥ ४ ॥

इतः कोऽन्वस्ति मूढात्मा यस्तु स्वार्थे प्रमाद्यति ।
दुर्लभं मानुषं देहं प्राप्य तत्रापि पौरुषम् ॥ ५ ॥

इतः । कः । नु । अस्ति । मूढात्मा । यः । तु । स्वार्थे । प्रमाद्यति । दुर्लभं मानुषं देहं प्राप्य तत्र अपि पौरुषम् ॥ ५ ॥

**अर्थ**–१ जो ( पुरुष ) २ दुर्लभ ( असा ) ३ मनुष्याचा ४ देह ( व ) ५ त्यांत ६ हि ७ पुरुषत्व ८ प्राप्त झालें असून ९ देखील १० आपल्या कल्याणाविषयीं ११ हयगय करितो, १२ त्याहून १३ खरोखर ( अधिक ) १४ मूर्ख १५ कोण १६ आहे ?

मनुष्यत्वादि प्राप्त होऊन मोक्षरूप स्वार्थ न संपादणारा मूर्खच आहे असें यांत सांगितलें आहे. ॥ ५ ॥

वदन्तु शास्त्राणि यजन्तु देवान्
कुर्वन्तु कर्माणि भजन्तु देवताः ।
आत्मैक्यबोधेन विनापि मुक्तिर्न
सिद्ध्यति ब्रह्मशतान्तरेऽपि ॥ ६ ॥

वदन्तु । शास्त्राणि । यजन्तु । देवान् । कुर्वन्तु । कर्माणि । भजन्तु । देवताः । आत्मैक्यबोधेन । विना । अपि । मुक्तिः । न । सिद्ध्यति । ब्रह्मशतान्तरे । अपि ॥ ६ ॥

**अर्थ**–१ जीवब्रह्मांच्या ऐक्यबोधा–२ वांचून ३ शेंकडों ब्रह्मदेव होऊन जातपर्यंत–४ हि ( पुरुष शास्त्राध्ययन करून ) ५ शास्त्रार्थ ६ बोलत असोत, ७ ( इंद्रादि ) देवांकरितां ८ यज्ञ करोत, ९ कर्मे १० करोत, ११ देवतांचें १२ पूजन करोत, १३ परंतु १४ मोक्ष १५ सिद्ध होणार १६ नाहीं.

ब्रह्मात्मैक्यज्ञानावांचून शास्त्राध्ययन, यज्ञ इत्यादि व्यर्थ आहेत, हें ह्या श्लोकाचें तात्पर्य आहे. ॥ ६ ॥

**अमृतत्वस्य नाशास्ति वित्तेनेत्येव हि श्रुतिः ।**
**ब्रवीति कर्मणो मुक्तेरहेतुत्वं स्फुटं यतः ॥ ७ ॥**

अमृतत्वस्य[३] । न[६] । आशा[४] । अस्ति[५] । वित्तेन[२] । इति[७] । एव[१४] । हि[१५] । श्रुतिः[८] । ब्रवीति[१३] । कर्मणः[१०] । मुक्तेः[९] । अहेतुत्वं[१२] । स्फुटं[११] । यतः[१] ॥ ७ ॥

**अर्थ**—१ कारण २ द्रव्याच्या योगानें ३ मोक्षप्राप्तीची ४ आशा ५।६ नाहीं ७ अशा अर्थाची ८ श्रुति ९ मोक्षाला १० कर्म ११ उघडपणें १२ हेतु नाहीं ( असें ) १३ सांगत १४।१५ आहेच. ॥ ७ ॥

कर्मादिकांनीं मोक्ष होत नाहीं ह्यास श्रुतीचें प्रमाण आहे असें ह्या श्लोकांत सांगितलें आहे. ॥ ७ ॥

**अतो विमुक्त्यै प्रयतेत विद्वान्**
**संन्यस्तबाह्यार्थसुखस्पृहः सन् ।**
**सन्तं महान्तं समुपेत्य देशिकं**
**तेनोपदिष्टार्थसमाहितात्मा ॥ ८ ॥**

अतः[१] । विमुक्त्यै[११] । प्रयतेत[१२] । विद्वान्[२] । संन्यस्तबाह्यार्थसुखस्पृहः[३] । सन्[४] । सन्तम्[५] । महान्तम्[६] । समुपेत्य[८] । देशिकम्[७] । तेन[९] । उपदिष्टार्थसमाहितात्मा[१०] ॥ ८ ॥

**अर्थ**—१ यास्तव २ शहाण्या पुरुषानें ३ बाह्य विषयसुखांच्या इच्छेचा त्याग ४ करून ५ सज्जन ६ थोर ब्रह्मनिष्ठ ७ गुरूला ८ शरण जाऊन ९ त्यांनीं १० केलेल्या उपदेशानें चित्ताची ए[illegible] करून ११ मुक्तीकरितां १२ प्रयत्न करावा. ॥ ८ ॥

तात्पर्य इतकेंच कीं, मनुष्यजन्मादि दुर्लभ गोष्टी प्राप्त झाल्या आहेत, ह्मणून मोक्ष प्राप्तीविषयीं आळस करूं नये. ॥ ८ ॥

उद्धरेदात्मनात्मानं मग्नं संसारवारिधौ ।
योगारूढत्वमासाद्य सम्यग्दर्शननिष्ठया ॥ ९ ॥

उद्धरेत् । आत्मना । आत्मनं । मग्नं । संसारवारिधौ ।
योगारूढत्वं । आसाद्य । सम्यग्दर्शनानिष्ठया ॥ ९ ॥

**अर्थ**– ( सर्व संकल्पत्यागानें ) १ चित्ताची एकाग्रता २ संपादून ३ उत्तम अद्वैत ज्ञाननिष्ठेनें ४ संसारसमुद्रांत ५ बुडालेले ( जे ) ६ आपण ( त्या आपला ) ७ आपणच ८ उद्धार करावा. ॥ ९ ॥

ईश्वर व गुरु हे माझा उद्धार करतील असें ह्मणून स्वस्थ न बसतां आपण आपल्या उद्धारार्थ प्रयत्न केला पाहिजे. ॥ ९ ॥

संन्यस्य सर्वकर्माणि भवबन्धविमुक्तये ।
यत्यतां पण्डितैर्धीरैरात्माभ्यास उपस्थितैः ॥१०॥

संन्यस्य । सर्वकर्माणि । भवबन्धविमुक्तये । यत्यतां ।
पण्डितैः । धीरैः । आत्माभ्यासे । उपस्थितैः ॥ १० ॥

**अर्थ**--१ आत्मज्ञानाच्या अभ्यासाविषयीं २ तत्पर झालेल्या ३ बुद्धिमान् ४ विद्वानांनीं ५ सर्वकर्मे ६ टाकून ७ संसारबंधनापासून मुक्त होण्याकरितां ८ यत्न करावा ॥ १० ॥

मोक्षाला कर्मत्यागाची व आत्माभ्यासाची आवश्यकता यांत सांगितली आहे. १०

चित्तस्य शुद्धये कर्म न तु वस्तूपलब्धये ।
वस्तुसिद्धिर्विचारेण न किंचित्कर्मकोटिभिः ॥११॥

चित्तस्य । शुद्धये । कर्म । न । तु । वस्तूपलब्धये । वस्तु-सिद्धिः । विचारेण । न । किंचित् । कर्मकोटिभिः ॥ ११ ॥

अर्थ–१ (निष्काम) कर्म २ चित्ताच्या ३ शुद्धीकरितां (आहे.) ४ परंतु ५ आत्मवस्तुप्राप्तीकरितां ६ नाहीं ७ विवेकानें, ८ आत्मप्राप्ति (होते), ९ कोट्यवधि कर्मे केल्यानें १० अल्पमात्रही ११ होत नाहीं. ११

निष्कामकर्मानें चित्तशुद्धि मात्र होते. आत्मलाभाला विवेकच हेतुभूत आहे, हें ह्या श्लोकाचें तात्पर्य आहे. ॥ ११ ॥

सम्यग्विचारतः सिद्धा रज्जुतत्त्वावधारणा ।
भ्रान्तोदितमहासर्पभयदुःखविनाशिनी ॥ १२ ॥

सम्यग्विचारतः । सिद्धा । रज्जुतत्त्वावधारणा । भ्रान्तोदित-महासर्पभयदुःखविनाशिनी ॥ १२ ॥

अर्थ--१ भ्रांत पुरुषाच्या ठायीं (रज्जूवर) सर्पभ्रमानें उत्पन्न झालेल्या महा भयामुळें (होणाऱ्या) दुःखाचा नाश करणारा (जो) २ रज्जूच्या वास्तवीकस्वरूपाचा निश्चय (तो) ३ यथार्थ विचाराच्या योगानेंच ४ सिद्ध (होतो.) ॥ १२ ॥

आत्मसाक्षात्काराला विचारच हेतु आहे हें येथें दृष्टांतपूर्वक सांगितलें आहे. १२

अर्थस्य निश्चयो दृष्टो विचारेण हितोक्तितः ।
न स्नानेन न दानेन प्राणायामशतेन वा ॥१३॥

अर्थस्य । निश्चयः । दृष्टः । विचारेण । हितोक्तितः । न । स्नानेन । न । दानेन । प्राणायामशतेन । वा ॥ १३ ॥

अर्थ–१ कल्याण करणाऱ्या (सद्गुरूच्या) वाक्यांच्या २ विचारानें

३ वस्तुतत्त्वाचा ४ निश्चय झालेला ५ पाहण्यांत येतो; ६ स्नानानें (झालेला पाहण्यांत येत ) ७ नाहीं ८ दानानें ९ नाहीं १० किंवा ११ शेकडों प्राणायामांनीं ( नाहीं. ) ॥ १३ ॥

स्वरूपनिश्चयाला विवेकाचीच आवश्यकता आहे. ॥ १३ ॥

**अधिकारिणमाशास्ते फलसिद्धिर्विशेषतः ।**
**उपाया देशकालाद्याः सन्त्यस्मिन्सहकारिणः॥१४॥**

अधिकारिणम् । आशास्ते । फलसिद्धिः । विशेषतः । उपायाः । देशकालाद्याः । सन्ति । अस्मिन् । सहकारिणः ॥ १४ ॥

अर्थ-- १ विशेषंकरून ( आत्मसाक्षात्काररूप ) २ फलाची सिद्धि ( होण्याला ) ( उत्तम ) ३ अधिकाऱ्याची ४ अपेक्षा आहे. ५ या कामीं ( निर्जन ) ६ देश, ( पुण्य ) काल इत्यादि ७ अनुकूल गोष्टी ८ साहाय्य करणाऱ्या ९ असतात. ॥ १४ ॥

योग्य ज्ञानाधिकारी असेल, तरच ज्ञानप्राप्ति होईल. ॥ १४ ॥

**अतो विचारः कर्तव्यो जिज्ञासोरात्मवस्तुनः ।**
**समासाद्य दयासिन्धुं गुरुं ब्रह्मविदुत्तमम् ॥ १५ ॥**

अतः । विचारः । कर्तव्यः । जिज्ञासोः । आत्मवस्तुनः । समासाद्य । दयासिन्धुम् । गुरुम् । ब्रह्मविदुत्तमम् ॥ १५ ॥

अर्थ—१ ह्यास्तव २ श्रोत्रिय, ब्रह्मनिष्ठ ( व ) ३ कृपासागर ( अशा ) ४ सद्गुरूला ५ शरण जाऊन ६ आत्मज्ञानाची इच्छा करणाऱ्या पुरुषानें ७ प्रत्यगात्माच ब्रह्मवस्तु आहे ( असा ) ८ विचार ९ करावा. ॥ १५ ॥

सद्गुरूला शरण जाऊन जिज्ञासूनें ब्रह्मात्मैक्याचा विवेक करावा. ॥ १५ ॥

**मेधावी पुरुषो विद्वानूहापोहविचक्षणः ।**
**अधिकार्यात्मविद्यायामुक्तलक्षणलक्षितः ॥ १६ ॥**

मेधावी[1] । पुरुषः[4] । विद्वान्[2] । ऊहापोहविचक्षणः[3] । अधिकारी[7] । आत्मविद्यायाम्[6] । उक्तलक्षणलक्षितः[5] ॥ १६ ॥

अर्थ–१ बुद्धिमान्, २ सुशिक्षित, ( वेदसंमत युक्तींचें ) ३ ग्रहण ( व वेदविरुद्ध तर्कांचें ) खंडण करण्यांत कुशल ४ पुरुष, ( शास्त्रांत ) ५ सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त ( असला ह्मणजे ), ६ आत्मज्ञानाचा ७ अधिकारी ( होतो ). ॥ १६ ॥

आत्मविद्यादान करण्याला योग्य अधिकारी कोण तें येथें सांगितलें आहे. ॥ १६ ॥

**विवेकिनो विरक्तस्य शमादिगुणशालिनः ।**
**मुमुक्षोरेव हि ब्रह्मजिज्ञासायोग्यता मता ॥ १७ ॥**

विवेकिनः[1] । विरक्तस्य[2] । शमादिगुणशालिनः[3] । मुमुक्षोः[4] । एव[5] । हि[8] । ब्रह्मजिज्ञासायोग्यता[6] । मता[7] ॥ १७ ॥

अर्थ–( आत्मानात्म ) १ विवेक करणाऱ्या, २ वैराग्यसंपन्न, ३ शमादिषट्कसंपत्तीनें युक्त, ( व ) ४ मोक्षाची इच्छा करणाऱ्या पुरुषाला ५ मात्र ६ ब्रह्मज्ञानाची इच्छा करण्याची योग्यता ( ऋषींनीं ) ७ मानिली ( आहे ), ८ असें ( वेदांतांत ) प्रसिद्ध आहे. ॥ १७ ॥

यांत अधिकाऱ्याची वास्तविक योग्यता काय असली पाहिजे, हें सांगितलें आहे. ॥ १७ ॥

**साधनान्यत्र चत्वारि कथितानि मनीषिभिः ।**
**येषु सत्स्वेव सन्निष्ठा यदभावे न सिद्ध्यति ॥ १८ ॥**

साधनानि[3] । अत्र[1] । चत्वारि[2] । कथितानि[5] । मनीषिभिः[4] । येषु[6] । सत्सु[7] । एव[8] । संनिष्ठा[9] । यदभावे[11] । न[12] । सिद्ध्यति[10] ॥ १८॥

**अर्थ**–१ ह्या ( ब्रह्मविद्ये ) विषयीं २ चार ३ साधनें ( वेदान्त जाणणाऱ्या ) ४ विद्वानांनीं ५ सांगितलीं ( आहेत ). ६ तीं ७ झालीं असलीं ८ तरच ९ सद्वस्तूच्या–ब्रह्माच्या–ठायीं निष्ठा १० सिद्ध होते ( व ) ११ तीं न झालीं तर ( होत ) १२ नाहीं. ॥ १८ ॥

ब्रह्मविद्येला चार साधनांची आवश्यकता येथें सांगितली आहे. ॥ १८ ॥

आदौ नित्यानित्यवस्तुविवेकः परिगण्यते ।
इहामुत्रफलभोगविरागस्तदनन्तरम् ॥ १९ ॥

आदौ[1] । नित्यानित्यवस्तुविवेकः[2] । परिगण्यते[3] । इहामुत्रफल[5]भोगविरागः । तदनन्तरम्[4] ॥ १९ ॥

**अर्थ**–१ आरंभीं २ नित्यवस्तु–आत्मा–व अनित्यवस्तु–अनात्मा–नाशिवंत पदार्थ–यांचा ( यथार्थ ) विवेक, ( हें पहिलें साधन ) ३ मानिलें आहे. ४ त्यानंतर ५ ह्या लोकींच्या व स्वर्ग लोकींच्या कर्मफलभोगांचा तिटकारा वाटणें, ( हें दुसरें साधन मानिलें आहे ). ॥ १९ ॥

साधनचतुष्टयापैकीं ह्या श्लोकांत पहिलीं दोन साधनें सांगितलीं आहेत. ॥ १९ ॥

शमादिषट्कसंपत्तिर्मुमुक्षुत्वमिति स्फुटम् ।
ब्रह्म सत्यं जगन्मिथ्येत्येवंरूपो विनिश्चयः ॥ २० ॥
सोऽयं नित्यानित्यवस्तुविवेकः समुदाहृतः ।
तद्वैराग्यं जिहासा या दर्शनश्रवणादिभिः ॥ २१ ॥
देहादिब्रह्मपर्यन्ते ह्यनित्ये भोगवस्तुनि ।

विरज्य विषयव्रातादोषदृष्ट्या मुहुर्मुहुः ॥ २२ ॥
स्वलक्ष्ये नियतावस्था मनसः शम उच्यते ।
विषयेभ्यः परावर्त्य स्थापनं स्वस्वगोलके ॥ २३ ॥
उभयेषामिन्द्रियाणां स दमः परिकीर्तितः ।
बाह्यानालंबनं वृत्तेरेषोपरतिरुत्तमा ॥ २४ ॥

( विसाव्या श्लोकाचें पूर्वार्ध व चोविसाव्या श्लोकाचें उत्तरार्ध हीं अन्वयाला अलग असून मागील श्लोकाचें उत्तरार्ध व पुढील श्लोकाचें पूर्वार्ध याप्रमाणें या पांच श्लोकांचा अन्वयार्थ लागतो, ह्मणून तो खालीं तसाच दिला आहे. )

शमादिषट्क[1]संपत्तिः । मुमुक्षुत्वम्[2] । इति[3] । स्फुटम्[4] ।

अर्थ–१ शमादि सहा प्रकारची संपत्ति ( व ) २ मुक्त होण्याची इच्छा ३ याप्रमाणें ( हीं साधनें ) ४ स्पष्ट आहेत.

या श्लोकार्धांत राहिलेलीं दोन साधनें सांगितलीं आहेत.

ब्रह्म[1] । सत्यम्[2] । जगत्[3] । मिथ्या[4] । इति[5] । एवंरूपः[6] । विनिश्चयः[7] । सः[8] । अयं[9] । नित्यानित्यवस्तुविवेकः[10] । समुदाहृतः[11] ।

अर्थ–१ ब्रह्म–माया व मायाकार्य यांस व्यापून असणारें चैतन्य–२ सत्य–अविनाशी–( व ) ३ जगत्–जडसमूह–४ मिथ्या–दिसत असतांच नाशिवंत–( आहे ), ५ असा ६ ह्या प्रकारचा ( जो ) ७ दृढ–संशयविपर्ययरहित–निश्चय ८ त्या ९ ह्या ( निश्चयास ) ( ऋषींनीं ) १० नित्यानित्यवस्तुविवेक ११ ह्मटलें आहे.

हें पहिल्या साधनाचें स्वरूपलक्षण झालें.

तत्[8] । वैराग्यम्[9] । जिहासा[7] । या[6] । दर्शनश्रवणादिभिः[5] । देहादिब्रह्मपर्यन्ते । हि[2] । अनित्ये[3] । भोग[4]वस्तुनि ।

अर्थ-( मनुष्य ) १ देहापासून ब्रह्मदेवाच्या ( देहा ) पर्यंत २ हि ३ नाशिवंत ४ भोग्य पदार्थाविषयीं ( तो ) ५ पाहिला, ऐकिला वगैरे असतांच ६ जी त्यागबुद्धि ( होते ) ७ तें वैराग्य ( होय ).

हें दुसऱ्या साधनाचें लक्षण झालें.

**विरज्य । विषयव्रातात् । दोषदृष्ट्या । मुहुर्मुहुः । स्वलक्ष्ये । नियतावस्था । मनसः । शमः । उच्यते ।**

अर्थ-१ वारंवार २ दोषदृष्टी करून ३ विषयांच्या समूहाविषयीं ४ वैराग्य संपादन करून ५ मनाला ६ त्याच्या लक्ष्याच्या-ब्रह्माच्या-ठायीं ७ निरोधपूर्वक ठेवणें ( ह्मास )८ शम ९ ह्मणतात.

तिसरें साधन जी शमादिषट्कसंपत्ति ह्मणजे शम, दम, उपरति, तितिक्षा, श्रद्धा आणि समाधान हे सहा धर्म त्यांपैकीं येथें पहिल्याचें लक्षण सांगितलें आहे.

**विषयेभ्यः । परावर्त्य । स्थापनं । स्वस्वगोलके । उभयेषां । इन्द्रियाणां । सः । दमः । परिकीर्तितः ॥**

अर्थ-१ दोन्ही प्रकारच्या २ इंद्रियांस-ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें या उभयतांस-३ विषयांपासून ४ मागें फिरवून ५ आपआपल्या स्थानींच ६ स्थिर ठेवणें ७ त्यास ८ दम ९ ह्मटलें आहे.

शमादि षट्कसंपत्तीच्या सहा अंगांपैकीं एथें दुसऱ्याचें लक्षण सांगितलें आहे.

**बाह्यानालंबनं । वृत्तेः । एषा । उपरतिः । उत्तमा ।**

अर्थ-( विषयांना प्रकाशित करणाऱ्या ) १ चित्तवृत्तीला २ बाह्यांचा-विषयांचा-आश्रय करूं न देणें ३ ही ४ उत्कृष्ट ५ उपरति होय.

हें तिसऱ्या अंगाचें लक्षण झालें. ॥ २० ॥ २१ ॥ २२ ॥ २३ ॥ २४ ॥

**सहनं सर्वदुःखानामप्रतीकारपूर्वकम् ।**
**चिन्ताविलापरहितं सा तितिक्षा निगद्यते ॥ २५ ॥**

सहनं । सर्वदुःखानां । अप्रतीकारपूर्वकम् । चिन्ताविलापरहितं । सा । तितिक्षा । निगद्यते ॥ २५ ॥

**अर्थ**–( प्रतिकूल बुद्धीनें मानिलेलीं आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक ) १ सर्व दुःखे ( नष्ट कशीं होतील अशी ) २ काळजी व शोक न करितां ३ त्यांच्या निवारणार्थ उपाय केल्यावांचून ४ सहन करणें ५ ह्यास ६ तितिक्षा ह्मणतात. ॥ २५ ॥

हें चवथें अंग जी तितिक्षा तिचें लक्षण झालें. ॥ २५ ॥

**शास्त्रस्य गुरुवाक्यस्य सत्यबुद्ध्यवधारणम् ।**
**सा श्रद्धा कथिता सद्भिर्यया वस्तूपलभ्यते ॥ २६॥**

शास्त्रस्य । गुरुवाक्यस्य । सत्यबुद्ध्यवधारणम् । सा । श्रद्धा । कथिता । सद्भिः । यया । वस्तु । उपलभ्यते ॥ २६ ॥

**अर्थ**–( वेदान्त ) १ शास्त्र ( व ) २ गुरुवाक्य ( हीं ) ३ सत्य आहेत असा जो बुद्धीचा निश्चय, ४ ज्याच्यायोगानें ५ आत्मवस्तु ६ प्राप्त होते, ७ त्यास ८ सज्जनांनीं ९ श्रद्धा ह्मटलें आहे. ॥ २६ ॥

हें श्रद्धेचें लक्षण झालें. ॥ २६ ॥

**सर्वदा स्थापनं बुद्धेः शुद्धे ब्रह्मणि सर्वदा ।**
**तत्समाधानमित्युक्तं न तु चित्तस्य लालनम् ॥२७॥**

सर्वदा । स्थापनं । बुद्धेः । शुद्धे । ब्रह्मणि । सर्वदा । तत् । समाधानं । इति । उक्तं । न । तु । चित्तस्य । लालनम् ॥ २७ ॥

**अर्थ**–१ कालत्रयीं ( रागद्वेषादि ) २ मलरहित ( सच्चिदानंदरूप ) ३ ब्रह्माच्या ठायीं ( अंतःकरणाच्या निश्चयरूप ) ४ वृत्तीला ५ सर्वकाळ ६ स्थिर करणें ७ ह्यास ८ समाधान ९ असें १० ह्मटलें आहे, ११ व १२ चित्ताला ( आवडणारा विषय देऊन ) १३ संतुष्ट करणें ( हें ) समाधान १४ नव्हे. ॥ २७ ॥

तिसऱ्या साधनांतील सहावें अंग जें समाधान त्याचें हें लक्षण झालें. ॥ २७ ॥

**अहंकारादिदेहान्तान् बन्धानज्ञानकल्पितान् ।**
**स्वस्वरूपावबोधेन मोक्तुमिच्छा मुमुक्षुता ॥ २८ ॥**

**अहंकारादिदेहान्तान्[२] । बन्धान्[३] । अज्ञानकल्पितान्[१] । स्वस्वरूपावबोधेन[४] । मोक्तुं[५] । इच्छा[६] । मुमुक्षुता[७] ॥ २८ ॥**

**अर्थः**–( आत्मस्वरूपांत वास्तविक नसून केवळ ) १ अज्ञानानें कल्पित केलेले ( जे ) २ अहंकारापासून देहापर्यंत ३ बंध ( त्यांपासून ) ४ आपल्या स्वरूपज्ञानाच्या योगानें ५ मुक्त होण्याच्या ६ इच्छेला ७ मुमुक्षुता ( ह्मटलें आहे. ) ॥ २८ ॥

चवथें साधन मुमुक्षुत्व त्याचें हें लक्षण झालें. ॥ २८ ॥

**मन्दमध्यमरूपाऽपि वैराग्येण शमादिना ।**
**प्रसादेन गुरोः सेयं प्रवृद्धा सूयते फलम् ॥२९॥**

**मन्दमध्यमरूपा[३] । अपि[४] । वैराग्येण[७] । शमादिना[८] । प्रसादेन[६] । गुरोः[५] । सा[१] । इयं[२] । प्रवृद्धा[९] । सूयते[११] । फलम्[१०] ॥ २९ ॥**

**अर्थः**–१ ती २ ही ( वर सांगितलेली मोक्षाची इच्छा ) ३ मन्द व मध्यम प्रकारची ( असली ) ४ तरी ५ श्रीगुरूंच्या ६ कृपेनें, ७ वैरा-

ज्यानें ( व ) ८ शमादि षट्क संपत्तीच्या योगानें ९ वृद्धिंगत होऊन ( आत्म-साक्षात्काररूप ) १० फल ११ देणारी होईल.॥ २९ ॥

मोक्षाची इच्छा मंद व मध्यम असली, तरी उपायांनीं ती तीव्र होऊन फल देईल हें ह्या श्लोकांत कथन केलें आहे. ॥ २९ ॥

**वैराग्यं च मुमुक्षुत्वं तीव्रं यस्य तु विद्यते ।**
**तस्मिन्नेवार्थवन्तः स्युः फलवन्तः शमादयः ॥ ३० ॥**

**वैराग्यं । च । मुमुक्षुत्वं । तीव्रं । यस्य । तु । विद्यते । तस्मिन् । एव । अर्थवन्तः । स्युः । फलवन्तः । शमादयः ॥ ३० ॥**

**अर्थः**–१ ज्या ( पुरुषा ) चीं २ वैराग्य ३ आणि ४ मोक्षेच्छा ( हीं दोन साधनें ) ५ च ६ तीव्र ७ असतात, ८ त्याच्याठायीं ९ मात्र १० शमादिक ( षड्गुण ) ११ सार्थ ( व ) १२ फल देणारे १३ होतील. ।३०।

वैराग्य व शमादि हीं तीव्र मुमुक्षेला जशीं अवश्य आहेत तसेंच शमादि गुणहि वैराग्य व मुमुक्षुता हीं तीव्र असतील तरच यथार्थ फल देतात असें या श्लोकांत सांगितलें आहे. तात्पर्य इतकेंच कीं, हीं साधनें परस्परांचें साहाय्य करणारीं आहेत. एक दुसऱ्याच्या साहाय्यावांचून सिद्ध होत नाहीं. यथार्थ विवेकानें तीव्र वैराग्य व मुमुक्षा हीं होतात व ह्यांच्यायोगानें शमादि षट्क यथार्थ होतें. ॥ ३० ॥

**एतयोर्मन्दता यत्र विरक्तत्वमुमुक्षयोः ।**
**मरौ सलिलवत्तत्र शमादेर्भानमात्रता ॥ ३१ ॥**

**एतयोः । मन्दता । यत्र । विरक्तत्वमुमुक्षयोः । मरौ । सलिलवत् । तत्र । शमादेः । भानमात्रता ॥ ३१ ॥**

**अर्थः**–१ जेथें–ज्या पुरुषाच्या ठायीं–२ या ३ वैराग्याची व मुमुक्षुत्वाची ४ मंदता ( असते ), तेथें–५ त्या पुरुषाच्या ठायीं–६ उखर

भूमीवर ७ जल ( भासा ) प्रमाणें ८ शमादिकांचा ९ केवळ भास ( असतो ). ॥ ३१ ॥

वैराग्य व मोक्षेच्छा हीं तीव्रच असलीं पाहिजेत, नाहींतर उखर जमिनीवर मृगजलाच्या भासाप्रमाणें शमादिकांचा भास मात्र होऊन ते फळ देणारे होणार नाहींत ॥ ३१ ॥

मोक्षकारणसामग्र्यां भक्तिरेव गरीयसी ।
स्वस्वरूपानुसंधानं भक्तिरित्यभिधीयते ॥ ३२ ॥

मोक्षकारणसामग्र्यां । भक्तिः । एव । गरीयसी । स्वस्वरूपानुसंधानं । भक्तिः । इति । अभिधीयते ॥ ३२ ॥

अर्थ–१ मोक्षाला साधनीभूत ज्या गोष्टी आहेत त्यांमध्यें २ भक्ति ३ च ४ श्रेष्ठ ( आहे ). ५ आत्मस्वरूपाच्या चिंतनाला ६ भक्ति ७ असें ८ नांव आहे. ॥ ३२ ॥

भक्ति मोक्षाचें श्रेष्ठ साधन आहे व स्वरूपानुसंधानालाच भक्ति ह्मणतात. ॥ ३२ ॥

स्वात्मतत्त्वानुसंधानं भक्तिरित्यपरे जगुः ।
उक्तसाधनसंपन्नस्तत्त्वजिज्ञासुरात्मनः ॥ ३३ ॥
उपसीदेद्गुरुं प्राज्ञं यस्माद्बन्धविमोक्षणम् ।
श्रोत्रियोऽवृजिनोऽकामहतो यो ब्रह्मवित्तमः ॥ ३४ ॥
ब्रह्मण्युपरतः शान्तो निरिन्धन इवानलः ।
अहेतुकदयासिन्धुर्बन्धुरानमतां सताम् ॥ ३५ ॥

येथें तेतिसाव्या श्लोकाचें पूर्वार्ध हें एक वाक्य, तेतिसाव्याचें उत्तरार्ध व चौतिसाव्याचें पूर्वार्ध हें एक वाक्य आणि चौतिसाव्याचें उत्तरार्ध व पसतिसावा सर्व श्लोक मिळून एक वाक्य, अशीं तीन स्वतंत्र वाक्यें आहेत.

**स्वात्मतत्त्वानुसन्धानं । भक्तिः । इति । अपरे । जगुः ।**

**अर्थः**– १ स्वात्म्याच्या ठायीं (मात्र) तत्त्वयथार्थता -- (आहे व त्याहून भिन्न सर्व मिथ्या आहे असा जो) निश्चय (ती) २ भक्ति ३असें ४ दुसऱ्यांनीं-अद्वैत वाद्यांनीं ५ ह्मटलें आहे.

सांख्य शास्त्रानेंहि भक्तीचा अंगीकार केला आहे, परंतु ती भक्ति अद्वैतपर नसल्यामुळें हा विशेष खुलासा केला आहे.

**उक्तसाधनसंपन्नः । तत्त्वजिज्ञासुः । आत्मनः । उपसीदेत् । गुरुं । प्राज्ञं । यस्मात् । बन्धविमोक्षणम् ।**

**अर्थः**–(वर) १ सांगितलेल्या साधन–चतुष्टयानें युक्त (अशा) २ आत्मस्वरूपाचें ३ तत्त्व जाणण्याची इच्छा करणाऱ्या (अधिकाऱ्यानें) ४ विद्वान् ५ गुरूला ६ शरण जावें, (ह्मणजे) ७ त्यांपासून--त्यांच्या कृपेनें--८ बंधापासून सुटका होईल.

साधनचतुष्टयसंपन्न अधिकारी पुरुषानें मोक्षप्राप्त्यर्थ श्रीगुरूलाच शरण गेलें पाहिजे.

**श्रोत्रियः । अवृजिनः । अकामहतः । यः । ब्रह्मवित्तमः । ब्रह्मणि । उपरतः । शान्तः । निरिन्धनः । इव । अनलः । अहेतुकदयासिन्धुः । बन्धुः । आनमतां । सताम् ॥ ३५ ॥**

**अर्थः**–१ ते (श्रीगुरु) २ वेदशास्त्रसंपन्न, ३ सदाचारी, ४ निरिच्छ, ५ उत्तम ब्रह्मवेत्ते, ६ आत्मस्वरूपीं ७ लीन, (रागद्वेषादिकांनीं) ८ संतप्त न होणारे, (ज्यानें) ९ काष्ठें जाळून टाकिलीं आहेत अशा १० अग्नी ११ प्रमाणें–लाल निखाऱ्याप्रमाणें (अतितेजस्वी) १२ कांहीं हेतु नसून केवळ दयेचे सागर व (प्रेमानें) १३ नमस्कार करणाऱ्या १४ सत्कर्म-परायण (अधिकाऱ्यांचे पित्याप्रमाणें) १५ हितकर्ते (असतात). ॥ ३३ ॥ ३४ ॥ ३५ ॥

श्रीगुरु कसे असतात तें येथें सांगितलें आहे ॥ ३३ ॥ ३४ ॥ ३५ ॥

**तमाराध्य गुरुं भक्त्या प्रह्वप्रश्रयसेवनैः ।**
**प्रसन्नं तमनुप्राप्य पृच्छेज्ज्ञातव्यमात्मनः ॥ ३६ ॥**

तं[1]म् । आ[४]राध्य । गु[२]रुं । भ[३]क्त्या । प्र[५]ह्वप्रश्रयसेवनैः । प्र[६]सन्नं । तं[७] । अ[८]नुप्राप्य । पृ[११]च्छेत् । ज्ञा[१०]तव्यं । आ[९]त्मनः ॥ ३६ ॥

**अर्थ**—१ त्या ( पूर्वोक्त लक्षणांनीं युक्त ) २ गुरूला ३ ( पादसंवाहनादि ) सेवेनें ४ प्रसन्न करून ( आणि ) ५ नमस्कार, नम्रता व भक्ति यांनीं ६ प्रसन्न झालेल्या ७ त्यांजवळ ८ जाऊन ( हात जोडून ) ९ आपणास (जें) १० जाणणें योग्य आहे (तें) ११ विचारावें. ॥३६॥

ह्या श्लोकांत अधिकारी शिष्याचें कर्तव्य सांगितलें आहे. ॥ ३६ ॥

**स्वामिन्नमस्ते नतलोकबन्धो**
**कारुण्यसिन्धो पतितं भवाब्धौ ।**
**मामुद्धरात्मीयकटाक्षदृष्ट्या**
**ऋज्व्यातिकारुण्यसुधाभिवृष्ट्या ॥ ३७ ॥**

स्वा[१]मिन् । न[५]मः । ते[४] । न[२]तलोकबन्धो । का[३]रुण्यसिन्धो । प[१०]तितं । भवा[९]ब्धौ । मां[११] । उद्ध[१२]र । आ[८]त्मीयकटाक्षदृष्ट्या । ऋ[७]ज्व्या । अ[६]तिकारुण्यसुधाभिवृष्ट्या ॥ ३७ ॥

**अर्थ**—१ स्वामिमहाराज, २ ( आपण ) नमस्कार करणाराला पित्याप्रमाणें वत्सल आहां, ३ कृपेचे सागर आहां, ४ आपणांस ( मी ) ५ नमस्कार करितों. ६ ( निर्निमित्त ) कृपारूप अमृताचा वर्षाव

करणाऱ्या ७ अति सरळ ( अशा ) ८ आपल्या मनोहर अवलोकनानें ९ संसारसमुद्रांत १० पडलेल्या ११ मला १२ वर काढा. ॥ ३७ ॥

ह्या व पुढील पांच श्लोकांत अधिकारी शिष्यानें श्रीगुरूंला शरण जाऊन कोणत्या प्रकारचे प्रश्न करावे हें सांगितलें आहे. ह्या श्लोकांत संसारसमुद्रांत बुडालेल्या मला वर काढा अशी प्रार्थना केली आहे. ॥ ३७ ॥

दुर्वारसंसारदवाग्नितप्तं
दोधूयमानं दुरदृष्टवातैः ।
भीतं प्रपन्नं परिपाहि मृत्योः
शरण्यमन्यद्यदहं न जाने ॥ ३८ ॥

दुर्वारसंसारदवाग्नितप्तं । दोधूयमानं । दुरदृष्टवातैः ॥ भीतं । प्रपन्नं । परिपाहि । मृत्योः । शरण्यं । अन्यत् । यत् । अहं । न । जाने ॥ ३८ ॥

**अर्थ**- १ संसाररूप अरण्यांतील ( कामक्रोधादिरूप ) दुःसह अग्नीनें पोळलेल्या, २ पापकर्मजन्यदुर्दैवरूप वाऱ्यांच्यायोगानें ३ कांपणाऱ्या, ४ मृत्यूपासून ५ भय पावलेल्या ( व आपणांस ) ६ शरण आलेल्या ( माझें ) ७ रक्षण करा; ८ कारण ( आपणाहून ) ९ दुसरा १० शरण जाण्याला योग्य ( असा ) ११ मी १२ जाणत १३ नाहीं. ॥ ३८ ॥

ह्यांत संसाराला वणव्याची उपमा देऊन त्यांतून सोडविण्याबद्दल प्रार्थना केली आहे. ॥ ३८ ॥

शान्ता महान्तो निवसन्ति सन्तो
वसन्तवल्लोकहितं चरन्तः ।
तीर्णाः स्वयं भीमभवार्णवं जना-
नहेतुनान्यानपि तारयन्तः ॥ ३९ ॥

शान्ताः । महान्तः । निवसन्ति । सन्तः । वसन्तवत् । लोकहितं । चरन्तः । तीर्णाः स्वयं । भीमभवार्णवं । जनान् । अहेतुना । अन्यान् । अपि । तारयन्तः ॥ ३९ ॥

**अर्थः**— ( अनेक पत्रपुष्पादिकांनीं ) १ ज्याप्रमाणें वसंत ऋतु ( लोकांचें हित करितो ) त्याप्रमाणें ( ज्ञानोपदेशानें ) २ लोकांचें कल्याण ३ करणारे, ( रागलोभादिकांनीं ) ४ क्षोभ न पावणारे, ५ थोर मनाचे ६ सत्पुरुष ७ स्वतः ८ भयंकर संसारसागर ९ तरून जाऊन ( कांहीं ) १० निमित्तावांचून परोपकारबुद्धीनेंच ११ इतर १२ लोकांना १३ हि १४ तारणारे ( जगांत ) १५ वास करीत आहेत. ॥ ३९ ॥

स्वतः भवसमुद्र तरून जाऊन मुमुक्षूंचें कल्याण करणारे आपणांसारखे दयाळु सज्जन ह्या पृथ्वीवर आहेत, ह्मणून मी शरण आलों आहें, माझा उद्धार करा; हा भाव ॥ ३९ ॥

अयं स्वभावः स्वत एव यत्पर-
श्रमापनोदप्रवणं महात्मनाम् ।
सुधांशुरेष स्वयमर्ककर्कश-
प्रभाभितप्तामवति क्षितिं किल ॥ ४० ॥

अयं । स्वभावः । स्वतः । एव । यत् । परश्रमापनोदप्रवणं । महात्मनाम् ॥ सुधांशुः । एषः । स्वयं । अर्ककर्कशप्रभाभितप्तां । अवति । क्षितिं । किल ॥ ४० ॥

**अर्थ**--१ थोर पुरुषांची २ जी ३ दुसऱ्यांचें दुःख निवारण करण्याविषयींची तत्परता आहे. ४ हा-तो-( त्यांचा ) ५ स्वभाव ( निमित्तावांचून ) ६ सहज ७ च ( आहे. ) ८ हा-आकाशवर्त्ती-प्रत्यक्ष- ९ चंद्र १० सूर्याच्या प्रखर तेजानें तापलेल्या ११ पृथ्वीचें १२ खरोखर १३ आपण होऊन ( आपल्या शीतल किरणांनीं ) १४ रक्षण करितो. ॥ ४० ॥

निमित्तावांचून केवल दयार्द्र अंतःकरणानें सत्पुरुष शरणागतांचें दुःखनिवारण करितात हें ह्यांत दृष्टांतपूर्वक सांगितलें आहे. ॥ ४० ॥

**ब्रह्मानन्दरसानुभूतिकलितैः पूतैः सुशीतैर्युतै-**
**र्युष्मद्वाक्कलशोज्झितैः श्रुतिसुखैर्वाक्यामृतैः सेचय।**
**संतप्तं भवतापदावदहनज्वालाभिरेनं प्रभो**
**धन्यास्ते भवदीक्षणक्षणगतेः पात्रीकृताः स्वीकृताः ४१**

ब्रह्मानंदरसानुभूतिकलितैः[5] । पूतैः[6] । सुशीतैः[7] । युतैः[8] । युष्मद्वाक्कलशोज्झितैः[9] । श्रुतिसुखैः[10] । वाक्यामृतैः[11] । सेचय[12] ॥ संतप्तं[3] । भवतापदावदहनज्वालाभिः[2] । एनं[4] । प्रभो[1] । धन्याः[17] । ते[16] । भवदीक्षणक्षणगतेः[13] । पात्रीकृताः[14] । स्वीकृताः[15] ॥ ४१ ॥

अर्थ–( हे ) १ प्रभो २ संसारसंबंधी ( आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक ह्या ) तापत्रयरूप दावाग्नीच्या ज्वालांनीं ३ संतप्त झालेल्या ४ ह्या ( मला ) ५ ब्रह्मानंदरूपरसाच्या अनुभवामुळें मधुर ( झालेल्या ) ६ पवित्र, ७ अतिशीतल, ८ सयुक्तिक, ९ आपल्या वाणीरूप कलशांतून बाहेर आलेल्या ( आणि ) १० कानाला आनंद देणाऱ्या ( अशा ) ११ उपदेशरूप अमृत ( धारांनीं ) १२ स्नान घाला. ( जे ) १३ आपल्या ( कृपा ) दृष्टीच्या क्षणमात्र गतीला पात्र १४ झाले-ज्यांकडे आपण क्षणमात्र कृपादृष्टीनें पाहिलें-( व ज्यांचा ) १५ आपण अंगीकार केला, १६ ते १७ धन्य ( होत. ) ॥ ४१ ॥

श्रीगुरूंच्या कृपाकटाक्षानेंच धन्य झालेला शिष्य आपणास उपदेशानें कृतार्थ करण्याविषयीं प्रार्थना करीत आहे. ॥ ४१ ॥

**कथं तरेयं भवसिन्धुमेतं**
**का वा गतिर्मे कतमोस्त्युपायः ।**

जाने न किञ्चित्कृपयाव मां प्रभो
संसारदुःखक्षतिमातनुष्व ॥ ४२ ॥

कथं[३] । तरेयं[४] । भवसिन्धुं[२] । एतं[१] । का[७] । वा[८] । गतिः[६] । मे[५] । कतमः[९] । अस्ति[११] । उपायः[१०] ॥ जाने[१३] । न[१४] । किञ्चित्[१२] । कृपया[१६] । अव[१८] । मां[१७] । प्रभो[१५] । संसारदुःखक्षतिं[१९] । आतनुष्व[२०] ॥ ४२ ॥

**अर्थ**–१ ह्या २ संसारसमुद्राला ( मी ) ३ कसा ४ तरून जाऊं? ५ माझी ६ गति ७ काय ( होईल )? ८ अथवा ( कर्म, उपासना, ज्ञान ह्यांतून सद्गतीचा ) ९ कोणता १० उपाय ११ आहे ( हें मी ) १२ कांहींच १३ जाणत १४ नाहीं. १५ प्रभो, १६ कृपा करून १७ माझें १८ रक्षण करा, ( आणि ) १९ संसारदुःखांचा नाश २० करा. ॥ ४२ ॥

याप्रमाणें शिष्यानें श्रीगुरूंला प्रार्थना करावी. ॥ ४२ ॥

तथा वदन्तं शरणागतं स्वं
संसारदावानलतापतप्तम् ।
निरीक्ष्य कारुण्यरसार्द्रदृष्ट्या
दद्यादभीतिं सहसा महात्मा ॥ ४३ ॥

तथा[१] । वदन्तं[२] । शरणागतं[४] । स्वं[३] । संसारदावानलतापतप्तं[५] ॥ निरीक्ष्य[७] । कारुण्यरसार्द्रदृष्ट्या[६] । दद्यात्[११] । अभीतिं[१०] । सहसा[९] । महात्मा[८] ॥ ४३ ॥

**अर्थ**–१ अशा--वर सांगितलेल्या--रीतीनें २ भाषण करणाऱ्या, ३ आपणास ४ शरण आलेल्या ( व ) ५ संसाररूपदावाग्नीच्या ज्वालांनीं संतप्त झालेल्या ( शिष्याकडे ) ६ कृपारसानें पूर्ण अशा कटाक्षपातानें

७ अवलोकन करून ८ थोर सत्पुरुषांनीं ( त्याला ) ९ त्वरित १० अभय ११ द्यावें. ॥ ४३ ॥

श्रीगुरूंनीं शरणागत शिष्याकरितां काय करावें तें ह्यांत व पुढील श्लोकांत सांगितलें आहे. ॥ ४३ ॥

विद्वान्स तस्मा उपसत्तिमीयुषे
मुमुक्षवे साधुयथोक्तकारिणे ।
प्रशान्तचित्ताय शमान्विताय
तत्त्वोपदेशं कृपयैव कुर्यात् ॥ ४४ ॥

विद्वान्[2] । सः[1] । तस्मै[8] । उपसत्तिं[6] । ईयुषे[7] । मुमुक्षवे[9] । साधु-यथोक्तकारिणे[3] । प्रशान्तचित्ताय[4] । शमान्विताय[5] । तत्त्वोपदेशं[12] । कृपया[11] । एवं[10] । कुर्यात्[13] ॥ ४४ ॥

अर्थ–१ त्या २ ब्रह्मनिष्ठ ( श्रीगुरूंनीं ) ३ वेदोक्तसत्कर्म करणाऱ्या, ४ शान्त चित्ताच्या, ५ शमयुक्त, ६ अनन्यभावानें शरण ७ आलेल्या ८ त्या ९ मुमुक्षुला १० केवळ ११ कृपादृष्टीनें १२ आत्मतत्त्वाचा उपदेश १३ करावा. ॥ ४४ ॥

शरणागत अधिकारी मुमुक्षूला श्रीगुरूंनीं केवळ दयार्द्र आत्मदृष्टीनेंच उपदेश करावा. ॥ ४४ ॥

मा भैष्ट विद्वंस्तव नास्त्यपायः
संसारसिंधोस्तरणेऽस्त्युपायः ।
येनैव याता यतयोऽस्य पारं
तमेव मार्गं तव निर्दिशामि ॥ ४५ ॥

मा[3] । भैष्ट[2] । विद्वन्[1] । तव[4] । न[11] । अस्ति[10] । अपायः[9] ॥

संसारसिन्धोः[4] । तरणे[5] । अस्ति[7] । उपायः[6] ॥ येन[12] । एव[13] । याताः[17] । यतयः[14] । अस्य[15] । पारं[16] । तं[18] । एव[19] । मार्गं[20] । तव[21] । निर्दिशामि[22] ॥ ४५ ॥

**अर्थ**–( हे पदपदार्थांची संगति ) १ जाणणाऱ्या ( शिष्यवर्या ), २ भिऊं ३ नको. ४ संसारसागर ५ तरून जाण्यास ६ उपाय ७ आहे. ( त्याच्या योगानें ) ८ तुझें ९ मृत्यूचें भय १० राहणार ११ नाहीं. १२ ज्या ( मार्गानें ) १३ च ( जितेंद्रिय ) १४ मुनि १५ ह्या ( संसार-सागराच्या ) १६ पार १७ गेले, १८ तो १९ च २० मार्ग २१ तुला २२ सांगतों. ॥ ४५ ॥

श्रीगुरु शिष्याप्रत भिऊं नको, तुला तरणोपाय सांगतों, असें आश्वासन देतात. ४५

**अस्त्युपायो महान्कश्चित्संसारभयनाशनः ।**
**तेन तीर्त्वा भवाम्भोधिं परमानन्दमाप्स्यसि ॥४६॥**

अस्ति[5] । उपायः[4] । महान्[3] । कश्चित्[2] । संसारभयनाशनः[1] ॥ तेन[6] । तीर्त्वा[8] । भवाम्भोधिं[7] । परमानन्दं[9] । आप्स्यसि[10] ॥ ४६ ॥

**अर्थ**–१ संसार भयाचा नाश करणारा २ एक ३ मोठा ४ उपाय ५ आहे. ६ त्याच्यायोगानें ७ संसारसागर ८ तरून जाऊन ९ निरतिशय ब्रह्मानंदाप्रत ( तूं ) १० प्राप्त होशील. ॥ ४६ ॥

या श्लोकांत पूर्वश्लोकांतील अर्थाचें दृढीकरण करून परमानंदप्राप्तिरूप परमपुरु-षार्थाचें कथन केलें आहे. ॥ ४६ ॥

**वेदान्तार्थविचारेण जायते ज्ञानमुत्तमम् ।**
**तेनात्यन्तिकसंसारदुःखनाशो भवत्यनु ॥४७॥**

वेदान्तार्थविचारेण[1] । जायते[4] । ज्ञानं[3] । उत्तमम्[2] ॥ तेन[6] । आत्यन्तिकसंसारदुःखनाशः[7] । भवति[8] । अनु[5] ॥ ४७ ॥

**अर्थ**—१ उपनिषदांचा तात्पर्यार्थ ( जो अद्वैतात्मा ) त्याच्या विवेकानें (साक्षात् मोक्षाला हेतुभूत असें) २ उत्कृष्ट ३ ज्ञान ४ होतें. ५ त्यानंतर ६ त्या (ज्ञानाच्या) योगानें ७ संसारदु:खांचा समूळ नाश ८ होतो. ४७

अद्वैतात्मबोधानें संसारदु:खें नाहींतशीं होतात. ॥ ४७ ॥

**श्रद्धाभक्तिध्यानयोगान्मुमुक्षोर्मुक्तेर्हेतून्वक्ति साक्षाच्छ्रुतेर्गीः । यो वा एतेष्वेव तिष्ठत्यमुष्य मोक्षोऽविद्याकल्पिताद्देहबन्धात् ॥ ४८ ॥**

**श्रद्धाभक्तिध्यानयोगान्[4] । मुमुक्षोः[3] । मुक्तेः[5] । हेतून्[7] । वक्ति[8] । साक्षात्[6] । श्रुतेः[1] । गीः[2] ॥ यः[9] । वै[10] । एतेषु[11] । एव[12] । तिष्ठति[13] । अमुष्य[14] । मोक्षः[17] । अविद्याकल्पितात्[15] । देहबन्धात्[16] ॥ ४८ ॥**

**अर्थ**—१ श्रुतींतील २ वाक्य ३ मुमुक्षूला ४ आस्तिक्यबुद्धि, अद्वैतात्मानुसंधान व विजातीयप्रत्ययरहित सजातीय प्रत्ययप्रवाह ( हे ) ५ मोक्षप्राप्तीचे ६ साक्षात् ७ उपाय ( आहेत असें ) ८ सांगतें. ९ जो ( पुरुष ) १० निश्चयेंकरून ह्या ११ ( पूर्वोक्त साधनांच्या ) १२ ठायींच १३ निष्ठा ठेवितो, १४ त्याला १५ अज्ञानानें कल्पिलेल्या १६ देहबंधनापासून १७ मोक्ष ( प्राप्त होतो ) ॥ ४८ ॥

ब्रह्मात्मैक्यज्ञानच मोक्षसाधन आहे. तथापि तें होण्यास श्रद्धा, भक्ति व ध्यानयोग हे साक्षात् हेतू आहेत. ॥ ४८ ॥

**अज्ञानयोगात्परमात्मनस्तव ह्यनात्मबंधस्तत एव संसृतिः । तयोर्विवेकोदितबोधवन्हिरज्ञानकार्यं प्रदहेत्समूलम् ॥ ४९ ॥**

**अज्ञानयोगात्[4] । परमात्मनः[1] । तव[2] । हि[3] । अनात्मबंधः[5] । ततः[6] । एव[7] । संसृतिः[8] ॥ तयोः[9] । विवेकोदितबोधवन्हिः[10] । अज्ञानकार्यं[12] । प्रदहेत्[13] । समूलम्[11] ॥ ४९ ॥**

**अर्थ**--( वास्तविक ) १ परमात्मस्वरूप ( अशा ) २ तुला ३ च ४ अज्ञानाच्या योगानें ( देहादि ) ५ अनात्म–जड–वस्तूंच्या ठिकाणीं ( मी व माझें अशा प्रकारचें मिथ्याभिमानरूप ) बंधन ( प्राप्त झालें ). ६ त्यापासून ७ च ८ संसार ( झाला ). ९ त्या ( आत्मा व अनात्मा या दोन वस्तूंच्या ) १० विवेकानें उदयास आलेला ज्ञानरूप अग्नि ११ मूलाज्ञानासहित ( अहंता ममताभिमानादि ) १२ अज्ञानकार्यरूप ( शुष्क तृणाला ) १३ जाळून भस्म करील. ॥ ४९ ॥

बंध वास्तविक नसून केवळ स्वरूपाच्या अज्ञानामुळेंच कल्पित केला आहे. तो स्वरूपज्ञानानें निवृत्त होईल. ॥ ४९ ॥

शिष्य उवाच ।

**कृपया श्रूयतां स्वामिन् प्रश्नोऽयं क्रियते मया ।**
**यदुत्तरमहं श्रुत्वा कृतार्थः स्यां भवन्मुखात् ॥ ५० ॥**

**शिष्यः । उवाच ॥ कृपया[6] । श्रूयतां[7] । स्वामिन्[1] । प्रश्नः[4] । अयं[3] । क्रियते[5] । मया[2] ॥ यदुत्तरं[9] । अहं[11] । श्रुत्वा[10] । कृतार्थः[12] । स्यां[13] । भवन्मुखात् ॥ ५० ॥**

**अर्थः**–शिष्य ह्मणाला, १ स्वामिमहाराज, २ मी ३ हा ४ प्रश्न ५ करीत आहें. ६ कृपा करून ७ ऐकावा. ८ आपल्या मुखांतून ९ त्याचें उत्तर १० ऐकून ११ मी १२ कृतार्थ १३ होईन.

श्रीगुरूंस शिष्य पुढील प्रश्न करीत आहे. ॥ ५० ॥

**को नाम बन्धः कथमेष आगतः कथं प्रति-**
**ष्ठाऽस्य कथं विमोक्षः । कोऽसावनात्मा परमः क**
**आत्मा तयोर्विवेकः कथमेतदुच्यताम् ॥ ५१ ॥**

**कः[3] । नाम[1] । बन्धः[2] । कथं[5] । एषः[4] । आगतः[6] । कथं[9] । प्रतिष्ठा[8] । अस्य[7] । कथं[11] । विमोक्षः[10] ॥ कः[14] । असौ[12] । अनात्मा[13] । परमः[15] । कः[17] । आत्मा[16] । तयोः[18] । विवेकः[19] । कथं[20] । एतद्[21] । उच्यताम्[22] ॥ ५१ ॥**

अर्थः–१ प्रसिद्ध २ बंध ३ कोणता? ४ हा ( बंध नित्यमुक्त आत्म्याच्या ठिकाणीं ) ५ कसा ६ आला? ७ ह्याची ८ स्थिति ९ कशी ( झाली आणि ह्यापासून ) १० सुटका ११ कशी ( होईल )? १२ हा १३ अनात्मा १४ कोण ( व ) १५ स्वरूपभूत १६ परमात्मा १७ कोण ( आणि ) १८ त्या ( आत्मा आणि अनात्मा अशा ) दोहोंचा १९ विवेक २० कसा? २१ हें २२ सांगावें.

बंध, मोक्ष, आत्मा, अनात्मा इत्यादि काय आहेत तें मला सांगा. ॥ ५१ ॥

श्रीगुरुरुवाच ।

**धन्योऽसि कृतकृत्योऽसि पावितं ते कुलं त्वया ।**
**यदविद्याबन्धमुक्त्या ब्रह्मीभवितुमिच्छसि ॥५२॥**

श्रीगुरुः । उवाच ॥ धन्यः । असि । कृतकृत्यः । असि । पावितं । ते । कुलं । त्वया ॥ यद् । अविद्याबन्धमुक्त्या । ब्रह्मीभवितुं । इच्छसि ॥ ५२ ॥

अर्थः–श्रीगुरु ह्मणाले, ( तूं ) १ धन्य २ आहेस ( व ) ३ कृतकृत्य -करण्यास योग्य तें केलें आहे ज्यानें असा-पूर्णकाम-४ आहेस. ५ तूं ६ आपलें ७ कुल ८ पवित्र केलें आहेस. ९ कारण १० अविद्याबंधनापासून मुक्त होऊन ११ ब्रह्मरूप होण्यास १२ इच्छित आहेस. ॥ ५२ ॥

प्रश्न ऐकून श्रीगुरु शिष्याचें अभिनंदन करितात. ॥ ५२ ॥

**ऋणमोचनकर्तारः पितुः सन्ति सुतादयः ।**
**बन्धमोचनकर्ता तु स्वस्मादन्यो न कश्चन ॥५३॥**

ऋणमोचनकर्तारः । पितुः । सन्ति । सुतादयः ॥ बन्धमोचनकर्ता । तु । स्वस्मात् । अन्यः । न । कश्चन ॥ ५३ ॥

अर्थः–१ पित्याचें २ कर्ज फेडणार ३ पुत्र वगैरे ४ असतात; ५ परंतु ( जन्ममरणरूप संसार ) ६ बंधांतून सोडविणारा ७ स्वतांहून ८ दुसरा ९ कोणीही १० नाहीं. ॥ ५३ ॥

इतर गोष्टींत आपल्या कुटुंबांतील माणसांचा उपयोग होईल; परंतु आत्मप्राप्ती-करितां स्वतांच प्रयत्न केला पाहिजे. ॥ ५३ ॥

**मस्तकन्यस्तभारादेर्दुःखमन्यैर्निवार्यते ।**
**क्षुधादिकृतदुःखं तु विना स्वेन न केनचित् ॥ ५४ ॥**

मस्तकन्यस्तभारादेः । दुःखं । अन्यैः । निवार्यते ॥ क्षुधादि-कृतदुःखं । तु । विना । स्वेन । न । केनचित् ॥ ५४ ॥

अर्थ—१ मस्तकावर ठेवलेल्या ओझ्याच्या किंवा दुसऱ्या कशाच्या २ दुःखाचें ३ दुसऱ्यांकडून ४ निवारण होतें; ५ परंतु ६ भूक, तहान वगैरे लागून झालेलें दुःख ७ स्वतां ( खाल्यापिल्या ) ८ शिवाय ९ कोणाकडूनहि ( दूर ) १० होत नाहीं. ॥ ५४ ॥

बंधनापासून मुक्त होण्यास स्वतांच यत्न केला पाहिजे, हें एथें दृष्टांतपूर्वक सांगितलें आहे. ॥ ५४ ॥

**पथ्यमौषधसेवा च क्रियते येन रोगिणा ।**
**आरोग्यसिद्धिर्दृष्टास्य नान्यानुष्ठितकर्मणा ॥ ५५ ॥**

पथ्यं । औषधसेवा । च । क्रियते । येन । रोगिणा ॥ आरोग्यसिद्धिः । दृष्टा । अस्य । न । अन्यानुष्ठितकर्मणा ॥ ५५ ॥

अर्थ—१ जो २ रोगी ३ औषधसेवन ४ आणि ५ पथ्य ६ करितो ७ त्याला ८ आरोग्य प्राप्त झाल्याचें ९ पाहण्यांत येतें. १० दुसऱ्यानें केलेल्या ( औषधसेवनपथ्यरूप ) कर्मानें ( आरोग्य झालेलं पाहण्यांत येत ) ११ नाहीं. ॥ ५५ ॥

स्वरूपस्थितिरूप मोक्ष आपल्या यत्नानेंच होतो हें सदृष्टांत सांगितलें. ॥ ५५ ॥

**वस्तुस्वरूपं स्फुटबोधचक्षुषा स्वेनैव वेद्यं न तु पण्डितेन ।**
**चन्द्रस्वरूपं निजचक्षुषैव ज्ञातव्यमन्यैरवगम्यते किम् ॥ ५६ ॥**

वस्तुस्वरूपं । स्फुटबोधचक्षुषा । स्वेन । एव । वेद्यं । न ।

तुं । पण्डितेन ॥ चन्द्रस्वरूपं । निजचक्षुषा । एवं । ज्ञातव्यं । अन्यैः । अवगम्यते । किम् ॥ ५६ ॥

**अर्थ**–( सर्व दृश्याच्या बोधाचें अवधीभूत जें ) १ आत्मस्वरूप ( तें ) २ स्वतांकडून ३ च ४ शुद्ध ज्ञानदृष्टीनें-संशयविपर्ययरहित आत्मसाक्षात्कारानें–५ जाणावयाचें आहे, ६ आणि ( आपल्या यत्नावांचून स्वतांहून भिन्न ) ७ पंडिताकडून ( त्याचें जाणणें संभवत ) ८ नाहीं. ९ चंद्राचें स्वरूप १० आपल्या नेत्रानें ११ च १२ जाणावयाचें आहे. १३ दुसऱ्यांच्या ( अनेक नेत्रांनीं तें आपणांस ) १४ कळेल १५ काय? ॥ ५६ ॥

ब्रह्मात्मबोध स्वप्रयत्नानेंच होतो, हें दृष्टांतपूर्वक सांगितलें आहे. ॥ ५६ ॥

**अविद्याकामकर्मादिपाशबन्धं विमोचितुम् ।**
**कः शक्नुयाद्विनात्मानं कल्पकोटिशतैरपि ॥५७॥**

अविद्याकामकर्मादिपाशबन्धं । विमोचितुम् ॥ कः । शक्नुयात् । विना । आत्मानं । कल्पकोटिशतैः । अपि ॥ ५७ ॥

**अर्थ**–१ स्वतां २ वांचून ३ शेंकडों कोटी * कल्प गेले तरी ४ हि ५ अविद्या, काम, कर्म इत्यादि पाशांनीं केलेलें बंधन ६ सोडविण्यास ७ कोण ८ समर्थ होईल? ॥ ५७ ॥

अविद्यादि पाशांच्या बंधनापासून मुक्त होण्यास स्वतांच झटलें पाहिजे ॥५७॥

**न योगेन न सांख्येन कर्मणा नो न विद्यया ।**
**ब्रह्मात्मैकत्वबोधेन मोक्षः सिद्ध्यति नान्यथा ॥५८॥**

न । योगेन । न । सांख्येन । कर्मणा । नो । न । विद्यया ॥ ब्रह्मात्मैकत्वबोधेन । मोक्षः । सिद्ध्यति । न । अन्यथा ॥५८॥

**अर्थ**–१ मोक्ष २ हटयोगानें ३ सिद्ध होत ४ नाहीं, ५ सांख्यानें,–प्रकृतिपुरुषांच्या भेदज्ञानानें–होत ६ नाहीं, ७ कर्मानें होत ८ नाहीं,

---

* पुष्कळ काल गेल्यावरही असा अर्थ. कल्प ह्मणजे ब्रह्मदेवाचा एक दिवस किंवा १००० युगें ह्मणजे पृथ्वीवरील ४३२०००००० इतकीं वर्षें. एक युगाचीं वर्षे ४३२००००

( केवल शास्त्रपठनरूप ) ९ विद्येनें १० होत नाहीं; ( तर ) ११ ब्रह्म आणि आत्मा ह्यांच्या एकत्वज्ञानानें ( च होतो; उपासनादि ) १२ दुसऱ्या कोणत्याहि प्रकारांनीं १३ होत नाहीं. ॥ ५८ ॥

जीवब्रह्मांच्या ऐक्यज्ञानावांचून मोक्षप्राप्तीला अन्य साधनच नाहीं. ॥ ५८ ॥

**वीणाया रूपसौन्दर्यं तन्त्रीवादनसौष्ठवम् ।**
**प्रजारञ्जनमात्रं तन्न साम्राज्याय कल्पते ॥ ५९ ॥**

वीणायाः[1] । रूपसौन्दर्यं[2] । तन्त्रीवादनसौष्ठवम्[3] ॥ प्रजा-[4]रञ्जनमात्रं । तत्[5] । न[8] । साम्राज्याय[6] । कल्पते[7] ॥ ५९ ॥

**अर्थ**—१ सतारीचा २ सुंदर आकार किंवा ३ तिच्या तारांतून निघणारा मधुर ध्वनि ४ लोकांचें मनोरंजन करणारा मात्र ( आहे ). ५ तें ( सर्व ) ६ साम्राज्य ( देण्यास ) ७ समर्थ होत ८ नाहीं. ॥ ५९ ॥

नाशवंत फल देणाऱ्या साधनांचा ब्रह्मात्मैक्यबोधरूप साम्राज्य मिळण्यास उपयोग नाहीं हें दृष्टांतानें सांगितलें आहे. ॥ ५९ ॥

**वाग्वैखरी शब्दझरी शास्त्रव्याख्यानकौशलम् ।**
**वैदुष्यं विदुषां तद्वद्भुक्तये न तु मुक्तये ॥ ६० ॥**

वाग्[2] । वैखरी[1] । शब्दझरी[3] । शास्त्रव्याख्यानकौशलम्[4] ॥ वैदुष्यं[6] । विदुषां[7] । तद्वत्[5] । भुक्तये[8] । न[11] । तु[9] । मुक्तये[10] ॥ ६० ॥

**अर्थ** १ * वैखरी २ वाणी ३ शब्दांचा झरा आहे ( गूढार्थ सूत्रादि ) ४ शास्त्रांची व्याख्या करण्यांत कौशल्य ( आणि ) ५ त्याप्रमाणेंच ( सर्व शास्त्रसंपन्नतादि ) ६ विद्वत्ता ( हीं लौकिक ) ७ विद्वानांस ८ ( कुटुंबपोषणादि ) भोगाच्याच उपयोगी ( आहेत; ) ९ परंतु १० मोक्षाच्या उपयोगी ११ नाहींत. ॥ ६० ॥

लौकिक विद्वत्ता व हुषारी हीं मोक्ष देणारीं नसून केवळ उदरनिर्वाहाचीं व कुटुंबभरणाचीं साधनें आहेत. ॥ ६० ॥

* परा, पश्यन्ती, मध्यमा आणि वैखरी अशा चार वाचा आहेत, त्यांपैकीं पहिल्या तीन अस्पष्ट असून स्पष्ट बोलण्याची जी वाचा तीच वैखरी होय.

**अविज्ञाते परे तत्त्वे शास्त्राधीतिस्तु निष्फला ।**
**विज्ञातेऽपि परे तत्त्वे शास्त्राधीतिस्तु निष्फला ॥ ६१ ॥**

अविज्ञाते[3] । परे[1] । तत्त्वे[2] शास्त्राधीतिः[5] । तु[4] । निष्फला[6] ॥
विज्ञाते[9] । अपि[10] । परे[7] । तत्त्वे[8] । शास्त्राधीतिः[11] । तु[12] । निष्फला[13] ॥ ६१ ॥

अर्थः—( अविद्येहून ) १ पर ( अशा ) २ परमात्मस्वरूपाचा ३ साक्षात्कार झाला नाहीं, ४ तर नुसता ५ शास्त्राभ्यास ६ निष्फल ( आहे ). ( तसेंच ) ७ परमात्म ८ स्वरूपाचा ९ साक्षात्कार झाला १० असतांहि ११ शास्त्राध्ययन १२ केवळ १३ निष्फळ ( आहे ). ॥ ६१ ॥

ब्रह्मात्मैक्यबोधावांचून शास्त्राध्ययन निष्फल आहे व बोधानंतर त्याचा उपयोग नाहीं ह्मणून तें निष्फल आहे ॥ ६१ ॥

**शब्दजालं महारण्यं चित्तभ्रमणकारणम् ।**
**अतः प्रयत्नाज्ज्ञातव्यं तत्त्वज्ञैस्तत्त्वमात्मनः ॥ ६२ ॥**

शब्दजालं[1] । महारण्यं[2] । चित्तभ्रमणकारणम्[3] ॥ अतः[4] । प्रयत्नात्[6] । ज्ञातव्यं[9] । तत्त्वज्ञैः[5] । तत्त्वं[8] । आत्मनः[7] ॥ ६२ ॥

अर्थ—१ शब्द जाल—विचारावांचून नाना शास्त्रांतील केवळ शब्द व त्यांचे अर्थ समजणें—( हें एक ) २ महा अरण्य ( आहे व तें ) ३ चित्ताला भ्रम पाडण्याला कारण ( आहे ). ४ यास्तव ५ विचारी पुरुषांनीं ६ प्रयत्नानें ७ प्रत्यगात्म्याचें ८ वास्तविक स्वरूप ९ समजून घ्यावें.

विवेकशून्य पाण्डित्य अनर्थाला कारण आहे ॥ ६२ ॥

**अज्ञानसर्पदष्टस्य ब्रह्मज्ञानौषधं विना ।**
**किमु वेदैश्च शास्त्रैश्च किमु मन्त्रैः किमौषधैः ॥ ६३ ॥**

अज्ञानसर्पदष्टस्य[1] । ब्रह्मज्ञानौषधं[2] । विना[3] ॥ किमु[7] । वेदैः[4] । च[5] । शास्त्रैः[6] । च[8] । किमु[9] । मन्त्रैः[10] । किं[12] । औषधैः[11] ॥ ६३ ॥

* तत्त्वज्ञैः ह्याबद्दल "तत्त्वज्ञात्" असाहि पाठ आढळतो. तत्त्वज्ञात् ह्मणजे तत्त्ववेत्त्याजवळून.

**अर्थः**–१ आत्माज्ञानरूप सर्पानें ज्याला दंश केला आहे त्या ( गुरु-षाला ) २ ब्रह्मज्ञानरूप औषधां ३ वांचून ४ वेदांचा ५ आणि ६ शास्त्रांचा ७ काय ( उपयोग होणार आहे? ) ८ आणि ९ मंत्रांचा १० काय ( उपयोग व ) ११ औषधांचा १२ काय ( उपयोग होणार आहे ? )

अज्ञाननिवृत्ति ब्रह्मज्ञानावांचून व्हावयाची नाहीं ॥ ६३ ॥

**न गच्छति विना पानं व्याधिरौषधशब्दतः ।**
**विनाऽपरोक्षानुभवं ब्रह्मशब्दैर्न मुच्यते ॥ ६४ ॥**

**न । गच्छति । विना । पानं । व्याधिः । औषधशब्दतः ॥**
**विना । अपरोक्षानुभवं । ब्रह्मशब्दैः । न । मुच्यते ॥ ६४ ॥**

**अर्थ**–( औषध ) १ प्यालया २ वांचून ३ औषध शब्दाचा उच्चारानें ४ रोग ५ जात ६ नाहीं. ( तद्वत् ) ७ अपरोक्षानुभवा ८ वांचून ( मी ब्रह्म आहें, तूं ब्रह्म आहेस, हें सर्व ब्रह्म आहे अशा नुसत्या ) ९ ब्रह्म शब्दानें १० मोक्ष प्राप्त होत नाहीं. ॥६४॥

नुसतें शाब्दिक ज्ञान उपयोगी नाहीं हें दृष्टांतपूर्वक कथन केलें आहे. ॥६४॥

**अकृत्वा दृश्यविलयमज्ञात्वा तत्त्वमात्मनः ॥**
**ब्रह्मशब्दैः* कुतो मुक्तिरुक्तिमात्रफलैर्नृणाम् ॥ ६५ ॥**

**अकृत्वा । दृश्यविलयं । अज्ञात्वा । तत्त्वं । आत्मनः ॥**
**ब्रह्मशब्दैः । कुतः । मुक्तिः । उक्तिमात्रफलैः । नृणाम् ॥ ६५ ॥**

**अर्थ**–( दृश्य झालेंच नाहीं अशा बोधानें ) १ दृश्याचा लय २ केल्यावांचून ( व ) ३ आत्मस्वरूपाचें ४ यथार्थत्व ५ जाणल्यावांचून ६ केवळ कंठशोष हेंच फल देणाऱ्या ७ " ब्रह्म " " ब्रह्म " ( अशा ) शब्दांनीं ८ पुरुषांना ९ मुक्ति १० कोठून ( होणार ) ? ॥ ६५ ॥

आत्मसाक्षात्काराला यथार्थ स्वरूपज्ञानच अवश्य आहे, नुसता शब्दोच्चार उपयोगी नाहीं. ॥ ६५ ॥

---

* कोठें " बाह्यशब्दैः " असाहि पाठ आढळतो. बाह्य ह्मणजे पोकळ, अर्थहीन.

**अकृत्वा शत्रुसंहारमगत्वाऽखिलभूश्रियम् ।**
**राजाहमिति शब्दान्नो राजा भवितुमर्हति ॥६६॥**

अकृत्वा । शत्रुसंहारं । अगत्वा । अखिलभूश्रियम् ॥ राजा । अहं । इति । शब्दात् । नो । राजा । भवितुं । अर्हति ॥६६॥

अर्थः—१ शत्रूंचा नाश २ केल्यावांचून ( दिग्विजयानें ) ३ संपूर्ण पृथ्वीचें ऐश्वर्य ४ मिळविल्यावांचून ५ मी ( सार्वभौम ) ६ राजा ( आहे ) ७ अशा ८ शब्दोच्चारानें ( कोणी ) ९ राजा १० होण्यास ११ पात्र होत १२ नाहीं. ॥ ६६ ॥

केवळ शब्दमात्रानें ज्ञान होत नाहीं हें दृष्टांतानें सांगितलें आहे. ॥ ६६ ॥

**आप्तोक्तिं खननं तथोपरिशिलाद्युत्कर्षणं स्वीकृतिं**
**निक्षेपः समपेक्षते नहि बहिः शब्दैस्तु निर्गच्छति ।**
**तद्वद्ब्रह्मविदोपदेशमननध्यानादिभिर्लभ्यते**
**मायाकार्यतिरोहितं स्वममलं तत्त्वं न दुर्युक्तिभिः ॥६७**

आप्तोक्तिं । खननं । तथा । उपरिशिलाद्युत्कर्षणं । स्वीकृतिं । निक्षेपः समपेक्षते । न । हि । बहिः । शब्दैः । तु । निर्गच्छति ॥ तद्वत् । ब्रह्मविदोपदेशमननध्यानादिभिः । लभ्यते । मायाकार्यतिरोहितं । स्वं । अमलं । तत्त्वं । न । दुर्युक्तिभिः ६७

अर्थः—१ जमिनींत पुरून ठेविलेलें द्रव्य ( काढण्यास ) २ प्रामाणिक मनुष्याचें सांगणें, ३ खणणें, ४ तसेंच ५ वर ( असलेला ) दगड वगैरे काढणें ( व तें ) ६ घेणें ( ह्या गोष्टींची ) ७ अपेक्षा असते; ८ आणि ( “ तूं बाहेर ये ” इत्यादि नुसत्या ) ९ शब्दांनीं ( तें ) १० बाहेर ११ निघत १२ नाहीं १३ च. १४ त्याप्रमाणें १५ शुद्ध १६ अविनाशी ब्रह्मरूप १७ आत्मधन मायेनें १८ ( व ) तिच्या कार्यानें झाकलेलें ( आहे तें ) १९ ब्रह्मवेत्त्यांच्या उपदेशानें ( व ) मनन-

ध्यानादिकांनीं २० प्राप्त होतें; ( वेदान्ताविरुद्ध ) २१ कुतर्कांनीं २२ होत नाहीं. ॥ ६७ ॥

नैयायिकादिकांच्या तर्कांनीं आत्मसाक्षात्कार होणें शक्य नाहीं हें एथें दृष्टांत-पूर्वक सांगितलें आहे. ॥ ६७ ॥

**तस्मात्सर्वप्रयत्नेन भवबन्धविमुक्तये ।**
**स्वैरेव यत्नः कर्तव्यो रोगादाविव पण्डितैः ॥ ६८ ॥**

तस्मात्[१] । सर्वप्रयत्नेन[२] । भवबन्धविमुक्तये[३] । स्वैः[७] । एव[८] । यत्नः[९] । कर्तव्यः[१०] रोगादौ[५] । इव[६] । पण्डितैः[४] ॥ ६८ ॥

**अर्थः**—१ यास्तव हे २ सर्व * प्रयत्नांच्या इना-स्वामि-सर्व प्रयत्न करण्यास समर्थ-( शिष्या ), ३ संसारबंधनापासून सुटण्याकरितां ४ शहाण्या मनुष्यांनीं ( त्यांना स्वतःला ) ५ रोग वगैरे झाला असतां ६ जसा ( यत्न केला पाहिजे तसा ) ७ स्वतः ८ च ९ यत्न १० करावा. ॥ ६८ ॥

मोक्षाकरितां स्नानभोजनादिकांचीही उपेक्षा करून प्रयत्न करावा व असा प्रयत्न करणारा तोच सर्व प्रयत्नांचा स्वामी आहे हें या श्लोकाचें तात्पर्य आहे. ॥ ६८ ॥

**यस्त्वयाद्य कृतः प्रश्नो वरीयाञ्शास्त्रविन्मतः ॥**
**सूत्रप्रायो निगूढार्थो ज्ञातव्यश्च मुमुक्षुभिः ॥ ६९ ॥**

यः[३] । त्वया[२] । अद्य[१] । कृतः[५] । प्रश्नः[४] । वरीयान्[६] । शास्त्रविन्मतः[७]। सूत्रप्रायः[९] । निर्गूढार्थः । ज्ञातव्यः[१२] । च[१०] । मुमुक्षुभिः[११] ॥ ६९ ॥

**अर्थः**—१ आज २ तूं ३ जो ४ प्रश्न ५ केलास ( तो ) ६ फार चांगला ( असून ) ७ शास्त्रवेत्त्यांना संमत ( आहे ). ( त्यांतील ) ८ थोड्या शब्दांनीं पुष्कळ अर्थ ( होत असल्यामुळें तो ) ९ सूत्रासारखा

---

* " सर्वप्रयत्नेन " ह्याचा " सर्व प्रकारचा किंवा संपूर्ण प्रयत्न करून " असाहि अर्थ होईल. " प्रयतनेन " या पदांत प्रयत्न आणि इन असे दोन शब्द घेऊन वरील अर्थ केला आहे.

( आहे ), १० आणि ( दुसऱ्या ) ११ मुमुक्षुंनीं १२ जाणण्यास योग्य आहे. ॥ ६९ ॥

यांतप्रश्नाच्या योग्यतेची प्रशंसा केली आहे. ॥ ६९ ॥

**श्रृणुष्वावहितो विद्वन् यन्मया समुदीर्यते ।**
**तदेतच्छ्रवणात्सद्यो भवबन्धाद्विमोक्ष्यसे ॥ ७० ॥**

श्रृणुष्व[७] । अवहितः[६] । विद्वन्[१] । यत्[२] । मया[३] । समुदीर्यते[४] । तत्[५] । एतच्छ्रवणात्[८] । सद्यः[१०] । भवबन्धात्[९] । विमोक्ष्यसे[११] ॥ ७० ॥

**अर्थः**—हे १ सुज्ञ ( शिष्या ) , २ जें ३ मी ४ सांगतों ५ तें ६ लक्ष्यपूर्वक ७ श्रवणकर ८ ह्याच्या श्रवणानें ९ संसारबंधनापासून १० तत्काल ११ मुक्त होशील. ॥ ७० ॥

सावधपणें गुरूपदेश श्रवण केल्यानें मोक्ष मिळेल. ॥ ७० ॥

**मोक्षस्य हेतुः प्रथमो निगद्यते**
**वैराग्यमत्यन्तमनित्यवस्तुषु ।**
**ततः शमश्चापि दमस्तितिक्षा**
**न्यासः प्रसक्ताखिलकर्मणां भृशम् ॥ ७१ ॥**

मोक्षस्य[४] । हेतुः[६] । प्रथमः[५] । निगद्यते[७] । वैराग्यं[३] । अत्यन्तं[२] । अनित्यवस्तुषु[१] ॥ ततः[८] । शमः[९] । च[१०] । अपि[११] । दमः[१२] । तितिक्षा[१३] । न्यासः[१६] । प्रसक्ताखिलकर्मणां[१४] । भृशम्[१५] ॥ ७१ ॥

**अर्थः**—१ अनित्य वस्तूंच्या ठिकाणीं ( जें ) २ तीव्र ३ वैराग्य ( त्यास ) ४ मोक्षाचें ५ पहिलें—मुख्य—६ कारण ७ ह्मटलें आहे. ८ त्यानंतर ९ शम १० आणि ११ तसाच १२ दम, १३ तितिक्षा ( व ) १४ शुभाशुभ सर्व कर्मांचा १५ अत्यंत १६ त्याग ( ही आहेत ). ॥ ७१ ॥

मोक्षाचीं चार साधनें सांगितली त्यांत वैराग्य मुख्य असून त्याच्यामागून शमादि आहेत. ॥ ७१ ॥

ततः श्रुतिस्तन्मननं सतत्व-
ध्यानं चिरं नित्यनिरन्तरं मुनेः ।
ततोऽविकल्पं परमेत्य विद्वा-
निहैव निर्वाणसुखं समृच्छति ॥ ७२ ॥

ततः[१] । श्रुतिः[२] । तन्मननं[३] । सतत्त्वध्यानं[७] । चिरं[५] । नित्यनिरंतरं[६] । मुनेः[४] ॥ ततः[८] । अविकल्पं[९] । परं[१०] । एत्य[११] । विद्वान्[१२] । इह[१३] । एव[१४] । निर्वाणसुखं[१५] । समृच्छति[१६] ॥ ७२॥

**अर्थः**—१ नंतर २ श्रवण-वेदांत शास्त्र ऐकणें-३ त्या (श्रवणाचें) मनन, (आणि त्यानंतर मननशील अशा) ४ मुनीनें-मुमुक्षूनें ५ पुष्कळवेळपर्यंत ६ एकसारखें अखंड ७ निदिध्यासन (करावें). (इतकं झाल्या) ८ नंतर ९ निर्विकल्प १० परब्रह्माप्रत ११ प्राप्त होऊन १२ विद्वान् १३ ह्या लोकींच १४ जिवंतपणींच-१५ आत्मानंदाप्रत १६ पावतो.

वैराग्यादि संपत्तीनंतर श्रवण, मनन आणि निदिध्यासन हीं साक्षात्काराला अवश्य आहेत. ॥ ७२ ॥

यद्बोद्धव्यं तवेदानीमात्मानात्मविवेचनम् ।
तदुच्यते मया सम्यक् श्रुत्वात्मन्यवधारय ॥ ७३ ॥

यत्[१] । बोद्धव्यं[४] । तव[३] । इदानीं[६] । आत्मानात्मविवेचनम्[२] ॥ तत्[५] । उच्यते[९] । मया[७] । सम्यक्[८] । श्रुत्वा[१०] । आत्मनि[११] । अवधारय[१२] ॥ ७३॥

**अर्थः**—१ जो २ आत्मा व अनात्मा ह्यांचा विवेक ३ तुला ४ जाणावयाचा (आहे) ५ तो ६ आतां ७ मीं ८ उत्तमरीतीनें ९ सांगतों. (तो) १० ऐकून ११ चित्तांत १२ निश्चयपूर्वक धारण कर. ॥७३ ॥

ह्यांत आत्मानात्मविवेक सांगण्याची प्रतिज्ञा केली आहे. ॥ ७३ ॥

मज्जास्थिमेदःपलरक्तचर्म-

त्वगाह्वयैर्धातुभिरेभिरन्वितम् ।
पादोरुवक्षोभुजपृष्ठमस्तकै-
रङ्गै रुपाङ्गैरुपयुक्तमेतत् ॥ ७४ ॥
अहं ममेति प्रथितं शरीरं
मोहास्पदं स्थूलमितीर्यते बुधैः ।
नभोनभस्वद्दहनांबुभूमयः
सूक्ष्माणि भूतानि भवन्ति तानि ॥७५॥
परस्परांशैर्मिलितानि भूत्वा
स्थूलानि च स्थूलशरीरहेतवः ।
मात्रास्तदीया विषया भवन्ति
शब्दादयः पञ्च सुखाय भोक्तुः ॥ ७६ ॥

( एथें चवऱ्याहत्तरावा श्लोक व पंचाहत्तराव्याचें पूर्वार्ध मिळून एक वाक्य, पंचाहत्तराव्या श्लोकाचें उत्तरार्ध आणि शहात्तराव्याचें पूर्वार्ध मिळून एक वाक्य, व शहात्तराव्याचें उत्तरार्ध एकवाक्य अशीं तीन वाक्यें आहेत. )

[1]मज्जास्थिमेदःपलरक्तचर्मत्वगाव्हयैः ( त्वच् आव्हय ) । [3]धातुभिः । [2]एभिः । [4]अन्वितं ॥ [5]पादोरुवक्षोभुजपृष्ठमस्तकैः । [6]अङ्गैः । [7]उपाङ्गैः । [8]उपयुक्तं । [14]एतत् । [9]अहं । [10]मम । [11]इति । [13]प्रथितं । [15]शरीरं । [12]मोहास्पदं । [16]स्थूलं । [17]इति । [19]ईर्यते । [18]बुधैः ॥

**अर्थः**–१ मज्जा, अस्थि, मेद, मांस, रक्त, चर्म ( व ) त्वचा ह्या नांवाच्या २ ह्या--प्रत्यक्ष असणाऱ्या-- ( सात ) ३ धातूंनीं ४ भरलेलें; ५ पाय, मांड्या, छाती, बाहु, पाठ ( आणि ) मस्तक ( ह्या ) ६ अंगांनीं--अवयवांनीं-( व ) ७ उपांगांनीं ८ युक्त, ( आणि ) ९ मी ( व ) १० माझें ११ अशा १२ मोहाचेंस्थान ( ह्मणून ) १३ प्रसिद्ध

असलेलें १४ हें १५ शरीर १६ स्थूल ( आहे ) १७ असें १८ विद्वानांनीं १९ ह्मटलें आहे.

अनात्म वस्तूंपैकीं प्रथम स्थूलदेहाचें स्वरूप सांगितलें.

**नभोनभस्वद्दहनांबुभूमयः ( नभः नभस्वत् दहन अंबु भूमि )। सूक्ष्माणि । भूतानि । भवन्ति । तानि ॥ परस्परांशैः । मिलितानि । भूत्वा । स्थूलानि । च । स्थूलशरीरहेतवः ॥**

**अर्थ**—१ आकाश, वायु, अग्नि, जल ( व ) पृथ्वी ( हीं पांच ) २ भूतें ३ सूक्ष्म ४ आहेत ५ तीं ६ परस्परांच्या* अंशांनीं ७ युक्त ८ होऊन ९ स्थूल ( बनतात ). १० आणि स्थूलशरीराच्या ( घटनेस , कारण ( होतात ).

सूक्ष्म पंचमहाभूतांचें पंचीकरण होऊन स्थूल भूतें होतात व त्या स्थूल भूतांचा स्थूल देह बनतो.

**मात्राः । तदीयाः । विषयाः । भवन्ति । शब्दादयः । पञ्च । सुखाय । भोक्तुः ॥ ७६ ॥**

**अर्थः**–१ त्या ( पंचमहाभूतांचे ) २ शब्दादि-शब्द, स्पर्श, रूप रस, गंध हे-( जे ) ३ पांच ४ गुण ( ते ) ५ विषय ( ह्मटले असून ) ६ भोक्त्याच्या-जीवाच्या-( भ्रांतीनें मानलेल्या ) ७ सुखाला ( हेतुभूत ) ८ आहेत.

शब्दादि पंचतन्मात्रांस पंचविषय ह्मटलें आहे व ते विषय जीवाला सुखाचा भास करून देतात. ॥ ७४ ॥ ७५ ॥ ७६ ॥

**य एषु मूढा विषयेषु बद्धा**
**रागोरुपाशेन सुदुर्दमेन ।**
**आयान्ति निर्यान्त्यध ऊर्ध्वमुच्चैः**

---

* सूक्ष्म पंचमहाभूतांपैकीं प्रत्येकाच्या अर्ध्या भागांत बाकीच्या चार भूतांपैकीं प्रत्येकाचा आठवा भाग मिळून स्थूल भूतें झालीं. जसें, सूक्ष्म–पृथ्वी $\frac{1}{2}$+जल $\frac{1}{8}$+तेज $\frac{1}{8}$+वायु $\frac{1}{8}$+आकाश $\frac{1}{8}$=१=पृथ्वी—या प्रमाणेंच बाकीच्या स्थूल भूतांचें जाणावें,

**स्वकर्मदूतेन जवेन नीताः ॥ ७७ ॥**

**ये । एषु । मूढाः । विषयेषु । बद्धाः । रागोरुपाशेन । सुदुर्दमेन ॥ आयान्ति । निर्यान्ति । अधः । ऊर्ध्वं । उच्चैः । स्वकर्मदूतेन । जवेन । नीताः ॥ ७७ ॥**

**अर्थः**—१ जे २ मूर्ख पुरुष ३ ह्या ४ विषयांच्या ठिकाणीं ५ दुर्भेद्य अशा ६ रागरूप प्रीतिरूप महापाशानें ७ बांधलेलें ( असतात ) ( व ) ८ प्रबल ९ स्वकर्मरूपदूतानें १० वेगानें ११ ( धरून ) नेलेले ( असतात ते ) १२ नीच ( पश्वादियोनींत व ) १३ वर ( देवादिकांच्या योनींत ) १४ येतात ( आणि तेथून पुनः ) १५ जातात. ॥७७॥

स्थूल देहाच्याद्वारें विषयासक्तीनें पापपुण्यरूप कर्म घडून त्याच्या योगानें जीवांस अधोगतिरूप व ऊर्ध्वगतिरूप यातायाती भोगाव्या लागतात. ॥ ७७ ॥

**शब्दादिभिः पञ्चभिरेव पञ्च**
**पञ्चत्वमापुः स्वगुणेन बद्धाः ।**
**कुरङ्गमातङ्गपतङ्गमीन**
**भृङ्गा नरः पञ्चभिरञ्चितः किम् ॥ ७८ ॥**

**शब्दादिभिः । पञ्चभिः । एव । पञ्च । पञ्चत्वं । आपुः । स्वगुणेन । बद्धाः ॥ कुरङ्गमातङ्गपतङ्गमीनभृङ्गाः । नरः । पञ्चभिः । अञ्चितः । किम् ॥ ७८ ॥**

**अर्थः**—-१ हरिण, हत्ति, पतंग, मत्स्य आणि भ्रमर ( हे ) २ पांच ३ शब्दादि ४ पांचांनीं—शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या पांच विषयांनीं --५ च ( अनुक्रमानें ) ६ आपआपल्या ( आवडीच्या एका ) गुणानें ७ बांधले ( जाऊन ) ८ मरण ९ पावतात. ( तर मग ह्या ) १० पांच ( विषयरूपपाशांनीं ) ११ बांधलेला--पांच विषयांच्या ठिकाणीं आसक्त झालेला--१२ पुरुष ( नाश पावेल हें ) १३ काय ( सांगावें )? ॥७८॥

एकेका विषयाच्या ठिकाणीं आसक्त झालेले प्राणीहि जर नाश पावतात, तर मग पांचहि विषयांच्या ठिकाणीं आसक्त होणारा पुरुष नाश पावेल ह्यांत शंका नाहीं. ॥ ७८ ॥

**दोषेण तीव्रो विषयः कृष्णसर्पविषादपि ।**
**विषं निहन्ति भोक्तारं द्रष्टारं चक्षुषाप्ययम् ॥७९॥**

दोषेण[4] । तीव्रः[5] । विषयः[1] । कृष्णसर्पविषात्[2] । अपि[3] ॥ विषं[6] ।
निर्हन्ति[8] । भोक्तारं[7] । द्रष्टारं[11] । चक्षुषा[10] । अपि[12] । अयम्[9] ॥७९॥

**अर्थः**—( शब्दादि प्रत्येक ) १ विषय २ कृष्ण सर्पाच्या विषापेक्षां ३ हि ( आपल्या रागद्वेषोत्पत्तिरूप ) ४ दोषामुळें ( अधिक ) ५ तीव्र ( आहे ). ( कारण ) ६ विष, ७ प्राशन करणाराचाच ८ प्राण घेतें, ( आणि ) ९ हा ( विषय केवळ ) १० नेत्रानें ( त्याकडे ) ११ पाहणारास १२ देखील ( धुळीस मिळवितो ). ॥ ७९ ॥

विषय सुख देणारे नसून नाश करणारे आहेत. त्यांचें नुसतें दर्शन किंवा चिंतन झालें असतां ही ते पुरुषाला आपल्या पाशांत गोवितात. ॥ ७९ ॥

**विषयाशामहापाशाद्यो विमुक्तः सुदुस्त्यजात् ।**
**स एव कल्पते मुक्त्यै नान्यः षट्शास्त्रवेद्यपि ॥८०॥**

विषयाशामहापाशात्[3] । यः[1] । विमुक्तः[4] । सुदुस्त्यजात्[2] ॥
सः[5] । एव[6] । कल्पते[8] । मुक्त्यै[7] । न[12] । अन्यः[9] । षट्शास्त्रवेदी[10] ।
अपि[11] ॥ ८० ॥

**अर्थः**—१ जो ( मनुष्य ) ( विषयीं पुरुषांना ) २ सोडण्यास अति अवघड ( अशा ) विषयवासनारूप महापाशांतून ४ मोकळा होतो, ५ तो ६ च ७ मुक्ति ( मिळविण्यास ) ८ समर्थ होतो. ९ इतर-विषयाभिलाषी-१० सहा शास्त्रें जाणणारा ( असला ) तरी ११ सुद्धां ( मुक्ति मिळविण्यास योग्य होत ) १२ नाहीं. ॥ ८० ॥

केवळ विषय वासना त्यागच मोक्षाला हेतु आहे. ॥ ८० ॥

260488

**आपातवैराग्यवतो मुमुक्षून्**
**भवाब्धिपारं प्रतियातुमुद्यतान् ।**
**आशाग्रहो मज्जयतेऽन्तराले**
**निगृह्य कण्ठे विनिवर्त्य वेगात् ॥ ८१ ॥**

आपातवैराग्यवतः । मुमुक्षून् । भवाब्धिपारं । प्रतियातुं । उद्यतान् ॥ आशाग्रहः । मज्जयते । अन्तराले । निगृह्य । कण्ठे । विनिवर्त्य । वेगात् ॥ ८१ ॥

**अर्थ**–ज्यांस १ क्षणिक मंद वैराग्य झालें आहे अशा २ संसार समुद्राच्या पार ३ जाण्या करितां ४ उद्योग करणाऱ्या ५ मुमुक्षूंना ६ विषयवासनारूप नक्र ७ कंठाला ८ धरून ९ बलात्कारानें १० मागें फिरवून ११ मध्येंच १२ बुडवितो. ॥ ८१ ॥

मंद वैराग्य प्राप्त होऊन परमार्था विषयीं केलेला प्रयत्न विषयवासनेमुळें शिथिल होऊन ना प्रपंच ना परमार्थ अशी स्थिति होते; ह्मणून तीव्र वैराग्यच झालें पाहिजे. ॥ ८१ ॥

**विषयाँशाग्रहो येन सुविरक्तयासिना हतः ।**
**स गच्छति भवाम्भोधेः पारं प्रत्यूहवर्जितः ॥८२॥**

विषयाशाग्रहः । येन । सुविरक्त्यासिना । हतः ॥ सः । गच्छति । भवाम्भोधेः । पारं । प्रत्यूहवर्जितः ॥ ८२ ॥

**अर्थ**– १ ज्या ( मुमुक्षूनें ) २ तीव्र वैराग्यरूप तरवारीनें ३ विषय वासनारूप सुसरीला ठार ४ मारिलें आहे, ५ तो ६ निर्विघ्नपणें ७ संसार समुद्राच्या ८ पार ९ जातो ॥ ८२ ॥

तीव्र वैराग्यानेंच परमार्थ विरोधी सर्व विघ्नांचा नाश होऊन जन्म मरणरूप संसारापासून मुक्तता होते. ॥ ८२ ॥

---

* " विषयाख्यग्रहो " असा हि पाठ आढळतो. त्याचा अर्थ विषयवासना आहे नांवजिचें अशी सुसर.

**विषमविषयमार्गैर्गच्छतोऽनच्छबुद्धेः**
**प्रतिपदमभियातो मृत्युरप्येष विद्धि ।**
**हितसुजनगुरूक्त्या गच्छतःस्वस्य युक्त्या**
**प्रभवति फलसिद्धिः सत्यमित्येव विद्धि ॥ ८३ ॥**

विषमै[2]विषयमार्गैः । गच्छ[3]तः । अनच्छ[1]बुद्धेः । प्र[7]तिपदं । अभिया[8]तः । मृत्यु[5]ः । अ[6]पि । ए[4]षः । विद्धि[9] ॥ ॥ हितसुजन[10] गुरूक्त्या । गच्छ[13]तः । स्वस्य[11] । युक्त्या[12] । प्रभ[15]वति । फ[14]लसिद्धिः । स[18]त्यं । इ[16]ति । ए[17]व । विद्धि[19] ॥ ८३ ॥

अर्थ–१ मलिन बुद्धीच्या (आणि) २ अवघड अशा विषयसेवनरूप मार्गांनीं ३ जाणाऱ्या (पुरुषाला) ४ हा लोकप्रसिद्ध ५ मृत्यु ६ हि ७ पावलोपावलीं ८ येतो न समजतां आयुष्याचा क्षय होऊन मृत्यु लवकर येतो (असें) ९ समज (तसेंच) १० कल्याण करणाऱ्या सद्गुरूंच्या उपदेशानें (आणि) ११ स्वतांच्या (वेदशास्त्राला अनुकूल अशा) १२ तर्कानें विचारानें १३ चालणाऱ्या (पुरुषाला) (आत्मसाक्षात्काररूप) १४ फलाची प्राप्ति १५ होते १६ असें निश्चयानें १८ खरें १९ जाण.८३

कुमार्गानें जाणाऱ्या पुरुषास जन्ममरणरूप संसारबंध प्राप्त होतो, व सन्मार्गानें जाणाऱ्यास मोक्ष प्राप्त होतो; ह्मणून सुमार्गानेंच जावें ह्मणजे तीव्र वैराग्य होऊन मोक्ष मिळेल ॥ ८३ ॥

**मोक्षस्य काङ्क्षा यदि वै तवास्ति**
**त्यजातिदूराद्विषयान् विषं यथा ।**
**पीयूषवत्तोषदयाक्षमार्जव-**
**प्रशान्तिदान्तीर्भज नित्यमादरात् ॥ ८४ ॥**

मोक्ष[4]स्य । काङ्क्षा[5] । य[1]दि । [2]वै । तव[3] । [6]अस्ति । त्य[11]ज । अतिदूरा[10]त् । वि[9]षयान् । वि[8]षं । य[7]था । पीयूषवत्[13] । तोष[14]दया-

क्षमार्जवप्रशान्तिदान्तीः । भज । नित्यं । आदरात् ॥ ८४ ॥

अर्थः—१ जर २ निश्चयानें ३ तुला ४ मोक्षाची ५ इच्छा ६ असेल, (तर) ७ ज्याप्रमाणें ८ विष (टाकावें त्याप्रमाणें) ९ विषयांना १० अति दूर ११ टाकून दे; (आणि) १२ आदरानें १३ अमृताप्रमाणें १४ संतोष, दया, क्षमा, सरलता, शम (व) दम (ह्यांचें) १५ नेहमीं १६ सेवन कर; हीं प्राप्त करून घे. ॥ ८४ ॥

मोक्षाची इच्छा करणारानें कुमार्ग सोडून सन्मार्गाचाच अवश्य आश्रय केला पाहिजे. ॥ ८४ ॥

अनुक्षणं यत्परिहृत्य कृत्य-
मनाद्यविद्याकृतबन्धमोक्षणम् ।
देहः परार्थोऽयममुष्य पोषणे
यः सज्जते स स्वमनेन हन्ति ॥ ८५ ॥

अनुक्षणं । यत् । परिहृत्य । कृत्यं । अनाद्यविद्याकृतबन्धमोक्षणं ॥ देहः । परार्थः । अयं । अमुष्य । पोषणे । यः सज्जते । सः । स्वं । अनेन । हन्ति ॥ ८५ ॥

अर्थः—१ जें २ अनादि अविद्येनें केलेल्या बंधापासून मुक्त होणें (आपलें) ३ निरंतर कर्तव्य ४ (आहे त्यास) ५ सोडून ६ हा ७ दुसऱ्यासाठीं-कोल्हे कुत्रे इत्यादिकांच्या भक्ष्यस्थानीं पडण्याकरितां-जो ८ देह (आहे) ९ त्याचें १० पोषण करण्यांत जो ११ (पुरुष) १२ तत्पर होतो १३ तो १४ ह्या (तत्परतेनें) १५ स्वतांचा १६ नाश करितो. ॥ ८५ ॥

विषयोपभोगांनीं शरीराची पुष्टि करणारा आत्मस्वरूपाला विसरून पश्वादि योनीप्रत जाऊन जन्ममरणांच्या परंपरेने आपला सर्वस्वी नाश करून घेतो. ॥ ८५ ॥

शरीरपोषणार्थी सन् य आत्मानं दिदृक्षति ।
ग्राहं दारुधिया धृत्वा नदीं तर्तुं स गच्छति ॥ ८६ ॥

शरीरपोषणार्थी । सन् । यः । आत्मानं । दिदृक्षति ॥ ग्राहं । दारुधिया । धृत्वा । नदीं । तर्तुं । सः । गच्छति ॥ ८६ ॥

**अर्थः**—१ जो (पुरुष) २ शरीराचें लालन पालन करणारा ३ होऊन ४ आत्म्याला ५ पाहण्याची इच्छा करितो, ६ तो ७ सुसरीला (हें) ८ लांकूड (आहे अशा) बुद्धीनें ९ धरून १० नदी ११ तरून १२ जाण्यास पाहतो. ॥ ८६ ॥

सुसरीचा आश्रय नदीपार जाण्याचें साधन नसून उलट नाशाला हेतुभूत आहे; तद्वत् देहपोषण आत्मलाभाचें साधन नसून तादात्म्यध्यासानें आत्म्यापासून विमुख करणारें आहे. ॥ ८६ ॥

**मोह एव महामृत्युर्मुमुक्षोर्वपुरादिषु ।**
**मोहो विनिर्जितो येन स मुक्तिपदमर्हति ॥८७॥**

मोहः । एव । महामृत्युः । मुमुक्षोः । वपुरादिषु ॥ मोहः । विनिर्जितः । येन । सः । मुक्तिपदं । अर्हति ॥ ८७ ॥

**अर्थः**—१ मुमुक्षूला २ देहादिकांच्या ठायीं (आत्मत्वाभिमान रूप जो) ३ मोह (तोच जन्ममरणपरंपरा देणारा) ५ महामृत्यु (आहे). ६ ज्या (पुरुषानें देहादि अनात्मवर्गाहून आत्मा भिन्न आहे अशा निश्चित ज्ञानानें) ७ मोह ८ जिंकिला, ९ तो १० मोक्षप्राप्तीला ११ योग्य होतो.८७

देहाभिमानानें अनर्थ प्राप्ति, व मोह जिंकल्यानें मोक्षप्राप्ति होते. ॥ ८७ ॥

**मोहं जहि महामृत्युं देहदारसुतादिषु ।**
**यं जित्वा मुनयो यान्ति तद्विष्णोः परमंपदं॥८८॥**

मोहं । जहि । महामृत्युं । देहदारसुतादिषु ॥ यं । जित्वा । मुनयः । यान्ति । तत् । विष्णोः । परमं । पदम् ॥ ८८ ॥

**अर्थ**—१ देह, स्त्री, पुत्र इत्यादिकांच्या ठिकाणीं (जो मी व माझें अशा प्रकारचा) २ मोह (तो जन्ममरण प्रवाह हेतुभूत) ३ महामृ-

त्यु ( आहे त्याचा ) ४ नाशकर. ५ त्याला ६ जिंकून ( मननशील विवेकी ) ७ मुनि ८ त्या—वेदान्त प्रसिद्ध ९ विष्णूच्या १० उत्तम ११ पदाप्रत—ब्रह्माप्रत—१२ प्राप्त होतात. ॥ ८८ ॥

अनात्म वस्तूंच्या ठिकाणीं असलेला अहंममत्वाभिमान टाकिल्यानें ब्रह्मप्राप्ति होतें, ह्मणून त्याचा त्याग करावा. ॥ ८८ ॥

**त्वङ्मांसरुधिरस्नायुमेदोमज्जास्थिसंकुलम् ।**
**पूर्णं मूत्रपुरीषाभ्यां स्थूलं निन्द्यमिदं वपुः ॥८९॥**

त्वङ्मांसरुधिरस्नायुमेदोमज्जास्थिसंकुलम् ॥ पूर्णं । मूत्र-पुरीषाभ्यां । स्थूलं । निन्द्यं । इदं । वपुः ॥ ८९ ॥

**अर्थ**—१ त्वचा, मांस, रक्त, स्नायु, मेद, मज्जा ( आणि ) अस्थि या सप्तधातूनीं युक्त, ( व ) २ मूत्र आणि मळ ( यांनीं ) ३ भरलेलें ४ हें ५ स्थूल ६ शरीर ७ निंद्यच ( आहे ). ॥ ८९ ॥

हें स्थूल शरीर निंद्य पदार्थांनीं भरलेलें असल्यामुळें निंद्यच आहे. ॥ ८९ ॥

**पञ्चीकृतेभ्यो भूतेभ्यः स्थूलेभ्यः पूर्वकर्मणा ।**
**समुत्पन्नमिदं स्थूलं भोगायतनमात्मनः ॥**
**अवस्था जागरस्तस्य स्थूलार्थानुभवो यतः ॥९०॥**

पञ्चीकृतेभ्यः । भूतेभ्यः । स्थूलेभ्यः । पूर्वकर्मणा । समुत्प-न्नं । इदं । स्थूलं । भोगायतनं । आत्मनः ॥ अवस्था । जागरः। तस्य । स्थूलार्थानुभवः । यतः ॥ ९० ॥

**अर्थ**—( पूर्वोक्त रीतीनें परस्परांत मिळून ) १ पंचीकृत झालेल्या २ स्थूल ३ भूतांपासून प्राक्तन--जन्मांतरीं केलेल्या-( शुभाशुभ ) कर्मानें ५ उत्पन्न झालेलें ६ जीवात्म्याचें ( सुख दुःख ) ७ भोगण्याचें स्थान ८ हें ९ स्थूल ( शरीर आहे ). १० त्या ( स्थूल देहाभिमानी *

---

* जागृति ही स्थूल देहाची अवस्था आहे. असें ह्मणण्यापेक्षां स्थूल देहाभिमानी जिवाची आहे असें ह्मणणें अधिक सयुक्तिक आहे.

जीवाची ) ११ जागृति ( ही ) १२ अवस्था ( आहे ); १३ कारण ( त्या स्थूल देहाच्या अभिमानानें ) १४ स्थूल पदार्थांचा अनुभव होतो ९०

पंचीकृत पंच महाभूतांपासून स्थूल देहाची उत्पत्ति असून तो जीवात्म्याचें भोगस्थान आहे ब्रह्म निर्विकार असल्यामुळें स्थूल देहाचें परिणामी उपादान कारण होत नाहीं, केवळ निवर्ताधिष्ठानमात्र आहे. ह्मणून द्वैतापत्ति होत नाहीं. ॥९०॥

बाह्येन्द्रियैःस्थूलपदार्थसेवां
स्रक्चन्दनस्त्र्यादिविचित्ररूपाम् ।
करोति जीवःस्वयमेतदात्मना
तस्मात्प्रशस्तिर्वपुषोऽस्य जागरे ॥९१॥

बाह्येन्द्रियैः स्थूलपदार्थसेवां । स्रक्चन्दनस्त्र्यादिविचित्ररूपां ॥ करोति । जीवः । स्वयं । एतदात्मना । तस्मात् । प्रशस्तिः । वपुषः । अस्य । जागरे ॥ ९१ ॥

**अर्थः**--१ जीव-प्राणादि संघाताचा अभिमानी चेतनह्मा २ ( स्थूल देहाशीं स्वतांचे ) तादात्म्य करून ( श्रोत्रादि ३ बाह्येंद्रियद्वारा ४ माला चंदन, स्त्री, इत्यादि नानाप्रकारच्या ५ स्थूल पदार्थांचा उपभोग ६ स्वतः ७ घेतो ८ ह्मणून ९ ह्मा [ स्थूल ] १० देहाची ११ जागृतींत १२ श्रेष्ठता-महत्व-आहे. ॥ ९१ ॥

जीवात्माच स्थूल देहाच्या योगानें जागृतींत स्थूल पदार्थांचा उपभोग घेतो जागृती ही अवस्था स्थूल देहाची नसून स्थूल देहाभिमानाची * चिदाभासाची आहे. ॥ ९१ ॥

सर्वोऽपि बाह्यसंसारः पुरुषस्य यदाश्रयः ।
विद्धि देहमिदं स्थूलं गृहवद्गृहमेधिनः ॥९२ ॥

---

* बुद्धेर्जागरणं स्वप्न सुषुप्तिरिति वृत्तयः । ता येनैवानुभूयन्ते सोऽध्यक्षः पुरुषः परः ॥ १ ॥ ( श्रीमद्भागवत )

**अर्थः**--जागृति, स्वप्न सुषुप्ति ह्मा बुद्धीच्या वृत्ति आहेत त्यांचा अनुभव घेणारा त्याहून निराळा साक्षी पुरुष आहे.

सर्वः[2] । अपि[3] । बाह्यसंसारः[4] । पुरुषस्य[1] । यदाश्रयः[5] ॥ विद्धि[11] । देहं[8] । इदं[6] । स्थूलं[7] । गृहवत्[10] । गृहमेधिनः[9] ॥ ९२ ॥

अर्थः–१ पुरुषाचा २ सर्वच ३ ( स्त्रीपुत्रवित्तादि ) ४ बाह्य प्रपंच ज्याच्याआधिन ( आहे त्या ) ६ ह्या ७ स्थूल ८ देहाला ९ गृहस्थाश्रमाच्या १० घराप्रमाणें ११ समज- ॥ ९२ ॥

गृहस्थाच्या घराप्रमाणें हें स्थूल शरीर असून त्यांत राहणारा चेतनात्मा त्याहून भिन्न आहे. ॥ ९२ ॥

**स्थूलस्य संभवजरामरणानि धर्माः**
**स्थौल्यादयो बहुविधाः शिशुताद्यवस्थाः ।**
**वर्णाश्रमादिनियमा बहुधामयाः स्युः**
**पूजावमानबहुमानमुखा विशेषाः ॥ ९३ ॥**

स्थूलस्य[1] । संभवजरामरणानि[2] । धर्माः[3] । स्थौल्यादयः[4] । बहुविधाः[5] । शिशुताद्यवस्थाः[6] ॥ वर्णाश्रमादिनियमाः[7] । बहुधा[8] । आमयाः[9] । स्युः[12] । पूजावमानबहुमानमुखाः[10] । विशेषाः[11] ॥ ९३ ॥

अर्थः–१ स्थूल ( देहाला धरून ) २ जन्म वृद्धापकाळ ( आणि ) मृत्यु ( हे ) ३ धर्म, ४ स्थूलत्वादि ५ अनेकप्रकारचे ( इतर धर्म ) ६ बाल्यादि अवस्था, ( ब्राह्मणत्वादि ७ वर्णांचे ( व ब्रह्मचर्यादि ) आश्रमांच नियम अनेक ८ प्रकारचे रोग ( आणि ) १० मान्यता, अपमान बहुमान इत्यादि ११ विशेष गोष्टी १२ आहेत. ॥ ९३ ॥

यांत स्थूल देहाचे विकार सांगितले आहेत स्थूल, देहाच्या ठिकाणीं आत्माध्यास केल्यानें आत्मा हे आपलेच धर्म मानितो व त्यामुळें नसतेंच बंधन पावतो. ॥ ९३ ॥

**बुद्धीन्द्रियाणि श्रवणं त्वगक्षि**
**घ्राणं च जिव्हा विषयावबोधनात् ।**

**वाक्पाणिपादा गुदमप्युपस्थः**
**कर्मेन्द्रियाणि प्रवणेन कर्मसु ॥ ९४ ॥**

बुद्धीन्द्रियाणि । श्रवणं । त्वक् । अक्षि । घ्राणं । च । जिव्हा । विषयावबोधनात् ॥ वाक्पाणिपादाः । गुदं । अपि । उपस्थः । कर्मेन्द्रियाणि । प्रवणेन । कर्मसु ॥ ९४ ॥

**अर्थः**—१ श्रोत्र, २ त्वचा, ३ चक्षु, ४ घ्राण-नासिका ५ आणि ६ जिव्हा-रसना-( हीं शब्दादि ) ७ विषयांना जाणतात ह्मणून ८ ज्ञानेंद्रिये ( होत ) ९ वाणी, हात, पाय, १०-मलविसर्जनद्वार-११ आणि १२ उपस्थ-जननेंद्रिय-( हीं भाषणादि ) १३ क्रियांच्या ठायीं १४ नम्रपणानें १५ प्रवृत्त होतात ह्मणून कर्मेंद्रियें ( होत ). ॥ ९४ ॥

पूर्वीं स्थूल शरीराचें वर्णन झालें आतां पुढें सूक्ष्म शरीर सांगावयाचें आहे ह्मणून इंद्रियांची नांवें सांगितलीं आहेत. ॥ ९४ ॥

**निगद्यतेऽन्तःकरणं मनोधी-**
**रहंकृतिश्चित्तमिति स्ववृत्तिभिः ।**
**मनस्तु संकल्पविकल्पनादिभि-**
**र्बुद्धिः पदार्थाध्यवसायधर्मतः ॥ ९५ ॥**

निगद्यते । अन्तःकरणं । मनः । धीः । अहंकृतिः । चित्तं । इति । स्ववृत्तिभिः ॥ मनः । तु । संकल्पविकल्पनादिभिः । बुद्धिः । पदार्थाध्यवसायधर्मतः ॥ ९५ ॥

**अर्थः**—( अन्तः ह्मणजे शरीरांत हृदयकमलाच्याठायीं राहून करण ह्मणजे सर्व ज्ञानांचे साधन-जाणीव कला-चें ) १ अंतःकरण ( त्या एकासच ) २ त्याच्या वृत्तींमुळें-विशेष परिणाम पावल्यानें-३ मन, ४ बुद्धि,

* "वाक्पाणिपादं", असा समाहारद्वन्द्व केलेला पाठहि आढळतो. अर्थभेद नाहीं.

५ अहंकार, ६ चित्त ७ असें ८ ह्मणतात. ( हें असें असेल किंवा असें नसेल अशा प्रकारच्या ) ९ संकल्प विकल्पादि ( वृत्तींच्या योगानें त्यास ) १० मन ( ह्मणतात ), ११ आणि ( हा ) १२ पदार्थ ( असाच आहे अशा ) निश्चयरूप परिणामानें १३ बुद्धि ह्मणतात. ॥ ९५ ॥

ह्यांत अन्तःकरणाचें निरूपण केले आहे. ॥ ९५ ॥

**अत्राभिमानादहमित्यहंकृतिः ।**
**स्वार्थानुसन्धानगुणेन चित्तम् ॥ ९६ ॥**

अत्र । अभिमानात् । अहं । इति । अहंकृतिः ॥ स्वार्थानुसन्धानगुणेन । चित्तम् ॥ ९६ ॥

अर्थः—एथें देहादिकांच्या ठिकाणीं २ मी ३ असा ४ अभिमान धरल्यानें ( त्याच अंतःकरणास ) ५ अहंकार ( ह्मणतात आणि ) आपल्या सुखसाधनादिकाच्या चिंतनरूपवृत्तीमुळें ७ चित्त ( ह्मणतात. )

पंचाणवाव्या श्लोकाच्या उत्तरार्धांत व ह्या श्लोकार्धांत वृत्तिभेदामुळें एकाच अंतःकरणास चार नांवें कशीं प्राप्त होतात हें सांगितलें ॥ ९६ ॥

**प्राणापानव्यानोदानसमाना भवत्यसौप्राणः ।**
**स्वयमेववृत्तिभेदाद्विकृतिभेदात्सुवर्णसलिलादिवत् ९७**

प्राणापानव्यानोदानसमानाः । भवति । असौ । प्राणः ॥ स्वयं । एव । वृत्तिभेदात् । विकृतिभेदात् । सुवर्णसलिलादिवत्॥ ९७॥

अर्थ—१ भिन्न परिणाम घडल्यामुळें २ सोनें ( अलंकाररूप व ) उदक ( तरंगादिरूप होतें ) तद्वत् ३ हा—शरीरांत संचार करणारा—४ प्राण ५ भिन्न वृत्तींमुळें ६ आपण ७ च ८ प्राण, अपान, व्यान, उदान ( व ) समान होतो. *

* पांच प्राणांचीं स्थानें दिली आहेत तीं हृदि प्राणो गुदेऽपानःसमानो नाभिसंस्थितः। उदानः कण्ठदेशस्थो व्यानः सर्वशरीरगः ॥ १ ॥

अर्थः—हृदयांत ( राहणार तो ) प्राण, गुदाच्या ठिकाणीं अपान, नाभींत असलेला समान १ कंठाच्या ठायीं उदान, व सर्व शरीरांत संचार करणारा व्यान आहे.

ह्या गीतेंत प्राणपंचकाचें निरूपण केलें आहे. ॥ ९७ ॥

**वागादि पञ्च श्रवणादि पञ्च प्राणादि पञ्चाभ्र मुखानि पञ्च । बुद्ध्याद्यविद्यापि च कामकर्म- णी पुर्यष्टकं सूक्ष्मशरीरमाहुः ॥ ९८ ॥**

वागादि । पञ्च । श्रवणादि । पञ्च । प्राणादि । पञ्च । अभ्र- मुखानि । पञ्च ॥ बुद्ध्यादि । अविद्या । अपि । च । कामक- र्मणी । पुर्यष्टकं । सूक्ष्मशरीरं । आहुः ॥ ९८ ॥

**अर्थः**—१ वाण्यादि २ पांच ( कर्मेंद्रियें ) ३ श्रोत्रादि ४ पांच ( ज्ञानेंद्रियें ), ५ प्राणादि ६ पांच ( प्राण ), ७ आकाशादि ८ पांच ( सूक्ष्म भूतें ) ९ बुध्यादि ( चार अंतःकरणभेद ), १० अविद्या ११ आणि १२ तशींच १३ काम व कर्म ( ह्या ), १४ आठपुरांच्या नगरां- च्या ( समूहास ), १५ सूक्ष्म शरीर १६ ह्मणतात.

हें सूक्ष्म शरीराचें निरूपण झालें.

**इदं शरीरं शृणु सूक्ष्मसंज्ञितं**
**लिङ्गं त्वपञ्चीकृतभूतसंभवम् ।**
**सवासनं कर्मफलानुभावकं**
**स्वाज्ञानतोऽनादिरुपाधिरात्मनः ॥ ९९ ॥**

इदं । शरीरं । शृणु । सूक्ष्मसंज्ञितं । लिङ्गं । तु । अपञ्ची- कृतभूतसंभवम् ॥ सवासनं । कर्मफलानुभावकं । स्वाज्ञानतः । अनादिः । उपाधिः । आत्मनः ॥ ९९ ॥

**अर्थः**—१ हें २ पंचीकरण न झालेल्या ( सूक्ष्म ) भूतांपासून उत्पन्न झालेलें ३ सूक्ष्मनांवाचें ४ शरीर ( आहे. असा तूं ) ५ निश्चयकर; ६ आणि ( ह्याला ) ७ लिंग ( शरीर हि ह्मणतात असें समज ). ( अदृष्ट )

८ कर्मांच्या ( सुखदुःखात्मक ) फलांचा भोग देणारें ( व स्मरणाला हेतुभूत अशा ) ९ वासनांनीं युक्त ( असें हें ) १० आत्म्याला ११ स्वतांच्या अज्ञानामुळें १२ अनादि १३ उपाधिरूप ( आहे. )

सूक्ष्म भूतांपासून झालेलें हें सूक्ष्म किंवा लिंग शरीरवासनांचें आश्रय स्थान असून कर्मांचें फल देणारें आहे. ज्याप्रमाणें शुभ्र स्फटिक तांबड्या जास्वंदीचें फुलावर ठेविलें असतां त्या उपाधीमुळें तांबडा दिसतो, त्याप्रमाणें शुद्ध आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं अज्ञानानें कर्तृत्वादि आरोपास हें सूक्ष्म शरीर अनादि कालापासून उपाधिरूप निमित्त झालें आहे. ॥ ९९ ॥

स्वप्नो भवत्यस्य विभक्त्यवस्था स्वमात्रशेषेण
विभाति यत्र । स्वप्ने तु बुद्धिः स्वयमेव जाग्रत्-
कालीननानाविधवासनाभिः ॥ १०० ॥
कर्त्रादिभावं प्रतिपद्य राजते यत्र स्वयं भाति
ह्ययं परात्मा । धीमात्रकोपाधिरशेषसाक्षी न
लिप्यते तत्कृतकर्मलेशैः ॥ १०१ ॥
यस्मादसङ्गस्तत एव कर्मभि
र्न लिप्यते किञ्चिदुपाधिना कृतैः ।

स्वप्नः[3] । भवति[4] । अस्य[1] । विभक्त्यवस्था[2] । स्वमात्रशेषेण[6] । विभाति[7] । यत्र[5] ॥ स्वप्ने[8] । तु[9] । बुद्धिः[10] । स्वयं[11] । एव[12] । जाग्रत्कालीननानाविधवासनाभिः[13] । कर्त्रादिभावं[14] । प्रतिपद्य[15] । राजते[16] ॥ १०० ॥

अर्थः*---१ ह्या ( सूक्ष्म देहाभिमानी जीवाची जागृतीहून ) २ वेगळी अवस्था ३ स्वप्न ( ही ) ४ आहे. ५ त्या ( अवस्थेंत बाह्येंद्रियांचा

* ( एथें १०० वा श्लोक व १०१ श्लोकाचा पहिला चरण हें एक वाक्य, १०१ श्लोकाचें दुसरा, तिसरा, व चवथा हे चरण मिळून एक वाक्य, व पुढील श्लोकार्धाचें एक वाक्य अशीं तीन निरनिराळीं वाक्यें आहेत. )

लय होऊन जीव ) ६ केवळ आपल्या ( सूक्ष्म शरीरानें ) अवशिष्टराहून ( नानारूपांनीं ) ७ भासमान होतो. ८ कारण ९ स्वप्नांत १० अंतःकरण ११ स्वतां १२ च १३ जाग्रदवस्थेंतील नानाप्रकारच्या वासनांच्या योगानें--जागृतींत पाहिलेल्या अनेक पदार्थांच्या संस्कारांमुळें--१४ कर्ता; ( क्रिया, करण ) इत्यादिरूप परिणामाला १५ पावून १६ भासते. १००

**यत्र । स्वयं । भाति । हि । अयं । परात्मा । धीमात्रकोपाधिः । अशेषसाक्षी । न लिप्यते । तत्कृतकर्मलेशैः ॥१०१॥**

**अर्थः**—१ त्या ( स्वप्नअवस्थेंत ) २ केवळ बुद्धिच उपाधि असून ( व ) ३ सर्व ( स्वप्नसृष्टीचें ) साक्षित्व करून ४ हा ( सूक्ष्मसाक्षी ) ५ चेतनात्मा ( बाह्येंद्रियांच्या व्यापारावांचून ) ६ स्वतां ७ च ८ भसतो. मनोविकारांना प्रकाशित करितो. ९ त्या ( बुद्धीनें केलेल्या पुण्य-पापरूप ) कर्मांच्या १० लेशांनींहिलिप्त होत ११ नाहीं.

**यस्मात् । असङ्गः । ततः । एव । कर्मभिः । न । लिप्यते । किञ्चित् । उपाधिना । कृतैः ॥**

**अर्थः**—१ ज्या अर्थी ( हा चेतनात्मा ) २ असंग ( आहे ) ३ त्या अर्थीं ४ च ( बुद्ध्यादि ) ५ उपाधीनें ६ केलेल्या ७ कर्मांनीं ( तो ) ८ किंचित् ( देखील ) ९ लिप्त होत १० नाहीं. ॥ १०१ ॥

सूक्ष्म देहाभिमानी जीवाची स्वप्न ही अवस्था असून त्याचे सर्व विलास ह्या सूक्ष्म देहामुळेंच होतात. जागृतींतील संस्कारांमुळें अंतःकरण स्वप्नांत नानाकार बनतें, तथापि सर्वांचा साक्षी चेतनात्मा असंग असून कशानें हि लिप्त होत नाहीं. ॥ १०१ ॥

**सर्वव्यापृतिकरणं लिङ्गमिदंस्याच्चिदात्मनःपुंसः ।**
**वास्यादिकमिव तक्ष्णस्तेनैवात्मा भवत्यसङ्गोऽयम् १०२**

**सर्वव्यापृतिकरणं । लिङ्गं । इदं । स्यात् । चिदात्मनः । पुंसः ॥ वास्यादिकं । इव । तक्ष्णः । तेन । एव । आत्मा । भवति । असङ्गः । अयम् ॥ १०२ ॥**

अर्थः—१ सुताराला ( आपलें सर्व काम करण्याचें साधन ज्याप्रमाणें ) २ वाकस वगैरे ( असतें ), ३ त्याप्रमाणें ४ चैतन्यस्वरूप ५ पुरुषाला ६ हें ७ लिंगशरीर ८ सर्व ( लौकिकवैदिक ) व्यवहारांचें साधन ९ आहे १० त्यामुळें ११ च १२ हा १३ आत्मा १४ असंग १५ आहे. ॥ १०२ ॥

ह्या गीतींत चैतन्यात्म्याच्या ठिकाणीं आरोपित ज्या क्रिया त्या सर्व लिंगदेहाच्या असून आत्मा साक्षी असंग आहे हें दृष्टांत पूर्वक सांगितलेलें आहे. ॥ १०२ ॥

अन्धत्वमन्दत्वपटुत्वधर्माः
सौगुण्यवैगुण्यवशाद्धि चक्षुषः ।
बाधिर्यमूकत्वमुखास्तथैव
श्रोत्रादिधर्मा न तु वेत्तुरात्मनः ॥ १०३ ॥

अन्धत्वमन्दत्वपटुत्वधर्माः । सौगुण्यवैगुण्यवशात् हि चक्षुषः ॥ बाधिर्यमूकत्वमुखाः । तथा । एवं । श्रोत्रादिधर्माः । न । तु । वेत्तुः । आत्मनः ॥ १०३ ॥

अर्थः—१ नेत्राच्या २ च ३ निर्दोषतेमुळें किंवा सदोषतेमुळें ४ पटुत्व-उत्तमदृष्टि मन्ददृष्टि अथवा अंधपणा हा धर्म ( नेत्राच्या ठायीं येतो. ) ६ त्याप्रमाणें ६ च ७ बहिरेपणा, मुकेपणा वगैरे ( हे ) ८ श्रोत्रादिकांचे धर्म ( आहेत ); ९ परंतु ( त्यांस ) १० जाणणाऱ्या ११ आत्म्याचे १२ नाहींत. ॥ १०३ ॥

अंधत्व बधिरत्व इत्यादि त्या त्या इंद्रियांचे धर्म आहेत साक्षी आत्म्याचे नाहींत, ह्मणून इंद्रिये विकारी असल्यामुळें आत्मा होण्यास योग्य नाहींत. ॥ १०३ ॥

उच्छ्वासनिःश्वासविजृम्भणक्षुत्प्रस्यन्दनाद्युत्क्रमणादिकाःक्रियाः । प्राणादिकर्माणि वदन्ति
तज्ज्ञाः प्राणस्य धर्मावशनापिपासे ॥ १०४ ॥

उच्छ्वासनिःश्वासविजृम्भणक्षुत्प्रस्यन्दनाद्युत्क्रमणादिकाः । क्रियाः । प्राणादिकर्माणि । वदन्ति । तज्ज्ञाः । प्राणस्य । धर्मौ । अशनापिपासे ॥ १०४ ॥

अर्थः—१ उच्छ्वास-श्वास बाहेर टाकणें-निःश्वास-श्वास आंत घेणें जांभई, क्षुत शिंक प्रस्यंदनादि-( कानांतून मळ ) बाहेर येणें वगैरे--उत्क्रमणादिक-एक शरीर सोडून दुसऱ्या शरिरांत जाणें वगैरे २ क्रिया ३ प्राणादिकांची कामें ( आहेत व ) ४ भूक ( व ) आणि तहान ५ प्राणाचे ६ धर्म ( आहेत असें ) ७ तत्त्ववेते-विद्वान-८ ह्मणतात. ॥ १०४ ॥

इंद्रियां प्रमाणेंच प्राणहि विकारवान् असल्यामुळें आत्मा होऊं शकत नाहीं. हें सांगण्यासाठीं प्राणाचे धर्म कथन केले आहे, ॥ १०४ ॥

अन्तःकरणमेतेषु चक्षुरादिषु वर्ष्मणि ।
अहमित्यभिमानेन तिष्ठत्याभासतेजसा ॥ १०५ ॥

अन्तःकरणं । एतेषु । चक्षुरादिषु । वर्ष्मणि ॥ अहं । इति । अभिमानेन । तिष्ठति । आभासतेजसा ॥ १०५ ॥

अर्थः—१ ह्या नेत्रादि ( ज्ञानेंद्रियांच्या व कर्मेंद्रियाच्या ) ( आणि ) ३ शरीराच्या ठिकाणीं ४ "मी" ५ असा ६ अभिमान धरून--मी पाहतों इत्यादि वृत्तींना उत्पन्न करून-७ चिदाभासाच्या-चैतन्याच्या-तेजानें ८ अंतःकरण ९ राहिलें. ॥ १०५ ॥

ह्यांत अंतःकरणाची क्रिया सांगितली. ॥ १०५ ॥

अहंकारः स विज्ञेयः कर्ता भोक्ताऽभिमान्ययम् ।
सत्वादिगुणयोगेन चावस्थात्रयमश्नुते ॥ १०६ ॥

अहंकारः । सः । विज्ञेयः । कर्ता । भोक्ता । अभिमानी । अयम् ॥ सत्वादिगुणयोगेन । च । अवस्थात्रयं । अश्नुते" १०६

अर्थः—( पूर्वोक्त संघाताचें अभिमानी अंतःकरण मी ) १ कर्ता, २ भोक्ता ( असा ) ३ अभिमान धरतें, ( तेव्हां ) ४ तो ५ अहंकार ६ समजावा; ७ आणि ८ हा ( अहंकार ) ९ सत्वादि गुणांच्या * योगानें ( जागृति, स्वप्न, सुषुप्ति ह्या ) तीन १० अवस्थांप्रत ११ प्राप्त होतो. ॥ १०६ ॥

देहादि संघाताचा अभिमान धरणाऱ्या अंतःकरणाचेच कर्तृत्वादि धर्म आहेत, ।१०६।

विषयाणामानुकूल्ये सुखी दुःखी विपर्यये ।
सुखं दुःखं च तद्धर्मः सदानन्दस्य नात्मनः ॥१०७॥

विषयाणां । आनुकूल्ये । सुखी । दुःखी । विपर्यये ॥
सुखं । दुःखं । च । तद्धर्मः । सदानन्दस्य । न । आत्मनः ।१०७।

अर्थः—( इंद्रियांशीं संयोग पावलेल्या शब्दादि ) १ विषयांची अनुकूलता २ इच्छेप्रमाणें प्राप्ती असली ह्मणजे ( तो अहंकार ) ३ सुखी ( होतो ), ( व ) ४ उलट स्थिति असली ह्मणजे—विषय प्रतिकूल असतां दुःखी होतो. ६ सुख ७ आणि ८ दुःख ( हे ) ९ त्याचे धर्म ( आहेत ), १० नित्यानंदस्वरूप ( साक्षी ) ११ चेतनात्म्याचे १२ नाहींत ॥ १०७ ॥

कर्तृत्वादिकांप्रमाणें सुखादिक हि अंतःकरणाचेच धर्म आहेत. ॥ १०७ ॥

आत्मार्थत्वेन हि प्रेयान्विषयो न स्वतः प्रियः ।
स्वत एव हि सर्वेषामात्मा प्रियतमो यतः ॥ १०८॥
तत आत्मा सदानन्दो नास्य दुःखं कदाचन ।
यत्सुषुप्तौ निर्विषय आत्मानन्दोऽनुभूयते ॥१०९॥

एथें १०८ व्या श्लोकाचे पूर्वार्ध हें एक वाक्य, व १०८ व्या श्लोकाचें उत्तरार्ध व पुढील दीड श्लोक मिळून एक वाक्य अशीं दोन वाक्यें केलीं आहेत,

---

* सत्व गुणाच्या प्राधान्यानें जागृति रजोगुणाच्या प्राधान्यानें स्वप्न व तमोगुणाच्या प्राधान्यानें सुषुप्ति ह्या आवस्था होतात.

**श्रुतिःप्रत्यक्षमैतिह्यमनुमानं च जाग्रति ।**

आत्मार्थत्वेन । हि । प्रेयान् । विषयः । न ।स्वतः । प्रियः १०८

अर्थः—१ विषय २ आत्म्याकरितां ३ च ४ आवडता ( आहे ) ५ स्वतः—इतराच्या अपेक्षेवांचून—६ प्रिय ७ नाहीं ॥ १०८ ॥

स्वतः । एव । हि । सर्वेषां । आत्मा । प्रियतमः यतः । ततः । आत्मा । सदानन्दः । न । अस्य । दुःखं । कदाचन । यत् । सुषुप्तौ । निर्विषयः । आत्मानन्दः । अनुभूयते । श्रुतिः । प्रत्यक्षं । ऐतिह्यं । अनुमानं । च । जाग्रति ॥ १०९ ॥

अर्थः—१ ज्या अर्थी २ सर्व ( प्राण्यांना ) ३ हि ४ आत्मा—आपण—५ स्वतः ६ च ७ अतिप्रिय ( आहे ), ८ त्या अर्थी ९ आत्मा १० नित्यानंद स्वरूप ( आहे ), ११ ह्या ( आत्म्याला ) १२ कधींहि १३ दुःख ( होत ) १४ नाहीं, १५ कारण १६ सुषुप्तींत—गाढ झोंपेंत. १७ विषय इंद्रियें व यांच्या संयोगावांचून १८ स्वरूपसुख १९ अनुभवाला येतें. ( आत्मा आनंदरूप आहे अशा विषयीं ) २० श्रुति, २१ प्रत्यक्ष, २२ लौकिक जीवन्मुक्तांचा परंपरागत संवाद २३ व २४ अनुमान ( हीं चार प्रमाणें ) २५ सावधान—निर्दोष—आहेत. ॥ १०९ ॥

विषय स्वतः प्रिय नसून आपणा करितांच त्यांच्या ठिकाणीं प्रियत्व आहे, आपण स्वतःमात्र स्वतःलाच कधींहि अप्रिय होत नाहीं, ह्मणून आपण आनंदरूप आहों व हें आपलें आनंदरूप गाढ झोंपेंत अपल्या प्रत्ययास येतें. हें ह्या आनंदस्वरूपाच्या सिद्धीला प्रत्यक्ष प्रमाण आहे व तशींच श्रुत्यादिहि प्रमाणें आहेत. ॥ १०८ ॥ १०९ ॥

**अव्यक्तनाम्नि परमेशशक्तिरनाद्यविद्या**
**त्रिगुणात्मिका परा । कार्यानुमेया सुधियैव**
**माया यया जगत्सर्वमिदं प्रसूयते ॥ ११० ॥**

अव्यक्तनाम्नी । परमेशशक्तिः । अनाद्यविद्या । त्रिगुणात्मिका । परा । कार्यानुमेया । सुधिया एव । माया । यया ।

जगत्[13] । सर्वं[12] । इदं[11] । प्रसूयते[14] ॥ ११० ॥

अर्थः=( सत्व, रज, तम ह्या ) १ तीन गुणांच्या ( साम्यावस्थेनें ) असणारी ( तर्ककुशल ) २ बुद्धिमान् पुरुषांकडून ( त्रिगुणात्मक सृष्टि-रूप ) ३ कार्यावरून अनुमान करण्याला शक्य ( अशी ) ४ परमेश्वरी शक्ति स्पष्टलक्षण नसलेली ) ५ अव्यक्त नांवाची ( कार्यवर्गाला कारण-भूत असून त्याहून ६ वेगळी ( अशी ) ७ माया ८ च अनादि ९ अज्ञान ( आहे. ) ह्म. १० त्या ( मायेनें ) ११ हें १२ सर्व १३ जग १४ निर्माण केलें. ॥ ११० ॥

स्थूल व सूक्ष्म या दोन देहांचें वर्णन करून कारण देहाचें निरूपण करण्याकरितां प्रथम मायेचें वर्णन करून तीच अविद्या ह्मणजे अज्ञान आहे. हे सांगितलें. अज्ञान हेंच कारण शरीर आहे असें पुढें स्पष्ट सांगण्यांत येईल. ॥ ११० ॥

सन्नाप्यसन्नाप्युभयात्मिका नो भिन्नाप्यभिन्ना-
प्युभयात्मिका नो । साङ्गाप्यनङ्गा ह्युभयात्मिका
नो महाद्भुताऽनिर्वचनीयरूपा ॥ १११ ॥

सत्[1] । न[2] । अपि[3] । असत्[4] । न[5] । अपि[6] । उभयात्मिका[7] । नो[8] । भिन्ना[9] । अपि[10] । अभिन्ना[11] । अपि[12] । उभयात्मिका[13] नो[14] ॥ साङ्गा[15] । अपि[16] अनङ्गा[17] । हि[18] उभयात्मिका[19] । नो[20] । महाद्भुता[21] । अनिर्वचनीयरूपा[22] ॥ १११ ॥

अर्थः–( अज्ञान हें ब्रह्मात्मैक्यज्ञानानें नष्ट होतें ह्मणून ) १ सत्य २ नाहीं, ( अत्यंत असद्रूप असून हि सृष्टीरूप कार्योत्पादक असल्यामुळें ) ३ असत्य ४ हि ५ नाहीं. ( सत्य व असत्य ह्या विरूद्ध गोष्टी एकत्र राहात नसल्यामुळें ही माया सत्य व असत्य अशा ) ६ उभयरूपाची ७ देखील ८ नाहीं ( आत्मा अद्वितीय असल्यामुळें ती त्याहून ) ९ भिन्न १० हि ( नाहीं, आत्मशक्ति असल्यामुळें ) ११ अभिन्न १२ हि ( नाहीं, आणि

भेद व अभेद हे विरूद्ध धर्म एकत्र रहात नसल्यामुळें ) १३ उभयरूप १४ नाहीं. ( अवयवांचें निरूपण करितां येत नसल्यामुळें ) १५ साव-यव १६ हि ( नाहीं, सत्वादित्रिगुणात्मक असल्यामुळें ) १७ निरवयव १८ हि ( नाहीं व पूर्ववत् ) १९ उभयात्मक २० नाहीं. ( म्हणून ही माया ) २१ अत्याश्चर्यरूप ( व ) २२ अनिर्वचनीयरूप ( आहे )-तिच्या रूपाचा निर्णय करणें अशक्य आहे. ॥ १११ ॥

माया अनिर्वचनीय आहे. हें कारणांसह सांगितलें ॥ १११ ॥

**शुद्धाद्वयब्रह्मविबोधनाश्या सर्पभ्रमो रज्जु-**
**विवेकतो यथा । रजस्तमःसत्त्वमिति प्रसिद्धा**
**गुणास्तदीयाःप्रथितैःस्वकार्यैः ॥ ११२ ॥**

शुद्धाद्वयब्रह्मविबोधनाश्या । सर्पभ्रमः । रज्जुविवेकतः । यथा ॥ रजः । तमः । सत्त्वं । इति । प्रसिद्धाः । गुणाः । तदीयाः । प्रथितैः । स्वकार्यैः ॥ ११२ ॥

**अर्थः**–१ ज्या प्रमाणें २ रज्जुच्या ( यथार्थ ) ज्ञानानें ( कल्पित ) ३ सर्पभ्रांति ( निवृत्त होते, त्याप्रमाणें ) ४ शुद्ध ( आणि ) अद्वितीय ( अशा ) ब्रह्माच्या यथार्थ ज्ञानानें ( ही माया ) नाश पावणारी ( आहे ) ( सर्व सुज्ञ जनांना अनुभवानें ५ विदित असलेल्या तिच्या ( सुखदुःख मोहादिरूप ६ कार्यांवरून ७ तिचे ८ सत्व ९ रज ( आणि ) १० तम ११ असे १२ प्रसिद्ध १३ गुण ( आहेत. ). ॥ ११२ ॥

मायां सत्य वगैरे कशी नाहीं. हें दृष्टांत पूर्वक सांगितलें. ॥ ११२ ॥

**विक्षेपशक्ती रजसः क्रियात्मिका यतः प्रवृत्तिः**
**प्रसृता पुराणी । रागादयोऽस्याः प्रभवन्ति नित्यं**
**दुःखादयो ये मनसो विकाराः ॥ ११३ ॥**

विक्षेपशक्तिः[2] । रजसः[1] । क्रियात्मिका[4] । यतः[3] । प्रवृत्तिः[6] । प्रसृता[7] । पुराणी[5] ॥ रागादयः[8] । अस्याः[14] । प्रभवन्ति[15] । नित्यं[13] । दुःखादयः[9] । ये[10] । मनसः[11] । विकाराः[12] ॥ ११३ ॥

**अर्थः**—१ रजोगुणाला २ विक्षेपशक्ति–चलन सामर्थ्य. ( आहे ). ३ त्या ( रजोगुणाच्या शक्तीपासून ) ४ क्रियारूप ५ अनादिकाळचा ६ संसारप्रवाह ७ चालू आहे. ८ रागादि–विषयाभिलाष वगैरे ( आणि ) ९ दुःखादि १० जे ११ मनाचे १२ विकार ( ते ) १३ नेहमीं १४ ह्या ( विक्षेपशक्तीपासून ) १५ उत्पन्न होतात. ॥ ११३ ॥

गुणांपासून क्रिया कशा झाल्या तें सांगण्यासाठीं प्रथम रजोगुणाच्या सामर्थ्याचें वर्णन केलें आहे. ॥ ११३ ॥

कामः क्रोधो लोभदम्भाद्यसूयाहंकारेर्ष्यामत्स-
राद्यास्तु घोराः । धर्मा एते राजसाः पुम्प्रवृत्ति-
र्यस्मादेषा तद्रजोबन्धहेतुः ॥ ११४

कामः[1] । क्रोधः[2] । लोभदम्भाद्यसूयाहंकारेर्ष्यामत्सराद्याः[3] । तु[5] । घोराः[6] ॥ धर्माः[7] । एते[4] । राजसाः[8] । पुम्प्रवृत्तिः[11] । यस्मात्[9] । एषा[10] । तत्[12] । रजः[13] । बन्धहेतुः[14] ॥ ११४ ॥

**अर्थः**—१ काम, २ क्रोध, ३ लोभ. दंभादि, असूया–गुणाला दोष म्हणणें-अहंकार, ईर्ष्या-परोत्कर्ष सहन न होणें; मत्सर परोत्कर्षाचा हेवा-इत्यादि ४ हे ५ जे ६ घोर-भ्रांतिकारक-७ धर्म ( ते ) ८ रजोगुणाचे ( आहेत ). ९ ज्या अर्थी ( रजोगुणापासून ) १० ही ( कामादिरूप ) ११ पुरुषाची प्रवृत्ति ( होते ), १२ त्या अर्थी ( अविद्येचा एक भाग ) १३ रजोगुण ( अन्यथा ज्ञानरूप ) १४ बंधनाला हेतु ( आहे ). ११४

विक्षेपशक्ति असलेला रजोगुण बंधनाला कारण आहे ॥ ११४ ॥

एषाऽऽवृतिर्नाम तमोगुणस्य शक्तिर्यया वस्त्वव-

भासत्तेऽन्यथा । सैषा निदानं पुरुषस्य संसृते-
र्विक्षेपशक्तेः प्रवणस्य हेतुः ॥ ११५ ॥

एषा । आवृतिः । नाम । तमोगुणस्य । शक्तिः । यया । वस्तु । अवभासते । अन्यथा ॥ सा । एषा । निदानं । पुरुषस्य । संसृतेः । विक्षेपशक्तेः । प्रवणस्य । हेतुः ॥ ११५ ॥

**अर्थः**—१ जिच्या योगानें २ चिदात्मतत्त्व ३ विपरीत प्रकारानें ४ प्रत्ययाला येतें ( ती ) ५ ही ६ तमोगुणाची ७ आवरण ८ नांवाची ९ शक्ति ( आहे ) १० ती ११ ही १२ पुरुषाच्या ( जन्ममरणरूप ) १३ संसाराला १४ कारण ( असून पूर्वी सांगितलेल्या ) १५ विक्षेप-शक्तीला ( कार्यामध्यें ) प्रवृत्त १६ करण्यास १७ हेतुभूत ( आहे ) ११५

पूर्व श्लोकांत रजोगुणाची विक्षेपशक्ति सांगून ह्यांत तमोगुणाच्या आवरण शक्तीचें वर्णन केलें आहे, ॥ ११५ ॥

प्रज्ञावानपि पण्डितोऽपि चतुरोऽप्यत्यन्तसू-
क्ष्मात्मदृग् व्यालीढस्तमसा न वेत्ति बहुधा संबो-
धितोऽपि स्फुटम् । भ्रान्त्यारोपितमेव साधु कलय-
त्यालम्बते तद्गुणान् हन्तासौ प्रबला दुरन्ततमसः
शक्तिर्महत्यावृतिः ॥ ११६ ॥

प्रज्ञावान् । अपि । पण्डितः । अपि । चतुरः । अपि । अत्यन्तसूक्ष्मात्मदृक् । व्यालीढः । तमसा । न । वेत्ति । बहुधा । संबोधितः । अपि । स्फुटम् ॥ भ्रान्त्या । आरोपितम् । एव । साधु । कलयति । आलम्बते । तद्गुणान् । हन्त । असौ । प्रबला । दुरन्ततमसः । शक्तिः । महती । आवृतिः ॥ ११६ ॥

**अर्थः**--( पुरुष ) १ बुद्धिमान् २ हि, ३ पंडित ४ हि, ५ चतुर ६ हि, ( इंद्रियप्राणादिसूक्ष्म पदार्थांहून ) अति सूक्ष्म ७ आत्म्याला जाणणारा ( असला, व ) ८ अनेक प्रकारांनीं ९ स्पष्टरीतीनें ( त्याला ) १० बोध केला ( असला ) ११ तरीही १२ तमोगुणानें-तमोगुणाच्या आवरण शक्तीनें-१३ घेरलेला ( असला ह्मणजे त्याला संशय विपर्ययरहित ) १४ ज्ञान होत १५ नाहीं. ( तो यथार्थ दृष्टीनें ) १६ मिथ्या असलेल्या-कल्पित-पदार्थास १७ च १८ भ्रमानें १९ सत्य २० मानितो, ( आणि ) २१ त्या ( कल्पित पदार्थांच्या ठायीं ) गुण ( आहेत असें ) २२ धरून चालतो. ही मोठी २३ दुःखाची गोष्ट आहे कीं, ज्याचा नाश करणें २४ फार अवघड आहे अशा तमोगुणाची २५ ही २६ आवरण २७ शक्ति २८ फार २९ प्रबल ( आहे ). ॥ ११६ ॥

तमोगुणाची आवरण शक्ति अति प्रबळ असून यथार्थ ज्ञानाला प्रतिबंधकरणारी आहे. इतकेंच नव्हें, तर विपरीत ज्ञान करून देते. ॥ ११६ ॥

**अभावना वा विपरीतभावनाऽसंभावना विप्रतिपत्तिरस्याः । संसर्गयुक्तं न विमुञ्चति ध्रुवं विक्षेपशक्तिः क्षपयत्यजस्रम् ॥ ११७ ॥**

अभावना[1] । वा[2] । विपरीत[3]भावना । असंभावना[4] । विप्रतिपत्तिः[5] । अस्याः[6] ॥ संसर्गयुक्तं[7] । न[10] । विमुञ्चति । ध्रुवं । विक्षेपशक्तिः[12] । क्षपयति[13] । अजस्रम् ॥ ११७ ॥

**अर्थः**--१ अभावना अधिष्ठानाच्या यथार्थज्ञानाचा अभाव; २ किंवा ३ विपरीत समजूत ४ असंभावना-आहे असें कळलें असून विशेषस्वरूपाविषयीं अविश्वास; ५ संशय. ( ह्यांतून एखादें किंवा हीं सर्व ) ६ ह्या ( आवरण शक्तीचा ज्याला ) संसर्ग ७ झाला आहे. ( अशा पुरुषाला ) ८ खरोखर ९ सोडीत नाहीं. ( त्या पुरुषाला ) १० निरंतर ११ विक्षेपशक्ति विक्षेपांत टाकिते-अनवस्था उत्पन्न करून भ्रमांत पाडते. ॥ ११७ ॥

आवरण शक्तीचा संबंध झाला असतां अभावनादि बंधनसामग्रि लौकर तयार होते हें एथें सांगितलें आहे. ॥ ११७ ॥

अज्ञानमालस्यजडत्वनिद्राप्रमादमूढत्वमुखा-
स्तमोगुणाः । एतैः प्रयुक्तो न हि वेत्ति किञ्चि-
न्निद्रालुवत्स्तम्भवदेव तिष्ठति ॥ ११८ ॥

अज्ञानं । आलस्यजडत्वनिद्राप्रमादमूढत्वमुखाः । तमोगुणाः । एतैः । प्रयुक्तः । न । हि । वेत्ति । किञ्चित् । निद्रालुवत् । स्तम्भवत् । एव । तिष्ठति ॥ ११८ ॥

अर्थः--१ अज्ञान, २ आळस, जडता, निद्रा, प्रमाद-चुकणें-व मूढता इत्यादि ( धर्म ) ३ तमोगुणाचीं कार्यें ( आहेत ) ४ ह्या ( कार्यांनीं ) ५ संयुक्त ( असलेला पुरुष ) ६ कांहीं ७ हि ८ जाणत-नाहीं-विशेष स्वरूपाचा निश्चय करीत नाहीं-( तो ) १० झोपाळु माणसाप्रमाणें ( किंवा ) ११ खांबाप्रमाणें १२ च १३ स्तब्ध राहतो. ॥ ११८ ॥

ह्यांत तमोगुणाचीं कार्यें सांगितलीं आहेत. ॥ ११८ ॥

सत्वं विशुद्धं जलवत्तथापि ताभ्यां मिलित्वा
* सरणाय कल्पते । यत्रात्मबिम्बः प्रतिबिम्बितः सन्
प्रकाशयत्यर्क इवाखिलं जडम् ॥ ११९ ॥

सत्त्वं । विशुद्धं । जलवत् । तथा । अपि । ताभ्यां । मिलित्वा । सरणाय । कल्पते ॥ यत्र । आत्मबिम्बः । प्रतिबिम्बितः । सन् । प्रकाशयति । अर्कः । इव । अखिलं । जडम् ॥ ११९ ॥

अर्थः—१ सत्त्वगुण २ जलाप्रमाणें ३ निर्मल ( आहे ), ४ तरी ५ सुद्धां ( रजोगुण व तमोगुण ) ६ या दोहोंबरोबर ७ मिश्र होऊन

* कोठें " शरणाय " असा पाठ आढळतो. " शरणाय कल्पते " ह्याचा अर्थ " शरण जाण्याला योग्य होतो-हीनत्व पावतो-" असा होईल. " सरणं=संसरणं=संसारः " हा पाठ अधिक बरा दिसतो.

( तो ) ८ संसाराला ( हेतु होण्यास ) समर्थ होतो. १० त्या ( सत्त्व-गुणांत ) ११ आत्मबिंब-शुद्धचैतन्यस्वरूप-१२ प्रतिबिंबित १३ होऊन, ( आरशांत प्रतिबिंबित झालेला ) १४ सूर्य ( ज्याप्रमाणें भिंत वगैरे पदार्थांस प्रकाशित करितो ) १५ त्याप्रमाणें १६ सर्व १७ जडाला-देहादि पदार्थांस प्रकाशित करितें. ॥ ११९ ॥

सत्त्वगुण स्वतः शुद्ध आहे, तरी रजोगुण व तमोगुण यांनीं युक्त होऊन तो बंधनाला हेतु होतो. ह्मणून शुद्ध सत्त्व गुण राखण्या करितां प्रयत्न करावा. ॥ ११९ ॥

**मिश्रस्य सत्वस्य भवन्ति धर्मास्त्वमानिताद्या नियमा यमाद्याः। श्रद्धा च भक्तिश्च मुमुक्षुता च दैवी च संपत्तिरसन्निवृत्तिः ॥ १२० ॥**

मिश्रस्य[16] । सत्त्वस्य[17] । भवन्ति[18] । धर्माः[15] । तु[14] । अमानिताद्याः[1] । नियमाः[2] । यमाद्याः[3] । श्रद्धा[4] । च[5] । भक्तिः[6] । च[7] । मुमुक्षुता[8] । च[9] । दैवी[10] । च[12] । संपत्तिः[11] । असंनिवृत्तिः[13] ॥ १२० ॥

**अर्थः**—१ मानी नसणें, ( ढोंगी नसणें, ) * इत्यादि, ( शौचसंतोषादि ) २ नियम, ( अहिंसा, सत्य, चोरी न करणें, स्थिरसुखासन इत्यादि ) ३ यम, ४ श्रद्धा ५ आणि ६ भक्ति ७ आणि ८ मोक्षेच्छा ९ आणि १० दैवी-देवांच्या कृपेनें * प्राप्त झालेली-११ संपत्ति, १२ आणि १३ आसुरी-दुष्ट-संपत्तीपासून दूर असणें, १४ असे ( हे ) १५ धर्म १६ मिश्र १७ सत्त्वगुणाचे १८ आहेत. ॥ १२० ॥

अन्य गुणांनीं युक्त असलेल्या सत्त्वगुणाचे धर्म सांगितले. ॥ १२० ॥

---

*“ अमानित्वमदाम्भित्वमहिंसा क्षान्तिरार्जवम् । ” इत्यादि भगवद्गीतेंत सांगितलेले धर्म.

* भगवद्गीतेचा १६ व्या अध्यायांत सांगितलेली.

**विशुद्धसत्वस्य गुणाः प्रसादः स्वात्मानुभूतिः परमा प्रशान्तिः । तृप्तिः प्रहर्षः परमात्मनिष्ठा यया सदानन्दरसं समृच्छति ॥ १२१ ॥**

विशुद्धसत्त्वस्य[१२] । गुणाः[११] । प्रसादः[१] ।स्वात्मानुभूतिः[२] । परमा[३] । प्रशान्तिः[४] । तृप्तिः[५] । प्रहर्षः[६] । परमात्मनिष्ठा[१०] । यया[७] । सदानन्दरसं[८] । समृच्छति[९] ॥ १२१ ॥

**अर्थः**--१ प्रसन्नता-मनआदि इंद्रियांची ग्लानी न होणें, २ आत्मस्वरूपसाक्षात्कार, ३ उत्तम-बाह्य लाभावांचून असलेली-४ शांति, ५ तृप्ति, ६ अत्यानंद ( आणि ) ७ जिच्या योगानें-जी प्राप्त झाली असतां-८ अविनाशिसुखाच्या अनुभवाप्रत ( पुरुष ) ९ जातो-पोहोंचतो-( अशी ) १० परमात्मनिष्ठा ब्रह्मात्मनिश्चय-( हे ) ११ धर्म अतिशुद्ध १२ सत्वगुणाचे ( आहेत. ) ॥ १२१ ॥

केवल शुद्ध सत्त्वगुणाचीं कार्यें सांगितलीं ॥ १२१ ॥

**अव्यक्तमेतत्त्रिगुणैर्निरुक्तं तत्कारणं नाम शरीरमात्मनः । सुषुप्तिरेतस्य विभक्त्यवस्था प्रलीनसर्वेन्द्रियबुद्धिवृत्तिः ॥ १२२ ॥**

अव्यक्तं[३] । एतत्[४]त्रिगुणैः[१] । निरुक्तं[२] । तत्[५] । कारणं[६] । नाम[७] । शरीरं[८] । आत्मनः[५] । सुषुप्तिः[१२] । एतस्य । विभक्त्यवस्था[११] । प्रलीनसर्वेन्द्रियबुद्धिवृत्तिः[१०] ॥ १२२ ॥

**अर्थः**--( सत्त्व, रज व तम ) १ ह्या तीन गुणांनीं ( युक्त असें ) २ वर्णन केलेलें ( जें ) ३ अव्यक्त ४ तें ५ आत्म्याचें ६ कारण ७ नांवाचें ८ शरीर-स्थूल व सूक्ष्म शरीरांचें कारण आणि ब्रह्मज्ञानानें नाश पावणारें ( आहे ). ९ ह्या ( कारणशरीराभिमानी* आत्म्याची बाह्य व आंतर अशा)

---

* पान ५५ वरील टीप पहा.

१० सर्व इंद्रियांच्या आणि बुद्धीच्या वृत्ति जिच्यांत लय पावतात (अशी जागृति व स्वप्न ह्यांहून) ११ वेगळी अवस्था १२ सुषुप्ति-गाढ झोंप (आहे).

पूर्वी सांगितलेलें गुणत्रयात्मक अव्यक्तच कारण शरीर आहे. ॥ १२२ ॥

सर्वप्रकारप्रमितिप्रशान्तिर्बीजात्मनावस्थितिरेव बुद्धेः । सुषुप्तिरेतस्य किल प्रतीतिः । किञ्चिन्न वेद्मीति जगत्प्रसिद्धेः ॥ १२३ ॥

सर्वप्रकारप्रमितिप्रशान्तिः । बीजात्मना । अवस्थितिः । एव । बुद्धेः ॥ सुषुप्तिः । एतस्य । किल । प्रतीतिः । किञ्चित् । न । वेद्मि । इति । जगत्प्रसिद्धेः ॥ १२३ ॥

अर्थः–(प्रत्यक्ष, अनुमान इत्यादि) १ सर्वप्रकारच्या प्रमितींचा-यथार्थ किंवा भ्रांत ज्ञानांचा-(इंद्रियादिकांचा लय झाल्यामुळें) लय होणें (आणि) २ बुद्धीची-अंतःकरणाची-३ कारणरूपानें ४ च ५ स्थिति असणें (ही) ६ सुषुप्ति अवस्था (होय ((मी) ७ कांहीं ८ जाणत ९ नाहीं १० अशा ११ लौकिक प्रसिद्धी वरून १२ ह्या (कारण शरीराचा-अज्ञानाचा) १३ खरोखर १४ प्रत्यय (आहे)॥ १२३ ॥

सुषुप्तीचें लक्षण सांगून, सुषुप्तींत मला कांहीं समजलें नाहीं असा सर्वांचा अनुभव असल्यामुळें, ह्या सुषुप्तीचा साक्षी आत्मा असून त्याची ही अवस्था कारण शरीराच्या अभिमानामुळें आहे असें ह्यांत सुचविलें आहे. १२३ ॥

देहेन्द्रियप्राणमनोहमादयः सर्वे विकारा विषयाः सुखादयः । व्योमादिभूतान्यखिलं च विश्वमव्यक्तपर्यन्तमिदं ह्यनात्मा ॥ १२४ ॥

देहेन्द्रियप्राणमनोहमादयः । सर्वे । विकाराः । विषयाः । सुखादयः ॥ व्योमादिभूतानि । अखिलं । च । विश्वं अव्यक्तपर्यन्तं । इदं । हि । अनात्मा ॥ १२४ ॥

अर्थः—१ देह, इंद्रियें, प्राण, मन, अहंकार इत्यादि, ( शब्दादि ) २ विषय, ३ सुखादि मानसिक विकार, ( व कामादि इतर ) ४ सर्व ५ विकार-कार्यवर्ग-( त्यांचें कारण ) ६ आकाशादि भूतें, ७ आणि ८-अव्यक्ता-पर्यंत-मायेसुद्धां-९ सर्व १० विश्व-दृश्य-११ हें ( सर्व ) १२ हि १३ अनात्मा-आत्म्याहून भिन्न-जड-( आहे )-आत्मा नाहीं. ॥ १२४ ॥

देहापासून अव्यक्तापर्यंत सर्व अनात्मा आहे. ॥ १२४ ॥

**माया मायाकार्यं सर्वं महदादिदेहपर्यन्तम् । असदिदमनात्मतत्त्वं विद्धि त्वं मरुमरीचिकाकल्पम् ॥१२५॥**

**माया । मायाकार्यं । सर्वं । महदादिदेहपर्यन्तं ॥ असत् । इदं । अनात्मतत्त्वं । विद्धि । त्वं । मरुमरीचिकाकल्पम् ॥ १२५॥**

अर्थः--१ माया ( आणि ) मायेचें २ कार्य ( ह्मणजे ) महत्तत्त्वापासून स्थूल देहापर्यंत ४ सर्व ५ मिथ्या ( आहे ). ६ हें ( बाधित होतें ह्मणून ( ७ आत्मतत्त्व नाहीं. ८ तूं ( ह्याला ) ९ उखर भूमीवरील ( सूर्यकिरणांमुळें भासणाऱ्या ( मृगजलाप्रमाणें ) मिथ्या १० समज.

माया व सर्व मायाकार्य मिथ्या असून अनात्मा आहे. ॥ १२५ ॥

**अथ ते संप्रवक्ष्यामि स्वरूपं परमात्मनः । यद्विज्ञाय नरो बन्धान्मुक्तः कैवल्यमश्नुते ॥ १२६ ॥**

**अथ । ते । संप्रवक्ष्यामि । स्वरूपं । परमात्मनः । यत् । विज्ञाय । नरः । बन्धात् । मुक्तः । कैवल्यं । अश्नुते ॥ १२६ ॥**

अर्थः— ( अनात्म्याचें स्वरूप सांगून ) १ आतां २ तुला ३ परमात्म्याचें-जडाहून विलक्षण चेतनात्म्याचें-४ स्वरूप ५ सांगतों. ६ तें ७ जाणलें असतां ८ पुरुष ( जन्ममरणरूप ) ९ बंधापासून १० सुटून ११ मोक्षाचा-नित्यनिरतिशयस्वात्मसुखाचा-१२ अनुभव घेतो. ॥ १२६ ॥

परमात्मा तो कोण असा शिष्यानें प्रश्न केला होता त्याचें उत्तर देण्याचा उपक्रम केला आहे. ॥ १२६ ॥

**अस्ति कश्चित्स्वयं नित्यमहंप्रत्ययलम्बनः ।**
**अवस्थात्रयसाक्षी सन् पञ्चकोशाविलक्षणः॥१२७॥**

अस्ति । कश्चित् । स्वयं । नित्यं । अहंप्रत्ययलम्बनः ॥ अवस्थात्रयसाक्षी । सन् । पञ्चकोशाविलक्षणः ॥ १२७ ॥

**अर्थः**—( पुढें सांगण्यांत येणाऱ्या ) १ पंच कोशांहून वेगळा, ( जाग्रदादि ) २ तीन अवस्थांचा साक्षी ३ असून ४ नेहमीं मरण-कालपावतों-" मीं " ( अशा ) ५ प्रत्ययाचा विषय ६ कोणी एक-मन वाणीला अविषय ७ आपण आत्मा आहे-८ स्थूलादिकांचा अभाव असून हि " मी " ह्या अव्यभिचारी प्रत्ययानें स्वतः विद्यमान आहे.

मीं ह्या प्रत्ययानें अनुभवास येणाऱ्या आत्म्याचें स्वरूप सांगितलें ॥ १२७ ॥

**यो विजानाति सकलं जाग्रत्स्वप्नसुषुप्तिषु ।**
**बुद्धितद्वृत्तिसद्भावमभावमहमित्ययम्॥ १२८ ॥**

यः । विजानाति । सकलं । जाग्रत्स्वप्नसुषुप्तिषु । बुद्धितद्वृत्तिसद्भावं । अभावं । अहं । इति । अयम् ॥ १२८ ॥

**अर्थः**—१ जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तीन अवस्थांत २ सर्वाला-दृश्य जडवर्गाला-( आणि ) ३ अंतःकरण व त्याच्या परिणामवृत्ति ह्यांच्या ४ सद्भावाला-असण्याला-५ जो ( साक्षात् ) ६ जाणतो ( तो ) ७ हा ८ मी ९ अशा ( प्रत्ययाचा विषय आहे. )

अवस्थात्रयाचा साक्षी आत्मा आहे. हेंच स्पष्ट करून सांगितलें. ॥ १२८ ॥

**यः पश्यति स्वयं सर्वं यं न पश्यति कश्चन ।**
**यश्चेतयति बुध्यादि न तद्यं चेतयत्ययम्॥१२९॥**

यः । पश्यति । स्वयं । सर्वं । यं । न । पश्यति । कश्चन । यः । चेतयति । बुध्यादि । न । तत् । यं । चेतयति । अयम् ॥ १२९ ॥

अर्थः--१ जो २ सर्व ( जड प्रपंचाला ) ३ स्वतः-इतराच्या आधीन न होऊन-४ पहातो ५ ज्याला ६ कोणीहि ७ पहात ८ नाहीं ९ जो १० बुद्धि ( प्राण इंद्रियें ) इत्यादि कांना ( आपली सत्तास्फूर्ति देऊन ) ११ प्रकाशित होण्यास समर्थ करितो, ( आणि ) १२ ज्यास १३ तीं-बुध्यादिक-१४ प्रकाशित १५ नाहींत, ( तो ) १६ हा ( अहंप्रत्ययाचा विषय चेतनात्मा आहे. ॥ १२९ ॥

सर्वांना प्रकाशित करणारा चेतनात्माच आहे त्याला प्रकाशित करणारा कोणीहि नाहीं ॥ १२९ ॥

**येन विश्वमिदं व्याप्तं यं न व्याप्नोति किञ्चन।**
**आभारूपमिदं सर्वं यं भान्तमनुभात्ययम्॥१३०॥**

**येन[३] । विश्वं[२] । इदं[१] । व्याप्तं[४] । यं[५] । न[८] । व्याप्नोति[७] । किञ्च[६]-न ॥ आभारूपं[११] । इदं[९] । सर्वं[१०] । यं[१२] । भान्तं[१३] । अनु[१४] । भाति[१५] । अयम्[१६] ॥ १३० ॥**

अर्थः--हें ( स्थूल सूक्ष्म ) २ जगत ३ ज्या ( आत्म्यानें ) ४ व्यापिलें आहे, ( परंतु ) ५ ज्या ( आत्म्याला ) कांहींहि-परिच्छिन्न जगत् ७ व्यापित ८ नाहीं ( व ) ९ हें १० सर्व ११ छायेसारखें ( जगत् ) १२ जो ( आत्मा ) १३ प्रकाशमान झाला असतां ( त्याची सत्तास्फूर्ति घेऊन ) १४ नंतर १५ प्रकाशित होतें, ( तो ) १६ हा ( अहंप्रत्ययाचा विषय आत्मा आहे. )

हा चेतनात्मा सर्व जगाला व्यापून आहे. ॥ १३० ॥

**यस्य सन्निधिमात्रेण देहेन्द्रियमनोधियः ।**
**विषयेषु स्वकीयेषु वर्तन्ते प्रेरिता इव ॥ १३१ ॥**

**यस्य[२] । सन्निधिमात्रेण[३] । देहेन्द्रियमनोधियः[१] ॥ विषयेषु[५] । स्वकीयेषु[४] । वर्तन्ते[८] । प्रेरिताः[६] । इव[७] ॥ १३१ ॥**

**अर्थः**—१ देह, इंद्रियें, मन आणि बुद्धि ( हीं ) २ ज्या ( आत्म्याच्या ) ३ सान्निध्यानेंच-केवल सत्ता स्फूर्तीनें-आप ४ आपल्या ( शब्दादि ) ५ विषयांच्या ठिकाणीं ( लोहचुंबक न्यायानें ) ६ प्रेरणा केल्या ७ सारखीं ८ प्रवृत्त होतात, ( तो हा कूटस्थ आत्मा होय ). ॥ १३१ ॥

देहादि ज्याप्रमाणें व्यवहार करितात तद्वत् जगताला प्रकाशित करण्यांत आत्म्याचा व्यवहार नसून केवळ आत्म्याच्या सान्निध्यानें जगत् प्रकाशित होत आहे, ह्मणून आत्मा कूटस्थ, निर्विकार आहे, व जगत् कधीं भासतें व कधीं भासत नाहीं. १३१

**अहङ्कारादिदेहान्ता विषयाश्च सुखादयः ।**
**वेद्यन्ते घटवद्येन नित्यबोधस्वरूपिणा ॥ १३२ ॥**

अहङ्कारादिदेहान्ताः । विषयाः । च । सुखादयः ॥ वेद्यन्ते । घटवत् । येन । नित्यबोधस्वरूपिणा ॥ १३२ ॥

**अर्थ**—( पूर्वी सांगितलेले ) अहंकारापासून देहापर्यंत ( पदार्थ ), ( शब्दादि ) २ विषय ३ आणि ४ सुखादि ( विकार हे ) ५ ज्या ६ अखंडज्ञानस्वरूप ( आत्म्याकडून ) ७ घटाप्रमाणें प्रकाशित होतात, ( तो अहंप्रत्ययाचा विषय आत्मा आहे ) ॥ १३२ ॥

स्वतः जड असलेल्या अहंकारादिकांना प्रकाशित करणारा आत्मा असल्यामुळें अहंप्रत्ययाचा विषय अहंकारादि नसून चेतनात्माच आहे. ॥ १३२ ॥

**एषोऽन्तरात्मा पुरुषः पुराणो निरन्तराखण्डसुखानुभूतिः । सदैकरूपः प्रतिबोधमात्रो**
**येनेषिता वागसवश्चरन्ति ॥ १३३ ॥**

एषः । अन्तरात्मा । पुरुषः । पुराणः । निरन्तराखण्डसुखानुभूतिः ॥ सदा । एकरूपः । प्रतिबोधमात्रः । येन । ईषिताः । वाग् । असवः । चरन्ति ॥ १३३ ॥

**अर्थः**—१ ज्याकडून २ प्रेरित होऊन-ज्याच्या प्रेरणेनेंच ३ वागादि ( कर्मेंद्रियें व ) ४ प्राण ( नियमानें ) ५ वागतात, ( तो ) ६ हा ( सर्व

वृत्तींच्या ठायीं व्यक्त असलेला ) ७ केवलचेतनात्मा, ८ सर्वकाळ ९ एकरसस्वभावानें असणारा, १० निरंतर भेदरहित व अखंड-संबंधशून्य-सुखानुभवरूप ११ जुनाट-सनातन-१२ अन्तरात्मासर्वांच्या आंत असणारा आत्मा १३ पुरुष-पूर्णचेतनरूप-आहे. ॥ १३३ ॥

आत्मा पूर्णचेतनरूप असल्यामुळें त्याला जडाचा अनुभव होऊन तो सविशेष होत नाहीं हें ह्यांत सिद्ध झालें. ॥ १३३ ॥

**अत्रैव सत्त्वात्मनि धीगुहायामव्याकृताकाश**
***उशत्प्रकाशः । आकाश उच्चैरविवत्प्रकाशते**
**स्वतेजसा विश्वमिदं प्रकाशयन् ॥ १३४ ॥**

अत्र । एवं । सत्त्वात्मनि । धीगुहायां । अव्याकृताकाशे । उशत्प्रकाशः ॥ आकाशः । उच्चैः । रविवत् । प्रकाशते । स्वतेजसा । विश्वं । इदं । प्रकाशयन् ॥ १३४ ॥

अर्थः—१ एथें देहांत-२ च ३ सत्त्वगुणप्रधान अंतः करणांत ४ बुद्धिरूप गुहेच्या ठायीं ( कारणतारूपानें अनुगत असलेल्या ) ५ अव्याकृत आकाशामध्यें-मायाख्य कारण शरीरामध्यें-अति-तेजस्वी ( व्यापक चेतनरूप ) ७ आकाश ( आहेतें ) ८ आपल्या चेतन प्रकाशानें ९ ह्या १० जडवर्गाला ११ प्रकाशित करून १२ सर्वोत्कृष्टरूपानें १३ सूर्याप्रमाणें १४ प्रकाशमान आहे. ॥ १३४ ॥

चेतनात्मा कोठें सांपडेल तें एथें सांगितलें ॥ १३४ ॥

**ज्ञातामनोहंकृतिविक्रियाणांदेहेन्द्रियप्राणकृत-**
**क्रियाणाम् । अयोऽग्निवत्ताननुवर्तमानोन**
**चेष्टते नो विकरोति किञ्चन ॥ १३५ ॥**

---

* “ उरु प्रकाशः ” असाहि पाठ आढळतो अर्थभेद नाहीं.

ज्ञाता[4] । मनोहंकृतिविक्रियाणां[2] । देहेन्द्रियप्राणकृतक्रियाणां[3] ॥
अयोऽग्निवत्[1] । ( अयःअग्निवत् ) । तान्[5] । अनुवर्तमानः[6] । न[8] ।
चेष्टते[7] । नो[11] । विकरोति[10] । किञ्चन[9] ॥ १३५ ॥

**अर्थः**—( तापलेल्या ) १ लोखंडांत ( असलेला ) अग्नि ( ज्याप्रमाणें त्या लोखंडाच्या तुकड्यासारखा वर्तुळ त्रिकोणाकृति वगैरे भासत असूनहि तसा नसतो ), त्याप्रमाणें २ मनाच्या ( व ) अहंकाराच्या-अंतःकरणाच्या विकारांना-परिणामांना-( आणि स्थूल ) ३ देहाच्या, ( बाह्य ) इंद्रियांच्या ( व ) प्राणाच्या क्रियांना ४ जाणणारा-त्यांचा प्रकाशक-साक्षी-( आत्मा ) निरनिराळ्या उपाधीमुळें ( त्या ) निरनिराळ्या ( आकारांचा ) ६ भासत असून ( स्वतःकांहीं ) ७ क्रिया करीत ८ नाहीं. ( व ) कोणत्याहि १० विकाराला पावत ११ नाहीं. ॥ १३५ ॥

आत्मा सर्वज्ञ असून विकारी नाहीं हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. ॥ १३५ ॥

न जायते नो म्रियते न वर्धते न क्षीयते नो
विकरोति नित्यः । विलीयमानेऽपि वपुष्यमु-
ष्मिन्न लीयते कुम्भ इवाम्बरं *स्वयम्॥१३६॥

न[2] । जायते[1] । नो[11] म्रियते[10] । न[5] । वर्धते[4] । न[8] । क्षीयते ।
नो[7] । विकरोति[6] । नित्यः[3] । [17]विलीयमाने । अपि[18] । वपुषि[16] ।
अमुष्मिन्[15] । न[21] । [20]लीयते । कुम्भे[12] । इव[13] । अम्बरं[14] ।
स्वयम्[19] ॥ १३६ ॥

**अर्थः**—( हा आत्मा ) १ जन्मत २ नाहीं, सर्वकाळ ३ विद्यमान असल्यामुळें ( जन्मानंतरच्या "आहे" ह्या विकारालाहि पावत नाहीं ), ४ वाढत ५ नाहीं, ६ परिणामाला पावत ७ नाहीं, ८ क्षीण होत नाहीं. ९ ( व ) १० मरत ११ नाहीं. १२ घट ( नाश १७ पावला असतां १८

* "अंबरः" असा पुल्लिंगी पाठहि कोठें आढळतो, परंतु अंबर शब्द प्रायःनपुसकलिंगीच उपयोगांत येतो ह्मणून वरील पाठच बरा दिसतो.

हि ) १३ जसें ( घटांतील ) १४ आकाश हें १५ ( स्थूल ) १६ शरीर १७ नाश पावलें असतां १८ हि १९ आपण स्वतः २० नाश पावत २१ नाहीं. तसाहा आत्मा ॥ १३६ ॥

जायते—जन्मतो—,अस्ति—आहे—,वर्धते—वाढतो—,विपरिणमते—विकारी होतो, क्षीयते—क्षीण होतो—आणि म्रियते—मरतो—हे जे सहा स्थूल देहाचे विकार ते आत्म्याच्या ठिकाणीं नसून तो निर्विकार आहे. ॥ १३६ ॥

**प्रकृतिविकृतिभिन्नः शुद्धबोधस्वभावः**
**सदसदिदमशेषं भासयन्निर्विशेषः।**
**विलसति परमात्मा जाग्रदादिष्ववस्था-**
**स्वहमहमिति साक्षात्साक्षिरूपेण बुद्धेः ॥१३७॥**

प्रकृतिविकृतिभिन्नः । शुद्धबोधस्वभावः । सदसद् । इदं । अशेषं । भासयन् । निर्विशेषः ॥ विलसति । परमात्मा । जाग्रदादिषु । अवस्थासु । अहं । अहं । इति । साक्षात् । साक्षिरूपेण । बुद्धेः ॥ १३७ ॥

**अर्थः**—१ कारण व कार्य ह्यांहून वेगळा, २ शुद्धज्ञान स्वरूप, ( नाम, जाति, गुण, क्रिया या ३ ) विशेषांनीं विरहित, ( असा ) ४ परमात्मा ( प्रत्यक्षादिप्रमाणांनीं सिद्ध असें ) सद् ५ असद्-स्थूल सूक्ष्म -६ सर्व कारणांसुद्धां-हें-७ जगत् ८ प्रकाशित करणारा, जागृति ९ वगैरे १० अवस्थांमध्यें ११ मी १२ मी १३ अशा १४ बुद्धीच्या १५ साक्षिरूपानें-बुद्धीचा साक्षी होऊन-१६ प्रत्यक्ष-निरपेक्षतेनें.१७ विलास करीत आहे. वास्तविक निष्क्रिय असून बुद्ध्यादिकांच्या क्रीडांचें अनुकरण करीत आहे असा भासून त्यांना प्रकाशित आहे.

मी अशा प्रत्ययानें अनुभवास येणारा जो आत्मा सांगितला त्याचें लक्षण एथें पुरें झालें. ॥ १३७ ॥

नियमितमनसामुं त्वं स्वमात्मानमात्म-
न्ययमहमिति साक्षाद्विद्धि बुद्धिप्रसादात् ।
जनिमरणतरंगापारसंसारसिन्धुं
प्रतर भव कृतार्थो ब्रह्मरूपेण संस्थः ॥ १३८ ॥

नियमि[5]तमनसा । अ[2]मुं । त्[1]वं । स्[3]वं । आ[4]त्मानं । आ[7]त्मनि । अ[8]यं । अ[9]हं । इ[10]ति । सा[11]क्षात् । [12]विद्धि । बुद्धि[6]प्रसादात् ॥ ज[13]नि-मरणतरंगापारसंसारसिन्धुं । प्र[14]तर । भ[16]व । कृ[17]तार्थः । ब्रह्मरूपेण । संस्[18]थः ॥ १३८ ॥

**अर्थः**—१ तूं-विद्याधिकारी शिष्या-२ ह्या वरसांगितलेल्या-३ आपल्या ४ आत्म्याला, ५ चित्ताला ( विषयांपासून ) निवृत्त करून ६ बुद्धीच्या प्रसन्नतेनें-स्वास्थ्यानें-७ आपणामध्यें-आपल्या देहांतच-८ हा ९ मी आहे-१० असें ११ साक्षात् १२ जाण; १३ जन्ममरणरूपलाटांनीं ( भरलेला असा ) अपार संसारसमुद्र १४ तरून जा; ( आणि ) १५ ब्रह्मरूप १६ होऊन १७ कृतकृत्य १८ हो ॥ १३८ ॥

मी ह्या प्रत्ययानें अनुभवास येणारा साक्षी आत्मा कसा ओळखावा, व त्यास ओळखिल्यानें कोणतें फळ प्राप्त होतें हें एथें सांगितलें आहे. ॥ १३८ ॥

अत्रानात्मन्यहमिति मतिर्बन्ध एषोऽस्य पुंसः
प्राप्तोऽज्ञानाज्जननमरणक्लेशसंपातहेतुः ।
येनैवायं वपुरिदमसत्सत्यमित्यात्मबुध्या
पुष्यत्युक्षत्यवति विषयैस्तन्तुभिः कोशकृद्वत् १३९

अ[1]त्र । अ[2]नात्मनि । अ[3]हं । इ[4]ति । म[5]तिः । बन्[6]धः । ए[7]षः । अ[8]स्य । पुं[9]सः । प्रा[10]प्तः । अज्ञा[11]नात् । जननम[12]रणक्लेशसंपातहेतुः ॥ ये[13]न । ए[14]व । अ[15]यं । व[20]पुः । [16]इदं । अ[19]सत् । स[21]त्यं । [22]इति । आत्[23]म-

बुध्या । पुष्यति । उक्षति । अवति । विषयैः । तन्तुभिः । कोशकृद्वत् ॥ १३९ ॥

अर्थः–१ ह्या ( १२४ व्या श्लोकांत सांगितलेल्या कल्पित देहादि ) २ अनात्म वस्तूंच्या ठायीं ३मी ४ अशी ५ बुद्धि ( हाच ६ मोक्षविरोधि ) बंध ( आहे. ) ७ हा ( बंध ) ८ ह्या ९ पुरुषाला १० अज्ञानामुळें ११ प्राप्त झाला ( तो ) १२ जन्ममरणांमुळें होणाऱ्या दुःखांना हेतु आहे. १३ या ( बंधामुळें १४ च १५ हा मूर्ख जीव-( आपल्या सुखाचें साधन समजून अतिश्रमानें उत्पन्न केलेल्या ) १६ तंतूंनीं १७ कोसला करणारा किडा ज्या प्रमाणें ( आपणासच बांधून घेतो तद्वत् ) हें-१८प्रत्यक्ष-१९ मिथ्या-दृष्टनष्ट स्वभाव-पाहतां-पाहतांच नाश पावणारें-२० शरीर २१ सत्य ( आहे )-तेंच मी आहें-२२ अशी ( त्याच्या ठिकाणीं ) २३ आत्मबुद्धि करून ( त्याचें ) २४ पोषण करितो, ( त्याला ) २५ अभ्यंगादि संस्कार करितो, ( आणि अनुकूल ) २६ विषय देऊन ( त्याचें ) २७ रक्षण करितो सर्वथैव तत्परायण असतो. ॥ १३९ ॥

आत्मा व अनात्मा ह्यांचें सामान्य लक्षण सांगून बंध तो कोणता ? ह्या शिष्याचा प्रश्नाचें उत्तर देण्यांस आरंभ केला आहे. ॥ १३९ ॥

अतस्मिंस्तद्बुद्धिःप्रभवति विमूढस्य तमसा
विवेकाभावाद्वै स्फुरति भुजगे रज्जुधिषणा ।
ततोऽनर्थव्रातो निपतति समादातुरधिकस्ततो
योऽसद्ग्राहः सहि भवति बन्धः शृणु सखे १४०

अतस्मिन् । तद्बुद्धिः । प्रभवति । विमूढस्य । तमसा । विवेकाभावात् । वै । स्फुरति । भुजगे । रज्जुधिषणा ॥ ततः । अनर्थव्रातः । निपतति । समादातुः । अधिकः । ततः । यः । असद्ग्राहः । सः । हि । भवति । बन्धः । शृणु । सखे ॥ १४० ॥

अर्थः---( मोहानें घेरलेलें आहे चित्त ज्याचें अशा ) १ मूर्खाला २ अज्ञानाच्या योगानें जें ३ तसें नाहीं त्याच्या ठिकाणीं तें तसें आहे ४ अशी बुद्धि--एका वस्तूच्या ठिकाणीं दुसऱ्या वस्तूची भावना-५ होते. विवेक ६ नसल्यामुळें ७ च ८ सर्पावर ९ रज्जुबुद्धि १० उद-यास येते. ११ त्या ( रज्जुबुद्धी ) मुळें ( रज्जुबुद्धीनें सर्पाला ) ( उच-लून ) १२ घेणाऱ्या ( पुरुषाला ) १३ मोठा १४ अनर्थसमुदाय १५ प्राप्त होतो. १६ यास्तव ( हे ) १७ प्रिय शिष्या, ( खऱ्याला खोटें व खोट्याला खरें समजणें ही ) १८ जी १९ असत्यबुद्धि २० तो २१ च २२ बंध २३ आहे. ( पुढें ) २४ ऐक. ॥ १४० ॥

अनात्म्याच्या ठिकाणीं आत्मबुद्धि करणें हाच बंध आहे व त्यापासून अनर्थ प्राप्ति होते हें दृष्टांतपूर्वक कथन केलें आहे. ॥ १४० ॥

**अखण्डनित्याद्वयबोधशक्त्या स्फुरन्तमात्मान-**
**मनन्तवैभवम् । समावृणोत्यावृतिशक्तिरेषा**
**तमोमयी राहुरिवार्कबिम्बम् ॥ १४१ ॥**

अखण्डनित्याद्वयबोधशक्त्या । स्फुरन्तं । आत्मानं । अनन्त-वैभवम् ॥ समावृणोति । आवृतिशक्तिः । एषा । तमोमयी । राहुः । इव । अर्कबिम्बम् ॥ १४१ ॥

अर्थः---१ सूर्य मंडळाला २ ज्याप्रमाणें ३ राहुतम; ( झांकतो तद्वत् ) ४ ही ५ तमोगुणप्रधान ६ आवरणशक्ति ७ अखंड, नित्य ( आणि ) अद्वैत ( अशा ज्ञानशक्तीनें ८ स्फुरणाच्या-प्रकाशणाऱ्या-( व ) ९ अविनाशी ऐश्वर्यानें ( संपन्न असलेल्या ) १० आत्म्याला ११ झांकितें-आत्मा असून तो नाहीं असें भासवितें--

बंध कसा प्राप्त झाला ह्या प्रश्नाचें उत्तर दिलें आहे, ॥ १४१ ॥

**तिरोभूते स्वात्मन्यमलतरतेजोवति पुमान-**
**नात्मानं मोहादहमिति शरीरं कलयति ।**

**ततः कामक्रोधप्रभृतिभिरमुं बन्धनगुणैः**
**परं विक्षेपाख्या रजस उरुशक्तिर्व्यथयति ॥१४२॥**

तिरोभूते । स्वात्मनि । अमलतरतेजोवति । पुमान् । अनात्मानं । मोहात् । अहं । इति । शरीरं । कलयति ॥ ततः । कामक्रोधप्रभृतिभिः । अमुं । बन्धनगुणैः । परं । विक्षेपाख्या । रजसः । उरुशक्तिः । व्यथयति ॥ १४२ ॥

**अर्थः**—१ अतिस्वच्छ ( आहे ) तेजज्याचें ( असें ) २ आत्मस्वरूप ( पूर्वोक्त आवरणशक्तीनें ) ३ झांकिलें असतां ४ पुरुष ५ मोहानें-अज्ञानानें- ६ अनात्मरूप ७ शरीराला ८ मी आत्मा-९ असें १० मानितो. ११ नंतर १२ विक्षेप नांवाची १३ रजोगुणाची १४ प्रबल शक्ति १५ ह्या ( मूढपुरुषाला ) १६ कामक्रोधादिरूप १७ बंधनाच्या दोऱ्यांनीं ( बांधून ) १८ अत्यंत १९ पीडा करिते. ॥ १४२ ॥

बंधनाला कारणभूत जी अवधारण शक्ति तिनें स्वस्वरूप आच्छादित केल्यावर विक्षेपशक्ति बंधनाचें विशेष कार्य करिते. ॥ १४२ ॥

**महामोहग्राहग्रसनगलितात्मावगमनोधियो**
**नानावस्थां स्वयमभिनयंस्तद्गुणतया । अपारे**
**संसारे विषयविषपूरे जलनिधौ निमज्ज्योन्म**
**ज्ज्यायं भ्रमति कुमतिः कुत्सितगतिः ॥१४३॥**

महामोहग्राहग्रसनगलितात्मावगमनः । धियः । नानावस्थां । स्वयं । अभिनयन् । तद्गुणतया ॥ अपारे । संसारे । विषयविषपूरे । जलनिधौ । निमज्ज्य । उन्मज्ज्य । अयं । भ्रमति । कुमतिः । कुत्सितगतिः ॥ १४३ ॥

**अर्थः**—१ हा २ भ्रांत बुद्धीचा ( व ) ३ निंदित फल भोगणारा ( जीव ) ४ मूलाज्ञानरूप नक्राच्या ग्रासानें गिळण्यानें नाहींसें झालें आहे

आत्मज्ञान ( ज्यांचें असा होऊन ) ५ बुद्धीच्या ( जाग्रदादि ) अनेक ६ अवस्थांचें ७( बुद्धिरूप ) उपाधिमुळें ८ स्वतः ९ अनुकरण करून-त्या आपल्याच मानून-( बंधनाला हेतुभूत अशा ) १० विषयरूप विषानें भरलेल्या ११ अपार-ज्ञाननौकेवांचून परतीर सांपडण्यास अवघड अशा ( जन्ममरणरूप जलानें भरलेल्या ) १२ संसार १३ सागरांत १४ बुडून ( व पुनः ) १५ वर येऊन १६ गटांगळ्या खात आहे-नीच व उच्च योनींत पुनः पुनः जन्मास येत आहे व मरत आहे. ॥ १४३ ॥

विक्षेपशक्तींच्या बंधनांनीं होणाऱ्या पीडेचे परिणाम येथें विस्तारानें कथन केले आहेत. ॥ १४३ ॥

भानुप्रभासंजनिताभ्रपङ्क्तिर्भानुं तिरोधाय
विजृम्भते यथा । आत्मोदिताहंकृतिरात्मतत्त्वं
तथा तिरोधाय विजृम्भते स्वयम् ॥ १४४ ॥

भानुप्रभासंजनिताभ्रपंक्तिः । भानुं । तिरोधाय । विजृम्भते । यथा ॥ आत्मोदिता । अहंकृतिः । आत्मतत्त्वं । तथा । तिरोधाय । विजृम्भते । स्वयम् ॥ १४४ ॥

अर्थः—१ ज्याप्रमाणें सूर्य २ किरणांमुळें ( पाण्याची वाफ होऊन ) उत्पन्न झालेले मेघ मंडल ३ सूर्याला ४ आच्छादित करून ११( स्वतः ) ५ प्रकट होतें, ६ त्याप्रमाणें ७ आत्म्यापासून उत्पन्न झालेला ८ अहंकार ( शुद्ध ) ९ आत्मस्वरूपाला १० आच्छादित करून ११ स्वतः १२ प्रतीत होतो. ॥ १४४ ॥

कार्य कारणाला आच्छादित करूं शकत नाहीं असा नियम आहे, तथापि सूर्याच्या किरणामुळें उत्पन्न झालेले मेघ सूर्याला आच्छादित करितात असें दिसतें तद्वत् अहंकाराचे आत्म्याला आच्छादित करणें आहे. ॥ १४४ ॥

कवलितदिननाथे दुर्दिने सान्द्रमेघैर्व्यथयाति
हिमझञ्झावायुरुग्रो · यथैतान् । अविरततम

सात्मन्यावृते मूढबुद्धिं क्षपयति बहुदुः
खैस्तीव्रविक्षेपशक्तिः ॥ १४५ ॥

कवलितदिननाथे । दुर्दिने । सान्द्रमेघैः । व्यथयति । हिमझञ्झावायुः । उग्रः । यथा । एतान् ॥ अविरततमसा । आत्मनि । आवृते । मूढबुद्धिं । क्षपयति । बहुदुःखैः । तीव्रविक्षेपशक्तिः ॥ १४५ ॥

**अर्थः**—१ ज्याप्रमाणें ( आकाश ढगांनीं आच्छादित आहे अशा ) २ दिवशीं ३ दाट मेघांनीं ४ सूर्याला झांकून टाकिलें असतां ५ भयंकर ६ थंडगार सोसाट्याचा वारा ७ ह्या * ( लोकांना ) ८ हैराण करितो, ( त्याप्रमाणें ) ९ निबिड अज्ञानरूप अंधकारानें १० चेतनात्म्याला ११ झांकून टाकिलें असतां, १२ प्रबल विक्षेपशक्ति १३ विवेकशून्य ( पुरुषाला आध्यात्मिकादि ) १४ अनेक क्लेशांच्या योगानें १५ हैराण करिते-सतत नाना योनींमध्यें भ्रमण करण्यास लाविते— ॥ १४५ ॥

विक्षेपशक्ति मूर्खाला कशी पीडा देते हें दृष्टांत पूर्वक सांगितलेलें आहे. ।१४५।

एताभ्यामेव शक्तिभ्यां बन्धः पुंसः समागतः ।
याभ्यां विमोहितो देहं मत्वात्मानं भ्रमत्ययम् १४६

एताभ्यां । एव । शक्तिभ्यां । बन्धः । पुंसः । समागतः । याभ्यां । विमोहितः । देहं । मत्वा । आत्मानं । भ्रमति । अयम् ॥ १४६ ॥

**अर्थः**—१ ह्या-पूर्वोक्त-दोन २ शक्तींच्या ३ योगानेंच ४ पुरुषाला चेतनाला-( पूर्वीं सांगितलेल्या प्रकारचा ) ५ बंध ६ प्राप्त झाला आहे. ७ या ( दोन शक्तींमुळें स्वस्वरूपाची ) ८ भूल पडून ९ हा ( जिव ) १० देहाला ११ आपण १२ मानून ( संसारारण्यांत निरंतर ) १३ भ्रमण करीत आहे.

---

* " एतान् " ह्याचा अर्थ "मेघांना" व " व्यथयति " ह्याचा " इकडून तिकडे फिरवितो " असाहि केलेला आहे.

आवरण व विक्षेप ह्या दोन शक्तिच बंधाला कारण आहेत ह्मणून सांगितलें १४६

**बीजं संसृतिभूमिजस्य तु तमो देहात्मधीरङ्कुरो**
**रागः पल्लवमम्बु कर्म तु वपुः स्कन्धोऽसवः**
**शाखिकाः । अग्राणीन्द्रियसंहतिश्च विषयाः**
**पुष्पाणि दुःखं फलं नानाकर्मसमुद्भवं**
**बहुविधं भोक्तात्र जीवः खगः ॥ १४७ ॥**

[2]बीजं । [1]संसृतिभूमिजस्य । [4]तु । [3]तमः । [5]देहात्मधीः । [6]अङ्कुरः । [7]रागः । [8]पल्लवं । [10]अम्बु । [9]कर्म । [11]तु । [12]वपुः । [13]स्कन्धः । [14]असवः । [15]शाखिकाः ॥ [17]अग्राणि । [16]इन्द्रियसंहतिः । [18]च । [19]विषयाः । [20]पुष्पाणि । [23]दुःखं । [24]फलं । [21]नानाकर्मसमुद्भवं । [22]बहुविधं । [26]भोक्ता । [25]अत्र । [27]जीवः । [28]खगः ॥ १४७ ॥

**अर्थः**–१ संसाररूप वृक्षाचें २ बीज-उपादानकारण-( वासनेसहित ) ३ अज्ञान ( हें आहे ) ४ आणि ५ देहाच्या ठिकाणीं आत्मत्वबुद्धि करणें ( हा ) ६ अंकुर ( आहे ). ७ इच्छा ८ पालवी ( पुण्यपापरूप ) ९ कर्माचरण १० उदक ११ आणि ( देवमनुष्यादि ) १२ शरीर ( हें ) १३ खोड ( आहे ). १४ प्राण १५ फांद्या, ( अंतर्बाह्य ) १६ इंद्रिय-समुदाय ( शाखांचीं ) १७ अग्रें १८ आणि १९ विषय ( हीं ) २० फुलें ( आहेत ) २१ बहुविध कर्मांपासून उत्पन्न झालेलें २२ अनेक प्रकारचें २३ दुःख ( हें ) २४ फळ ( असून ) २५ ह्या ( संसार वृक्षावर फल ) २६ भोगणारा २७ जीव ( हा ) २८ पक्षी आहे. ॥ १४७ ॥

बंधाची स्थिती कशी झाली ह्या प्रश्नाचें उत्तर संसाराचें वृक्षरूपानें वर्णन करून सांगितलें आहे. ॥ १४७ ॥

**अज्ञानमूलोऽयमनात्मबन्धो नैसर्गिको**
**ऽनादिरनन्त ईरितः । जन्माप्ययव्याधिजरा**

**दिदुःखप्रवाहपातं जनयत्यमुष्य ॥ १४८ ॥**

**अज्ञानमूलः । अयं । अनात्मबन्धः । नैसर्गिकः । अनादिः । अनन्तः । ईरितः ॥ जन्माप्ययव्याधिजरादिदुःखप्रवाहपातं ( जन्म + अप्यय +.... ) । जनयति । अमुष्य ॥ १४८ ॥**

**अर्थः**–१ अज्ञान ( ज्याचें ) मूळ उपादान कारण-( आहे. असा ) २ हा ( देहादि ) ३ अनात्म ( वस्तूंच्या ठायीं आत्मत्वबुद्धिचा अध्यासरूप ) बंध ४ स्वाभाविक-इतर कारणावाचून एकाआज्ञानाने प्राप्त झालेला अनादि पाण्याच्या प्रवाहाप्रमाणें सतत चालणारा-( ज्ञानावांचून दुसऱ्या उपायांनीं ) ६ नाश न पावणारा ( आहे असें ) ७ ह्मटलें आहे. तो बंध ) ८ ह्या ( जीवाला ) ९ जन्म, मरण, रोग, वार्द्धक्य इत्यादि दुःखांच्या प्रवाहाची प्राप्ति करून देतो-या दुःखप्रवाहांत असतो. १४८

बंधाचे मूळ कारण व त्यापासून होणारे अनर्थ ह्यांचा ह्या श्लोकांत उपसंहार केला आहे. ॥ १४८ ॥

**नास्त्रैर्न शस्त्रैरनिलेन वन्हिना छेत्तुं न शक्यो न च कर्मकोटिभिः । विवेकविज्ञानमहासिना विना धातुः प्रसादेन सितेन मञ्जुना ॥ १४९ ॥**

**न । अस्त्रैः । न । शस्त्रैः । अनिलेन । वन्हिना । छेत्तुं । न । शक्यः । न । च । कर्मकोटिभिः ॥ विवेकविज्ञानमहासिना । विना । धातुः । प्रसादेन । सितेन । मञ्जुना ॥ १४९ ॥**

**अर्थः**–१ ईश्वराच्या चेतनात्म्याच्या ठायीं चित्ताच्या २ प्रसन्नतेनें एकाग्रतेनें-३ तीक्ष्ण ( झालेल्या ) ४ मनोहर ५ आत्मानात्मविवेकानें ( उदयास आलेल्या ) ब्रह्मात्मैक्यविज्ञानरूप तरवारी ६ वांचून ( हा बंध ) ७ छेदून टाकणें ८ शक्य ९ नाहीं. ( तो ब्राह्मादि ) १० अस्त्रांनीं ( छेदणें शक्य ) ११ नाहीं ( तोमर, मुद्गरादि ) १२ शस्त्रांनीं १३ नाहीं. ( प्रलयकालच्या ) १४ वाऱ्यानें १५ अग्नीनें १६ आणि १७ कोट्यवधि ( श्रौत व स्मार्त ) कर्मांनीं. १८ नाहीं.

लौकिक बन्ध छेदण्याचीं साधनें हा बंध छेदण्याच्या उपयोगीं नाहींत. ह्याचा उच्छेद केवल ब्रह्मात्मैक्यज्ञानानेंच होणें शक्य आहे. ॥ १४९ ॥

**श्रुतिप्रमाणैकमतेः स्वधर्मनिष्ठा तयैवात्म-**
**विशुद्धिरस्य । विशुद्धबुद्धेः परमात्मवेदनं**
**तेनैव संसारसमूलनाशः ॥ १५० ॥**

**श्रुतिप्रमाणैकमतेः । स्वधर्मनिष्ठा । तया । एव । आत्मविशुद्धिः । अस्य ॥ विशुद्धबुद्धेः । परमात्मवेदनं । तेन । एव । संसारसमूलनाशः ॥ १५० ॥**

**अर्थः**--१ वेदाच्या प्रमाणतेविषयीं ( ज्याची ) दृढ बुद्धि आहे ( अशा पुरुषाची ) २ स्वधर्मावर निष्ठा असते-त्याकडून निष्काम कर्में होतात-३ त्या ( अधिकारी पुरुषाची ) ४ त्या ( निष्काम कर्मानुष्ठानानें ) ५ च ६ अंतःकरणशुद्धि ( होते ). ७ शुद्धबुद्धि ( झाली असतां त्याला गुरूपदेश श्रवणादिकांनीं ) ८ ब्रह्मात्मैक्यज्ञान ( होतें, आणि ) ९ त्या ( आत्मसाक्षात्कारानें ) १० च ११ अज्ञानासह संसाराची निवृत्ति ( होते ). ॥ १५० ॥

बंधनिवृत्ति कशानें होईल ह्या प्रश्नाचें उत्तर दिलें आहे. ॥ १५० ॥

**कोशैरन्नमयाद्यैः पञ्चभिरात्मा न संवृतो भाति ।**
**निजशक्तिसमुत्पन्नैः शैवालपटलैरिवाम्बुवापीस्थम् १५१**

**कोशैः । अन्नमयाद्यैः । पञ्चभिः । आत्मा । न । संवृतः । भाति ॥ निजशक्तिसमुत्पन्नैः । शैवालपटलैः । इव । अम्बु । वापीस्थम् ॥ १५१ ॥**

**अर्थः**--१ आपल्या सामर्थ्यानें उत्पन्न झालेल्या २ शेवाळीच्या जाळ्यांनीं ३ विहिरींतील ४ पाणी ज्याप्रमाणें ( झांकलें ९ जाऊन ११ लक्ष्यांत येत नाहीं तद्वत आपल्या १ अविद्या शक्तीपासून उत्पन्न झालेल्या )

६ अन्नमयादि-अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय, आनंदमय ह्या-७ पांच ८ कोशांनीं ९ आच्छादित ( झालेला ) १० आत्मा ( अद्वयानंदादिरूपानें ) ११ प्रत्ययास येत १२ नाहीं. ॥ १५१ ॥

५१ व्या श्लोकांत शिष्यानें केलेल्या प्रश्नांपैकीं " आत्मा कोणता व अनात्मा कोणता ? " ह्या शेवटल्या प्रश्नाचें उत्तर देतांना आत्मावरण कसें होतें हें दृष्टांत पूर्वक सांगितलें. ॥ १५१ ॥

**तच्छैवालापनये सम्यक् सलिलं प्रतीयते शुद्धम् ।**
**तृष्णासंतापहरं सद्यः सौख्यप्रदं परं पुंसः ॥१५२॥**

तच्छैवालापनये । सम्यक् । सलिलं । प्रतीयते । शुद्धं ॥
तृष्णासंतापहरं । सद्यः । सौख्यप्रदं । परं । पुंसः ॥ १५२ ॥

**अर्थः**–( पाण्याच्या स्वच्छ स्वरूपाला झांकणाऱ्या ) १ त्या शेवाळीला काढून टाकिलें असतां, २ तृषेमुळें झालेली पीडा नाहींशी करणारें (व) ३ तत्काल ४ अतिशय ५ सुख देणारें ( असें ) ६ निर्मळ ७ पाणी ८ पुरुषाच्या ९ चांगलें १० अनुभवाला येतें-त्याला प्रत्यक्ष दिसतें– ॥ १५२ ॥

शेवाळीनें झांकलेलें पाणी कसें प्राप्त होतें त्याची व्यवस्था सांगितली. ॥ १५२ ॥

**पञ्चानामपि कोशानामपवादे विभात्ययं शुद्धः ।**
**नित्यानन्दैकरसःप्रत्यग्रूपः परं स्वयंज्योतिः ।१५३।**

पञ्चानां । अपि । कोशानां । अपवादे । विभाति । अयं । शुद्धः ॥ नित्यानन्दैकरसः । प्रत्यग्रूपः । परं । स्वयंज्योतिः । १५३ ।

**अर्थः**–( भ्रांतीनें आत्मरूप मानिलेल्या ) १ पांच २ हि ३ कोशांचें ( हे अनात्मा आहेत असा विवेक करून ) ४ निरसन केलें असतां ५ हा ६ निर्मल, ७ अविनाशिसुखमात्र-स्वरूपकूटस्थ-निर्विकार-( सर्वांच्या आंतील ) ८ प्रत्यगात्मा ९ अतिशय १० स्वयंप्रकाश ( असा विद्वानांच्या ) ११ प्रत्ययास येतो. ॥ १५३ ॥

दृष्टांतांतील व्यवस्था दार्ष्टांत भूत आत्मस्वरूपांत योजून दाखविली आहे, ॥ १५३॥

**आत्मानात्मविवेकः कर्तव्यो बन्धमुक्तये विदुषा ।**
**तेनैवानन्दी भवति स्वं विज्ञाय सच्चिदानन्दम् ।१५४।**

आत्मानात्मविवेकः । कर्तव्यः । बन्धमुक्तये । विदुषा ॥ तेन । एव । आनन्दी । भवति । स्वं । विज्ञाय । सच्चिदानन्दम् ॥ १५४ ॥

**अर्थः**—१ जाणत्या पुरुषानें २ बंधापासून सुटका व्हावी ह्मणून आत्मा ( नित्य आहे व ) ३ अनात्मा-जगत्-( अनित्य आहे असा ) निर्णय ४ करावा. ५ त्या ( आत्मानात्मविवेकानें ) ६ च ७ आपण अविनाशी चेतन व आनंदरूप ( ब्रह्म आहों असें ) साक्षात् ९ जाणून ( पुरुष सर्व बंधापासून मुक्त होऊन ) १० सुखी ११ होतो-जीवन्मुक्तिसुखाचा अनुभव घेतो. ॥ १५४ ॥

आत्मानात्म विवेकाची आवश्यकता सांगितली. ॥ १५४ ॥

**मुञ्जादिषीकामिव दृश्यवर्गात् प्रत्यञ्चमात्मान मसङ्गमक्रियम् । विविच्य तत्र प्रविलाप्य सर्वं तदात्मना तिष्ठति यः स मुक्तः ॥ १५५ ॥**

मुञ्जात् । इषीकां । इव । दृश्यवर्गात् । प्रत्यञ्चं । आत्मानं । असङ्गं । अक्रियं ॥ विविच्य । तत्र । प्रविलाप्य । सर्वं । तदात्मना । तिष्ठति । यः । सः । मुक्तः ॥ १५५ ॥

**अर्थः**—१ मुञ्ज नांवाच्या गवतांतून ( आंतील ) २ सळकांडी ३ ज्याप्रमाणें ( ९ वेगळी करितात तद्वत् देहेंद्रियादि ) ४ दृश्यसंघातापासून ( दृश्याला पाहणाऱ्या ) ५ साक्षिरूप, ६ निर्लेप, ७ निष्क्रिय-कूटस्थ-८ आत्म्याला ९ वेगळें जाणून १० त्या ( आत्मस्वरूपांत ) ११ सर्व ( अनात्म वर्गाचा ) १२ लय करून-अभाव आहे असा निश्चय करून-त्या ( १३ अधिष्ठान साक्षी ) रूपानें १४ जो १५ राहतो १६ तो १७ जीवन्मुक्त ( समजावा ). ॥ १५५ ॥

फलासहित विवेकाचें सामान्य निरूपण केलें. ॥ १५५ ॥

**देहोऽयमन्नभवनोऽन्नयमस्तु कोशश्चान्नेन**
**जीवति विनश्यति तद्विहीनः**
**त्वक्चर्ममांसरुधिरास्थिपुरीषराशि-**
**र्नायं स्वयं भवितुमर्हति नित्यशुद्धः ॥ १५६ ॥**

देहः । अयं । अन्नभवनः । अन्नमयः । तु । कोशः । च । अन्नेन । जीवति । विनश्यति । तद्विहीनः ॥ त्वक्चर्ममांसरुधिरास्थिपुरीषराशिः । न । अयं । स्वयं । भवितुं । अर्हति । नित्यशुद्धः ॥ १५६ ॥

अर्थः—१ हा ( आईबापांनीं भक्षण केलेल्या ) २ अन्नरसापासून उत्पन्न झालेला ( प्रतिक्षणींवाढणारा ) ३ देह ४ अन्नमय-अन्नाचा बनलेला-( तरवारीच्या म्यानाप्रमाणें आत्मावरण करणारा असल्यामुळें ) ५ कोश ६ च ( आहे ). ७ आणि ( हा ) ८ अन्नानें ९ वांचतो १० त्यावांचून अन्न मिळालें नाहीं तर-११ नाश पावतो. १२ त्वचा, चर्म, मांस, रक्त, अस्थि विष्ठा ( इत्यादिकांची एक ) रास ( असा ) १३ हा ( देह ) १४ नित्यशुद्ध-कार्य-कारणमलरहित- १९ आत्मा १६ होण्यास १७ योग्य १८ नाहीं. ॥ १५६ ॥

पंचकोशांतील अन्नमय कोशाचें विवरण करून तो आत्मा नाहीं हें सांगितलें. १५६

**पूर्वं * जनेरधि मृतेरपि नायमस्ति**
**जातक्षणः क्षणगुणोऽनियतस्वभावः ।**
**नैकोजडश्च घटवत्परिदृश्यमानः**
**स्वात्मा कथं भवति भावविकारवेत्ता ॥ १५७ ॥**

* " जनेरपि " असा हि पाठ आहे. अर्थदृष्टीनें " अधि " हें अव्यय अधिक सयुक्तिक आहे,

पूर्वं । जनेः । अधि । मृतेः । अपि । न । अयं । अस्ति । जातक्षणः । क्षणगुणः । अनियतस्वभावः ॥ न । एकः । जडः । च । घटवत् । परिदृश्यमानः । स्वात्मा । कथं । भवति । भावविकारवेत्ता ॥ १५७ ॥

**अर्थः**—१ हा ( अन्नमयकोश-देह- )२ जन्माच्या ३ पूर्वी ( व ) ४ मरणाच्या ५ मागून ६ हि ७ असत ८ नाहीं. ( ह्याला मध्येंच ) ९ स्थितिकाल प्राप्त झाला आहे-हा "आहे" ह्या विकाराला पावला आहे-( ह्याचे ) १० गुण क्षणांत ( पालटतात ). ( हा ) ११ अनिश्चित स्वभावाचा- क्षणपरिणामी-१२ एक १३ नाहीं-भिन्नाकृति-१४ आणि ( स्वतः ) १५ चेतनारहित ( व ) १६ घटाप्रमाणें १७ पाहण्यांत येणारा ( असा आहे ह्मणून हा स्थूलदेह ) १८ देहादिसमुदायविकारांचा साक्षी ( जो ) १९ आपला आत्मा ( तो ) २० कसा २१ होईल? ॥ १५७ ॥

देह अनात्मा असून विकारवान् आहे तो आत्मा होणार नाहीं. ॥ १५७ ॥

**पाणिपादादिमान् देहो नात्माव्यङ्गेऽपि जीवनात् । तत्तच्छक्तेरनाशाच्च न नियम्यो नियामकः ॥ १५८ ॥**

पाणिपादादिमान् । देहः । * न । आत्मा । व्यङ्गे । अपि । जीवनात् ॥ तत्तच्छक्तेः ( तत् तत् शक्तेः ) । अनाशात् । च । न । नियम्यः । नियामकः ॥ १५८ ॥

**अर्थः**—१ हात, पायें इत्यादि अवयवें असलेला ( स्थूल ) २ देह ३ आत्मा ४ नाहीं-अनात्मा आहे. ५ एखाद्या अवयवाचा नाश झाला असतां ६ हि ( हा प्राणादिकांच्या क्रियांमुळें ) ७ जिवंत असतो. ( आत्मा निरवयव असल्यामुळें मठाच्या एकाभागाचा नाश झाला असतां

* "देहोनात्मा" ह्याचा "देहःअनात्मा" असाहि पदच्छेद होईल. अर्थांत भेद नाहीं.

आंतील आकाशाचा जसा नाश होत नाहीं, तसा अवयव नाशाबरोबर ) ८ त्या त्या ( अवयवांत अनुगत जी चेतन ) शक्ति तिचा ९ नाश होत नाहीं. ( यास्तव आत्मा ) १० परतंत्र ११ नाहीं. १२ तर ( देहादिकांस प्रेरणा करण्याविषयीं ) १३ स्वतंत्र ( आहे ). ॥ १५८ ॥

देह अनात्मा आहे हें आणखी एका युक्तीनें दाखविलें आहे. ॥ १५८ ॥

**देहतद्धर्मतत्कर्मतदवस्थादिसाक्षिणः ।**
**स्वत एव स्वतः सिद्धं तद्वैलक्षण्यमात्मनः ॥१५९॥**

**देहतद्धर्मतत्कर्मतदवस्थादिसाक्षिणः ॥ स्वतः । एव । स्वतः । सिद्धं । तद्वैलक्षण्यं । आत्मनः ॥ १५९ ॥**

**अर्थः**— १ देह, त्याचे ( स्थूलत्वादि ) धर्म, त्याच्या ( जाणें येणें इत्यादि ) क्रिया, त्याच्या ( बाल्यादि ) अवस्था, इत्यादि अवस्था, इत्यादिकांना साक्षात्पाहणाऱ्या २ आत्म्याचा ( दृश्यजे देहादि ) त्यांपासुन वेगळेपणा ( प्रमाणावांचून ) ४ आयता ५ च ६ स्वतः सिद्ध ( आहे ).

आत्मा देहाचा साक्षी असल्यामुळें देहाहून सहजच भिन्न आहे. घटाला पाहणारा घटाहून भिन्न असतो, तद्वत् देहाला पाहणारा देहाहून भिन्न असला पाहिजे, असें व्यतिरेकी अनुमान हि एथें संभवतें. ॥ १५९ ॥

*** कुल्यराशिर्मांसलिप्तो मलपूर्णोऽतिकश्मलः ।**
**कथं भवेदयं वेत्ता स्वयमेतद्विलक्षणः ॥ १६० ॥**

**कुल्यराशिः । मांसलिप्तः । मलपूर्णः । अतिकश्मलः । कथं । भवेत् । अयं । वेत्ता । स्वयं । एतद्विलक्षणः ॥ १६० ॥**

**अर्थः**—१ हाडांचा समूह, २ मांसानें लेपलेला, ३ मलानें भरलेला, ४ अति ओंगळ ( असा ) ५ हा ( देह ) ६ ह्याहून विलक्षण ( निरवयव, स्वच्छ असा जो ) ७ आपण-आत्मा-( प्रमाणावांचून ) ८ ज्ञाता-साक्षी-( तो ) ९ कसा १० होईल? ॥ १६० ॥

* " शल्यराशि " असाहि पाठ आहे. " कुल्य " व " शल्य " ह्या दोहोंचाहि ' हाड " असा अर्थ होतो.

देह जड, सावयव इत्यादि असल्यामुळें त्याला साक्षित्व घडत नाहीं. ॥ १६० ॥

त्वङ्मांसमेदोऽस्थिपुरीषराशावहंमतिं मूढजनः करोति । विलक्षणं वेत्ति विचारशीलो निजस्वरूपं परमार्थभूतम् ॥ १६१ ॥

त्वङ्मांसमेदोऽस्थिपुरीषराशौ । अहंमतिं । मूढजनः । करोति ॥ विलक्षणं । वेत्ति । विचारशीलः । निजस्वरूपं । परमार्थभूतम् ॥ १६१ ॥

अर्थः—१ मूर्ख पुरुष २ त्वचा, मांस, मेद, अस्थि ( व ) मल ( मूत्र ) यांचा समुदाय ( जो देह ) त्याच्या ठिकाणीं " मी " ३ ( अशी ) बुद्धि ४ करितो-देहच मी असें मानितो-( आणि ) ५ विवेकी पुरुष ( सर्व काळ असणारें ) ६ सिद्धस्वभाव ( असें ) ७ आपलें स्वरूप ( त्या देहाहून ) ८ वेगळें ( आहे असें ) ९ जाणतो. ॥ १६१ ॥

मूर्ख पुरुष देहाला आत्मा मानितो व विवेकी आत्मा देहाहून वेगळा आहे असें जाणतो. ॥ १६१ ॥

देहोऽहमित्येव जडस्य बुद्धिर्देहे च जीवे विदुषस्त्वहंधीः । विवेकविज्ञानवतो महात्मनो ब्रह्माहमित्येव मतिः सदात्मनि ॥ १६२ ॥

देहः । अहं । इति । एवं । जडस्य । बुद्धिः । देहे । च । जीवे । विदुषः । तु । अहंधीः ॥ विवेकविज्ञानवतः । महात्मनः । ब्रह्म । अहं । इति । एव । मतिः । सदात्मनि । ( सति आत्मनि ) ॥ १६२ ॥

अर्थः—( शास्त्र न जाणणाऱ्या ) १ मंदबुद्धि पुरुषाची २ देह ३ मी ( आहे ) ४ अशी ५ च ६ बुद्धि (असते ), ७ आणि ( शास्त्राध्ययन

केलेल्या लौकिक ) ८ पंडिताची ९ देहाच्या ठिकाणीं १० आणि ( प्राणादि उपाधि असलेल्या ) ११ चेतनाच्या ठिकाणीं १२ मी ( अशी) बुद्धि ( असते ) देहविशिष्ट आत्मबुद्धि क्षीरनीराला क्षीर ह्मणण्यासारखी असते- ( परंतु ज्यानें ) १३ आत्मानात्मविवेक यथार्थ ( केला आहे अशा ) १४ महात्म्याचा-अपरोक्षात्मसाक्षात्कारवान् विद्वानाचा- १५ सत्य-अविनाशी आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं १६ मी १७ ब्रह्म १८ असा १९ च २० निश्चय ( असतो. ) ॥ १६२ ॥

मूर्खाची देहाच्या ठिकाणीं अहंबुद्धि असते, व लौकिक पंडिताची देहाला धरून चेतनाच्या ठिकाणीं असते विवेकी पुरुषाचा मात्र मी देहादिनसून ब्रह्म आहे. असा निश्चय असतो ॥ १६२ ॥

**अत्रात्मबुद्धिं त्यज मूढबुद्धे त्वङ्मांसमेदोऽस्थिपुरीषराशौ । सर्वात्मनि ब्रह्मणि निर्विकल्पेकुरुष्व शान्तिं परमां भजस्व ॥ १६३ ॥**

अत्र । आत्मबुद्धिं । त्यज । मूढबुद्धे । त्वङ्मांसमेदोऽस्थिपुरीषराशौ ॥ सर्वात्मनि । ब्रह्मणि । निर्विकल्पे । कुरुष्व । शान्तिं । परमां । भजस्व ॥ १६३ ॥

अर्थः--( हे ) १ मूढमते, २ ह्या ३ त्वचा, मांस, मेद, अस्थि ( व ) मल ( मूत्र यांच्या ) समूहावर-देहावर-( असलेली ) ४ आत्मबुद्धि-तादात्म्याध्यास-५ टाकून दे, ( आणि ) ६ निर्विकल्प ( देशकालवस्तुपरिच्छेदरहित अशा ) ७ सर्वात्म ८ ब्रह्माच्या ठायीं ( ती ) ९ ठेव, ( व ) १० सर्वोत्कृष्ट ११ समाधानाचा १२ अनुभव घे. ॥ १६३ ॥

देहावरील आत्मबुद्धि सोडून ब्रह्माच्या ठायीं ठेविली असतां परम शांति प्राप्त होते. ॥ १६३ ॥

**देहेन्द्रियादावसति भ्रमोदितां विद्वानहंतां न जहाति यावत् । तावन्न तस्यास्ति विमुक्तिवार्ता-**

प्यस्त्वेष वेदान्तनयान्तदर्शी ॥ १६४ ॥

देहेन्द्रियादौ । असति । भ्रमोदितां । विद्वान् । अहंतां । न । जहाति । यावत् ॥ तावत् । न । तस्य । अस्ति । विमुक्तिवार्ता । अपि । अस्तु । एषः । वेदान्तनयान्तदर्शी ॥ १६४ ॥

**अर्थः**—१ जोंपर्यंत ( लौकिक ) २ वेदान्ती ( सद्रूप आत्म्याहून भिन्न अशी ) ३ मिथ्या ४ देहेन्द्रियादिकांच्या ठायीं ५ भ्रांतीनें उत्पन्न झालेली ६ आत्मबुद्धि ७ सोडीत ८ नाहीं, ९ तोंपर्यंत १०-हा पंडित-११ वेदांतशास्त्राच्या सिद्धांतांत पारंगत-वेदांतशास्त्राचें अध्ययन व अध्यापन करण्यांत निपुण-१२ असला, १३ तरी १४ त्याजवळ १५ मोक्षाची वार्ता १६ असत १७ नाहीं- तो नांवाचा पंडित असून त्याला मोक्षस्वरूप कळणें दुर्लभ आहे—॥ १६४ ॥

ब्राह्मणत्वादि वर्णाश्रमांचा अभिमान धरून देहाध्यासानें वागणारे विद्वान् तत्त्वदर्शी नाहींत. ॥ १६४ ॥

छायाशरीरे प्रतिबिम्बगात्रे यत्स्वप्नदेहे हृदि कल्पिताङ्गे । यथात्मबुद्धिस्तव नास्ति काचि-ज्जीवच्छरीरे च तथैव मास्तु ॥ १६५ ॥

छायाशरीरे । प्रतिबिम्बगात्रे । यत् । स्वप्नदेहे । हृदि । कल्पिताङ्गे ॥ यथा । आत्मबुद्धिः । तव । न । अस्ति । काचित् । जीवच्छरीरे ( जीवत् शरीरे ) । च । तथा । एव । मा । अस्तु ॥ १६५ ॥

**अर्थः**—१ ज्याप्रमाणें २ छायारूप शरीराच्या अभासावर, ( पाण्यांत वगैरे पडलेल्या ) ३ शरीराच्या प्रतिबिंबावर ४ कांहींतरी ( कल्पित ) ५ स्वप्नांतील देहावर ( आणि ) ६ मनांत ( मनोरथमात्र ७ कल्पिलेल्या देहावर ८ तुझा कांहीं ९ हि-अल्पमात्र देखील-१० आत्माभिमान ११ असत १२ नाहीं, १३ त्याप्रमाणें १४ च ( प्राणादि-

कांनीं युक्त अशा ह्या ) १९ जिवंत शरीरावर १६ हि १७ असूं देऊं १८ नको. ॥ १६५ ॥

देह अनात्मा आहे हें चार दृष्टांतांनीं सांगितलें. ॥ १६५ ॥

**देहात्मधीरेव नृणामसद्धियांजन्मादिदुःखप्रभवस्य बीजम् । यतस्ततस्त्वं जहि तां प्रयत्नात्त्यक्ते तु चित्ते न पुनर्भवाशा ॥ १६६ ॥**

देहात्मधीः । एव । नृणां । असद्धियां । जन्मादिदुःखप्रभवस्य । बीजम् ॥ यतः । ततः । त्वं । जहि । तां । प्रयत्नात् । त्यक्ते । तु । चित्ते । न । पुनः । भवाशा ॥ १६६ ॥

अर्थः—१ ज्याअर्थी २ आत्मविमुख बुद्धीच्या ३ पुरुषाना ४ जन्मादि दुःखें होण्याला ५ देहाच्या ठिकाणीं आत्मबुद्धि ६ च ७ कारण ( आहे ), ८ त्या अर्थी ९ तूं १० ती-देहात्मबुद्धि ११ प्रयत्नानें १२ सोडून दे. १३ कारण १४ देहात्माभिमान १५ सोडला असतां १६ पुनः १७ संसाराची आशा १८ नाहीं ॥ १६६ ॥

दोहत्मबुद्धि सोडली ह्मणजे जन्ममरणरूप संसार पुनः प्राप्त होत नाहीं. ॥ १६६ ॥

**कर्मेन्द्रियैः पञ्चभिरञ्चितोऽयंप्राणो भवेत्प्राणमयस्तु कोशः । येनात्मवानन्नमयोनु * पूर्णः प्रवर्ततेऽसौ सकलक्रियासु ॥ १६७ ॥**

कर्मेन्द्रियैः । पञ्चभिः । अञ्चितः । अयं । प्राणः । भवेत् । प्राणमयः । तु । कोशः ॥ येन । आत्मवान् । अन्नमयः । अनुपूर्णः । प्रवर्तते । असौ । सकलक्रियासु ॥ १६७ ॥

* या चरणाचा पाठ "येनात्मवानन्नमयोऽन्नपूर्णः" असाहि आहे. शब्दार्थांत थोडें अंतर होईल तें असें: "ज्या प्राणमय कोशाच्या योगानें अन्नानें पूर्ण असा अन्नमय कोश अनात्मा असून आत्मवान् होऊन" इ०

**अर्थः**—१ पांच २ कर्मेंद्रियांनीं ३ युक्त ( असा ) ४ हा ५ प्राण ६ च ७ प्राणमय ८ कोश ९ होतो. १० त्या ( प्राणमयकोशानें ) ११ पूर्ण होऊन १२ हा १३ अन्नमय कोश-स्थूल देह-(अनात्मा असूनहि) १४ आत्मवान्-सचेतन ( होऊन ) १५ सर्व ( लौकिक वैदिक ) व्यवहारांच्या ठिकाणीं १६ प्रवृत्त होतो. ॥ १६७ ॥

अन्नमय कोशाचें निरूपण झाल्यावर क्रमानें आलेल्या दुसऱ्या प्राणमय कोशाचें निरूपण करण्यास आरंभ केला आहे. ॥ १६७ ॥

**नैवात्मापि प्राणमयो वायुविकारो**
**गन्तागन्तावायुवदन्तर्बहिरेषः ।**
**यस्मात्किञ्चित्क्वापि न वेत्तीष्टमनिष्टं**
**स्वं वाऽन्यं वा किञ्चन नित्यं परतन्त्रः।१६८।**

**न[५] । एव[६] । आत्मा[४] । अपि[३] । प्राणमयः[२] । वायुविकारः[७] । गन्ता[११] आगन्ता[१२] । वायुवत्[८] । अन्तः[९] । बहिः[१०] । एषः[१] ॥ यस्मात्[१३] । किंचित्[१६] । क्व[१७] । अपि[१८] । न[२५] । वेत्ति[२४] । इष्टं[१४] । अनिष्टं[१५] । स्वं[१९] । वा[२०] । अन्यं[२१] । वा[२२] । किञ्चन[२३] । नित्यं[२६] । परतन्त्रः[२७] ॥ १३८ ॥**

**अर्थः**—१ हा २ प्राणमय कोश ३ हि ४ आत्मा ५ नाहींच ६ ( तो ) ( अपञ्चीकृत ) ७ वायूपासून झालेला आहे. ८ वायु ज्याप्रमाणें ( गुहादिकांच्या आंत बाहेर जातो येतो तद्वत् हा शरीराच्या ) ९ आंत १० बाहेर ११ जाणारा १२ येणारा ( आहे ) १३ ज्याअर्थी ( हा पुत्रादि ) १४ इष्ट, ( चोरादि ) १५ अनिष्ट, १६ कांहींहि १७ केव्हां १८ हि १९ आपलें २० किंवा २१ परकें २२ किंवा २३ कांहींएक २४ जाणत २५ नाहीं. ( आणि ) २६ नेहमीं २७ पराधीन ( असतो त्या अर्थी हा आत्मा नाहीं ).

मागील श्लोकांत प्राणमयकोशामुळें अन्नमय कोश आत्मवान् होतो म्हणून म्हटलें आहे, त्यावरून प्राणमय कोश आत्मा असेल अशी शंका येईल यास्तव प्राणमय कोश आत्मा कसा नाहीं हें सांगितलें ॥ १६८ ॥

**ज्ञानेन्द्रियाणि च मनश्च मनोमयःस्यात्**
**कोशो ममाहमिति वस्तुविकल्पहेतुः ।**
**संज्ञादिभेदकलनाकलितो बलीयांस्तत्पूर्व-**
**कोशमभिपूर्य विजृम्भते यः ॥ १६९ ॥**

ज्ञानेन्द्रियाणि[१] । च[२] । मनः[३] । च[२]* । मनोमयः[४] । स्यात्[६] । कोशः[५] । मम[८] । अहं[७] । इति[९] । वस्तुविकल्पहेतुः[१०] ॥ संज्ञादिभेदकलनाकलितः[११] । बलीयान्[१२] । तत्पूर्वकोशं[१४] । अभिपूर्य[१५] । विजृम्भते[१६] । यः[१३] ॥ १६९ ॥

**अर्थः**–( श्रोत्रादि पांच ) १ ज्ञानेंद्रियें २ आणि ३ मन ( मिळून ) ४ मनोमय ५ कोश ६ होय. ( हा ) ७ मी ( व ) ८ माझें ९ अशा-प्रकारच्या १० पदार्थांविषयीं कल्पना होण्यास निमित्त ( आहे ) ११ नाम, नामी इत्यादि कल्पनांनीं युक्त, ( आणि देहादिकांपेक्षां ) अधिक १२ बलवान् ( असा आहे ). १३ तो १४ आपल्या पूर्वीच्या ( प्राण-मय ) कोशाला १५ पूर्ण करून प्रकट आहे. ॥ १६९ ॥

मनोमय कोशाचें निरूपण केलें आहे. ॥ १६९ ॥

**पञ्चेन्द्रियैःपञ्चभिरेव होतृभिः प्रचीयमानो**
**विषयाज्यधारया । जाज्वल्यमानो बहुवासनेन्धनै**
**र्मनोमयाग्निर्वहति प्रपञ्चम् ॥ १७० ॥**

पञ्चेन्द्रियैः[४] । पञ्चभिः[१] । एव[३] । होतृभिः[२] । प्रचीयमानः[६] । विषयाज्यधारया[५] ॥ जाज्वल्यमानः[८] । बहुवासनेन्धनैः[७] । मनोमयाग्निः[९] । वहति[११] । प्रपंचम्[१०] ॥ १७० ॥

---

* " च " ह्मणजे " आणि " व " वा " ह्मणजे " अथवा " हीं अव्ययें संस्कृतांत ज्या शद्बांशीं किंवा वाक्यांशीं संबंध ठेवितात त्या प्रत्येक शद्बापुढें किंवा वाक्यापुढें अथवा सर्वांच्या मागून एकदांच घालितात.

अर्थः-१ पांच २ होत्यां-यज्ञकर्त्या ब्राह्मणां-३ सारख्याच ४ पांच ज्ञानेंद्रियांनीं ५ विषयरूप तुपाच्या धारेनें ६ पेटविलेला (आणि) ७ अनेक वासनारूप लांकडांनीं ८ प्रदीप्त केलेला ९ मनोमयकोशरूप अग्नि १० प्रपञ्चरूप ११ प्रसाद देतो. ॥ १७० ॥

संसाराला निमित्तभूत मनोमयकोशाचें अग्निरूपानें वर्णन केलें आहे. ॥ १७० ॥

**नह्यस्त्यविद्या मनसोऽतिरिक्तामनोह्यविद्या भवबन्धहेतुः । तस्मिन् विनष्टे सकलं विनष्टं विजृम्भितेऽस्मिन् सकलं विजृम्भते ॥ १७१॥**

न । हि । अस्ति । अविद्या । मनसः । अतिरिक्ता । मनः । हि । अविद्या । भवबन्धहेतुः ॥ तस्मिन् । विनष्टे । सकलं । विनष्टं । विजृम्भिते । अस्मिन् । सकलं । विजृम्भते ॥ १७१ ॥

अर्थः—१ मनाहून २ वेगळी ३ अविद्या ४ असत ५ च नाहीं. ७ मन ८ च ९ संसारबंधनाला हेतुभूत १० अविद्या (आहे. कारण मनाच्या योगानेंच अविद्या संसाराला कारण होते. प्रळयकाळीं स्वरूपमात्रानें असणारी अविद्या बंधनाला हेतु होत नाहीं) ११ तें-मन-१२ लयास गेलें असतां १३ सर्व (प्रपंचाचा) १४ लय होतो, (आणि) १५ तें १६ उदयास आलें असतां १७ सर्व (प्रपंचाचा) १८ उदय होतो. ॥ १७१ ॥

संसारबंधनाला अविद्या हेतु आहे असें जें ह्मटलें आहे, त्यांत अविद्या ह्मणजे मनच समजावयाचें आहे, कारण मनांवांचून स्वरूपभूत अविद्या बंधन करीत नाहीं; ह्मणून मनोजय करण्याचाच प्रयत्न केला पाहिजे. ॥ १७१ ॥

*** स्वप्नेऽर्थशून्ये सृजति स्वशक्त्या भोक्त्रादि विश्वं मन एव सर्वम् ।**

---

* " स्वप्नेऽथ शून्ये " असाहि पाठ आढळतो. " अर्थशून्ये " आणि " शून्ये " ह्यांचा अर्थ बहूतेक सारखाच आहे. " अथ " ह्याचा अर्थ मात्र " एकंदर " असा करावा.

**तथैव जाग्रत्यपि नो विशेषस्त-**
**त्सर्वमेतन्मनसो विजृम्भणम् ॥ १७२ ॥**

स्वप्ने[1] । अर्थशून्ये[2] । सृजति[9] । स्वशक्त्या[5] । भोक्त्रादि[6] । विश्वं[8] । मनः[3] । एव[4] । सर्वम्[7] ॥ तथा[10] । एव[11] । जाग्रति[12] । । अपि[13] । नो[15] । विशेषः[14] । तत्[16] । सर्वं[18] । एतत्[17] । मनसः[19] । विजृम्भणम्[20] ॥ १७२ ॥

**अर्थः**–१ स्वप्नावस्थेंत २ बाह्य पदार्थांचा अभाव असून ३ मन ४ च ( बाह्य सामग्रीवांचून ) ५ आपल्या सामर्थ्यानें ६ भोक्ता, भोग्य इत्यादि ७ सर्व ८ जगत् ९ निर्माण करितें. १० त्या ( स्वप्नाप्रमाणें ) ११ च १२ जाग्रदवस्थेंत १३ देखील ( मनच सर्व रचीत असल्यामुळें उभय सृष्टींच्या मिथ्यापणांत कांहीं हि ) १४ भेद १५ नाहीं. १६ यास्तव १७ हें १८ सर्व ( जागृतींत व स्वप्नांत दिसणारें जगत् ) १९ मनाचा २० विलास ( आहे. ह्यांत सत्य कांहीं नाहीं ) ॥ १७२ ॥

मनाच्या उदयास्तांबरोबरच जगताचे उदयास्त होतात हें विस्तारानें सांगितलें १७२

**सुषुप्तिकाले मनसि प्रलीने नैवास्ति किञ्चि-**
**त्सकलप्रसिद्धेः । अतो मनःकल्पित एव पुंसः**
**संसार एतस्य न वस्तुतोऽस्ति ॥ १७३ ॥**

सुषुप्तिकाले[1] । मनसि[2] । प्रलीने[3] । न[7] । एव[5] । अस्ति[6] । किञ्चित्[4] । सकलप्रसिद्धेः[8] ॥ अतः[9] । मनःकल्पितः[13] । एव[14] । पुंसः[11] । संसारः[12] । एतस्य[10] । न[17] । वस्तुतः[16] । अस्ति[15] ॥ १७३ ॥

**अर्थः**–१ सुषुप्तिकालीं-गाढ झोंपेंत-( अविचेंत ) २ मन ३ लीन झालें असतां ( बाह्य किंवा आंतर ) ४ कांहीं ५ हि ( जग ) ६ असत- ७ नाहीं ( ही गोष्ट अनुभवानें ) ८ सर्वांना माहीत ( आहे ). ९ ह्मणून १० ह्या ११ पुरुषाचा-अज्ञानी जीवाचा-१२ संसार १३ मनानें कल्पिलेला १४ च १५ आहे, १६ वास्तविक १७ नाहीं. ॥ १७३ ॥

मन लीन झालें असतां सर्व जगाचा लय होतो ह्मणून संसार केवळ मनःकल्पित आहे. ॥ १७३ ॥

**वायुनानीयते मेघः पुनस्तेनैव नीयते ।**
**मनसा कल्प्यते बन्धो मोक्षस्तेनैव कल्प्यते ॥१७४॥**

वायुना । आनीयते । मेघः । पुनः । तेन । एव । नीयते ॥
मनसा । कल्प्यते । बन्धः । मोक्षः । तेन । एव । कल्प्यते १७४

**अर्थः**—१ वायु २ मेघाला ३ आणतो—सूक्ष्माकाशांत दृष्टिगोचर करितो—( आणि ) ४ पुनः ५ तो ६ च ( वायु अतिवेगवान् होऊन त्या मेघाला दूर ) ७ घेऊन जातो. ( तद्वत् ) ८ मन ( अविद्यारूप आकाशांत प्रपंचरूप ) ९ बंधाची १० कल्पना करितें, ( आणि ) ११ तें १२ च ( मन ब्रह्मात्मैक्य बोधानें बन्धनिवृत्तिरूप ) १३ मोक्षाची १४ कल्पना करितें ॥ १७४ ॥

जसें मनच बंधला निमित्त आहे, तसेंच तें मोक्षाला हि निमित्त आहे हें दृष्टांत पूर्वक सांगितलें. ॥ १७४ ॥

**देहादिसर्वविषये परिकल्प्य रागं बध्नाति तेन पुरुषं पशुवद्गुणेन । वैरस्यमत्र विषवत्सुविधाय पश्चा- देनं विमोचयाति तन्मन एव बन्धात् ॥ १७५ ॥**

देहादिसर्वविषये । परिकल्प्य । रागं । बध्नाति । तेन । पुरुषं । पशुवत् । गुणेन ॥ वैरस्यं । अत्र । विषवत् । सुविधाय । पश्चात् । एनं । विमोचयति । तत् । मन । एव । बन्धात्॥ १७५॥

**अर्थः**—१ दाव्यानें २ पशूला ( बांधावें ) तद्वत् ३ तें-मनोमयकोशरूप-४ मन ५ च ( बंधन करणाऱ्या ) ६ देहादि विषयांच्या ठिकाणीं ७ प्रीति ८ उत्पन्न करून ९ तिच्या योगानें १० जीवाला ( देहाभिमान पाशानें ) ११ बांधितें. १२ नंतर-पुण्य उदयास आल्यावर-१३ ह्या-देहा

दिविषयांवर-१४ विषाप्रमाणें १५ वैराग्य १६ उत्पन्न करून १७ ह्या-अविकारी जीवाला-१८ बंधांतून १९ सोडवितें. ॥ १७५ ॥

मनच बंधमोक्षाला कारण कसें आहे हें विस्तारानें सांगितलें. ॥ १७५ ॥

तस्मान्मनः कारणमस्य जन्तोर्बन्धस्य मोक्षस्य च वा विधाने। बन्धस्य हेतुर्मलिनं रजोगुणै-र्मोक्षस्य शुद्धं विरजस्तमस्कम् ॥ १७६ ॥

तस्मात् । मनः । कारणं । अस्य । जन्तोः । बन्धस्य । मोक्षस्य । च । वा । विधाने ॥ बन्धस्य । हेतुः । मलिनं । रजोगुणैः । मोक्षस्य । शुद्धं । विरजस्तमस्कम् ॥ १७६ ॥

अर्थः—१ ह्मणून २ ह्या ३ जीवाला ४ बंध ५ आणि ६ मोक्ष ७ हि ८ देण्याला ९ मन १० कारण ( आहे ). ११ रजोगुणाच्या ( कामलोभादि ) कार्यांनीं १२ मलिन ( झालें असतां ) १३ बंधाला १४ कारण ( होतें आणि ) १५ रजोगुण व तमोगुण यानीं विरहित ( ह्मणजे ) १६ शुद्ध ( असलें तर ) १७ मोक्षाला ( कारण होतें ). ॥ १७६ ॥

एकच मन रजोगुण व तमोगुण यांनीं युक्त असलें ह्मणजे बंधाला कारण होतें व सत्त्व गुणानें युक्त असलें ह्मणजे मोक्षाला कारण होतें. ॥ १७६ ॥

विवेकवैराग्यगुणातिरेकाच्छुद्धत्वमासाद्य मनो विमुक्त्यै। भवत्यतो बुद्धिमतो मुमुक्षोस्ताभ्यां दृढाभ्यां भवितव्यमग्रे ॥ १७७ ॥

विवेकवैराग्यगुणातिरेकात् । शुद्धत्वं । आसाद्य । मनः । विमुक्त्यै ॥ भवति । अतः । बुद्धिमतः । मुमुक्षोः । ताभ्यां । दृढाभ्यां । भवितव्यं । अग्रे ॥ ११७ ॥

अर्थः—१ विवेक ( आणि ) वैराग्य यादोन गुणांच्या ) तीव्रतेनें, ( मोहरागादि मल नष्ट होऊन ) २ शुद्धता ३ प्राप्तझाल्यावर ४ मन ५

मोक्षाला ( योग्य ) ६ होतें ७ यासाठीं ८ विचारशील ९ मुमुक्षूचे १० प्रथम ते ११ दोन ( गुण ; विवेक आणि वैराग्य-१२ तीव्र झाले १३ पाहिजेत. १७७

तीव्र विवेक आणि वैराग्य यांच्या योगानें रजोगुण व तमोगुण यांच्या कार्यांची निवृत्ति होऊन मन शुद्ध होतें म्हणून तींच संपादन करण्याकरितां प्रथम यत्न करावा.

**मनो नाम महाव्याघ्रो विषयारण्यभूमिषु ।**
**चरत्यत्र न गच्छन्तु साधवो ये मुमुक्षवः॥ १७८॥**

मनः । नाम । महाव्याघ्रः । विषयारण्यभूमिषु ॥ चरति । अत्र । न । गच्छन्तु । साधवः । ये । मुमुक्षवः ॥ १७८ ॥

अर्थः-१ खरोखर २ मनरूप ३ मोठावाघ ४ विषयरूप अरण्यभूमीवर ५ फिरत आहे. ( म्हणून ) ६ ज्ञानसाधनाचा उद्योग करणारे ७ जे ८ मुमुक्षु ( आहेत त्यांनीं ) ९ ह्या ( अरण्यांत ) १० जाऊं ११ नये. ॥ १७८ ॥

विवेक वैराग्य दृढ होण्याकरितां विषयांचा कुसंग सोडिला पाहिजे. ॥ १७८ ॥

**मनः प्रसूते विषयानशेषान् स्थूलात्मना**
**सूक्ष्मतया च भोक्तुः । शरीरवर्णाश्रमजातिभेदान्**
**गुणक्रियाहेतुफलानि नित्यम् ॥ १७९ ॥**

मनः । प्रसूते । विषयान् । अशेषान् । स्थूलात्मना । सूक्ष्मतया । च । भोक्तुः ॥ शरीरवर्णाश्रमजातिभेदान् । गुणक्रियाहेतुफलानि । नित्यम् ॥ १७९ ॥

अर्थः-( जागृतींतील ) १ स्थूलरूप २ आणि ( स्वप्नांतील ) ३ सूक्ष्मरूप ४ सर्व ५ विषयांना ( त्यांप्रमाणेंच ) ६ भोक्ता ( जो जीव त्याचें ) ७ शरीर, * वर्ण, आश्रम, जाति यांच्या भेदांना, ( व ) ८ गुण-चांगल्या विषयांबद्दल शोध, कर्मानुष्ठान त्याला हेतुभूत ( द्रव्यें आणि स्वर्गादि सुखरूप ) फल ( या सर्वांना ) ९ नेहमीं १० मन ११ उत्पन्न करीत असतें. ॥ १७९

---

* ह्याचा " स्थूल शरीर संबंधी " वर्ण आश्रम इ० असाहि अर्थ करितां येईल.

बंधनाला हेतूभूत जे विषय वगैरे ते सर्व मनच निर्माण करितें. ॥ १७९ ॥

**असङ्गचिद्रूपममुं विमोह्य देहेन्द्रियप्राणगु-**
**णैर्निबध्य । अहं ममेति भ्रमयत्यजस्रं**
**मनः स्वकृत्येषु फलोपभुक्तिषु ॥ १८० ॥**

असङ्गचिद्रूपं । अमुं । विमोह्य । देहेन्द्रियप्राणगुणैः । निबध्य ॥ अहं । मम । इति । भ्रमयति । अजस्रं । मनः । स्वकृत्येषु । फलोपभुक्तिषु ॥ १८० ॥

**अर्थः**—( वास्तविक ) १ संगरहित ( आणि ) चैतन्यस्वरूप ( अशा ) २ ह्या ( जीवाला ) ३ भूल पाडून ४ देह, इंद्रियें ( व ) प्राण ( ह्या ) बंधनांनीं ५ बांधून ६ आपण कल्पिलेल्या ७ सुखादि साक्षात्काररूप कर्मांच्या फलांविषयीं ८ मीं ( कर्ता ) ९ हें ( माझें ) १० अशा प्रकारें ११ मन ( त्याला ) १२ निरंतर १३ भ्रमवीत आहे-स्वतां कर्ता भोक्ता नसून धर्म आपले आहेत असें भासवीत आहे. ॥ १८० ॥

असंग चिदात्म्याला मनच मी कर्ता मी भोक्ता अशा प्रकारच्या भ्रमांत पाडीत आहे. ॥ १८० ॥

**अध्यासदोषात्पुरुषस्य संसृतिरध्यासबन्धस्त्व-**
**मुनैव कल्पितः । रजस्तमोदोषवतोऽविवेकिनो**
**जन्मादिदुःखस्य निदानमेतत् ॥ १८० ॥ १**

अध्यासदोषात् । पुरुषस्य । संसृतिः । अध्यासबन्धः । तु । अमुना । एव । कल्पितः ॥ रजस्तमोदोषवतः । अविवेकिनः । जन्मादिदुःखस्य । निदानं । एतत् ॥ १८१ ॥

**अर्थः**—१ रजोगुणाचे आणि तमोगुणाचे दोष आंगीं असलेल्या ( व ) २ आत्मानात्माविवेक न करणाऱ्या ३ पुरुषाला ( जड व चैतन्य ह्यांच्या परस्परस्वरूपांविषयीं ) ४ अध्यास-भ्रमरूप दोष-होऊन त्यामुळें ( जन्ममरणरूप ) ५ संसार ( प्राप्त होतो ). ६ आणि ७ अध्यासरूपबंध ८ ह्या

( मनानें ) ९ च १० कल्पित केला आहे. ( ह्मणून ) ११ जन्मादि दुःखाला १२ हें-मन-१३ आदिकारण ( आहे ). ॥ १८१ ॥

देहादि जडवर्गाच्या ठिकाणीं चैतन्याचा अध्यास होऊन जीवाला संसारबंध प्राप्त होतो, परंतु हा अध्यास होण्यास हि मनच कारण आहे. ॥ १८१ ॥

**अतः प्राहुर्मनोऽविद्यां पण्डितास्तत्वदर्शिनः ।**
**येनैव भ्राम्यते विश्वं वायुनेवाभ्रमण्डलम् ॥१८२॥**

अतः । प्राहुः । मनः । अविद्यां । पण्डिताः । तत्त्वदर्शिनः । येन । एव । भ्राम्यते । विश्वं । वायुना । इव । अभ्रमण्डलम् १८२

**अर्थः**—( मनच संसारबंधनाला कारण आहे, व अविद्याहि मनावांचून बंधन करूं शकत नाहीं. ) १ ह्मणून ( मनाचें ) २ यथार्थ स्वरूप जाणणारे ३ विद्वान् ४ मनोमय कोशालाच ५ अविद्या ६ ह्मणतात. ७ वायु ८ ज्याप्रमाणें ९ मेघमंडळाला ( इकडून तिकडे फिरवितो त्याप्रमाणें ) तें मन-११ च १२ जगाला भ्रमवीत आहे-त्या मनामुळेंच देवदैत्यादि सर्व विश्व रहाटगाडग्यांप्रमाणें उंचनीच गतीला प्राप्त होत आहे. ॥ १८२ ॥

मनच अविद्या असून जगाला भ्रमवीत आहे हें दृष्टांतासह सांगितलें ॥ १८२ ॥

**तन्मनःशोधनं कार्यं प्रयत्नेन मुमुक्षुणा ।**
**विशुद्धे सति चैतस्मिन् मुक्तिः करफलायते ।१८३।**

* तन्मनः शोधनं ( तत्मनःशोधनं ) । कार्यं । प्रयत्नेन । मुमुक्षुणा ॥ विशुद्धे । सति । च । एतस्मिन् । मुक्तिः । करफलायते ॥ १८३ ॥

**अर्थ**--१ मुमुक्षूनें ( विवेक वैराग्यादि ) २ प्रयत्नानें ३ त्या ( मलिन ) मनाची शुद्धि ४ करावी. ५ हें मन-६ शुद्ध झालें ७ असतां ८ खरोखर ९ मोक्ष १० हातांतील ( बेल ) फळाप्रमाणें-संशयविपर्ययरहित-प्राप्त होतो १८३

* एथें " तत् । मनः शोधनं । " अशीं दोन पदें करून " तत् " तस्मात् ह्मणजे पूर्वोक्त रीतीनें मन मलीन आहे ह्मणून असाहि अर्थ संभवतो.

मलीन मनाला अवश्य शुद्ध करून मोक्ष मिळविण्याकरितांच मनुष्य जन्म प्राप्त झाला आहे. ॥ १८३ ॥

**मोक्षैकसक्त्या विषयेषु रागं निर्मूल्य संन्यस्य च सर्वकर्म । सच्छ्रद्धया यः श्रवणादिनिष्ठो रजः स्वभावं स धुनोति बुद्धेः ॥ १८४ ॥**

मोक्षैकसक्त्या[2] । विषयेषु[3] । रागं[4] । निर्मूल्य[5] । संन्यस्य[8] । च[6] । सर्वकर्म[7] ॥ सच्छ्रद्धया[9] । यः[1] । श्रवणादिनिष्ठः[10] । रजःस्वभावं[13] । सः[11] । धुनोति[14] । बुद्धेः[12] ॥ १८४ ॥

**अर्थ**—१ जो-अधिकारी पुरुष-२ एका मोक्षाच्याच ठिकाणीं आवड ठेऊन ३ विषयांवरील ( रजोगुणामुळें असणारें ४ प्रेम ५ साफ नाहींसें करितो ६ आणि सर्व ) सकाम कर्मांचा ८ त्याग करून ९ उत्तम श्रद्धेनें ( वेदान्ताच्या ) १० श्रवणादिकांत तत्पर असतो, ११ तो १२ बुद्धीच्या १३ रजोगुणी स्वभावाला १४ दूर करितो-राजसी वृत्तींचें निवारण करून शुद्धचित्त होऊन मोक्षभागी होतो. ॥ १८४ ॥

राजसी वृत्ति नष्ट होऊन शुद्ध सत्त्वगुण वाढून तद्वारा मोक्ष कसा होतो हें उपायां-सह सांगितलें आहे. ॥ १८४ ॥

**मनोमयो नापि भवेत्परात्मा ह्याद्यन्तवत्त्वात्परिणामिभावात् । दुःखात्मकत्वाद्विषयत्वहेतोर्द्रष्टा हि दृश्यात्मतया न दृष्टः ॥ १८५ ॥**

मनोमयः[1] । न[5] । अपि[2] । भवेत्[4] । परात्मा[3] । हि[6] । आद्यन्तवत्त्वात्[7] । परिणामिभावात्[8] ॥ दुःखात्मकत्वात्[9] । विषयत्वहेतोः[10] । द्रष्टा[12] । हि[11] । दृश्यात्मतया[13] । न[15] । दृष्टः[14] ॥ १८५ ॥

**अर्थः**—१ मनोमय कोश २ देखील ३ परमात्मा ४ होत ५ नाहीं ६ च. कारण ७ त्याला आदि-उत्पत्ति-व अंत-नाश-आहेत, तो ८ विका-

खवान् आहे, ९ दुःखरूप आहे, ( आणि ) १० विषय होतो-समजण्यांत येतो-११ कारण १२ द्रष्टा-पाहणारा-१३ दृश्यरूपानें १४ पाहण्यांत येत १५ नाहीं. ॥ १८५ ॥

मनोमय कोश हि आत्मा नाहीं हें कारणांसह सांगितलें. ॥ १८५ ॥

**बुद्धिर्बुद्धीन्द्रियैः सार्धं सवृत्तिः कर्तृलक्षणः ।**
**विज्ञानमयकोशः स्यात् पुंसः संसारकारणम् ।१८६।**

बुद्धिः[4] । बुद्धीन्द्रियैः[1] । सार्धं[2] । सवृत्तिः[3] । कर्तृलक्षणः[5] ॥ विज्ञानमयकोशः[6] । स्यात्[7] । पुंसः[8] । संसारकारणम्[9] ॥ १८६ ॥

**अर्थः**—( पांच ) १ ज्ञानेंद्रियां २ सह ( आणि अहंकारादि ) ३ वृत्तींसह (जी ) ४ बुद्धि ( तीच ) ५ कर्तृरूप-मी कर्ता ह्या प्रत्ययानें अनुभवास येणारा-६ विज्ञानमयकोश ७ आहे ( तो ) ८ जीवाला ( जन्ममरणरूप ) ९ संसार प्राप्त होण्याला कारण आहे. ॥ १८६ ॥

विज्ञानमयकोशाचें लक्षण सांगितलें. ॥ १८६ ॥

**अनुव्रजच्चित्प्रतिबिम्बशक्तिर्विज्ञातसंज्ञः**
**प्रकृतेर्विकारः । ज्ञानक्रियावानहमित्यजस्रं**
**देहेन्द्रियादिष्वभिमन्यते भृशम् ॥ १८७ ॥**

अनुव्रजच्चित्प्रतिबिम्बशक्तिः[1] । विज्ञानसंज्ञः[5] । प्रकृतेः[2] । विकारः[3] ॥ ज्ञानक्रियावान्[4] । अहं[8] । इति[9] । अजस्रं[7] । देहेन्द्रियादिषु[6] । अभिमन्यते[11] । भृशम्[10] ॥ १८७ ॥

**अर्थः**—१ चैतन्याची प्रतिबिंबशक्ति ( ज्याच्या ) बरोबर जात असल्यासारखी भासते ( असा हा ) २ मायेचा ( कार्यरूप ) ३ विकार ( व ) ४ ज्ञानक्रियाशक्ति संपन्न ५ विज्ञानमय नांवाचा ( कोश ) ६ देह, इंद्रियें इत्यादिकांच्या ठिकाणीं ७ निरंतर ८ मी ९ असा १० अतिशय ११ अभिमान धरीत असतो. ॥ १८७ ॥

विज्ञानमयकोशाचेंच विशेष स्वरूप सांगितलें ॥ १८७ ॥

अनादिकालोऽयमहंस्वभावो जीवः समस्तव्य-
वहारवोढा । करोति कर्माण्यपि पूर्ववासनः
पुण्यान्यपुण्यानि च तत्फलानि ॥ १८८ ॥

भुङ्क्ते विचित्रास्वपि योनिषुव्रजन्नायाति निर्या-
त्यध ऊर्ध्वमेषः । अस्यैव विज्ञानमयस्य जाग्र-
त्स्वमाद्यवस्थाः सुखदुःखभोगः ॥ १८९ ॥

( एथें १८८ व्या श्लोकांतील " तत्फलानि " या पदाचा संबंध १८९ व्या श्लोकांतील " भुंक्ते " पदाशीं आहे. )

अनादिकालः । अयं । अहंस्वभावः । जीवः । समस्तव्यवहारवोढा ॥ करोति । कर्माणि । अपि । पूर्ववासनः । पुण्यानि । अपुण्यानि । च । तत्फलानि ॥ १८९ ॥ भुंक्ते । विचित्रासु । अपि । योनिषु । व्रजन् । आयाति । निर्याति । अधः । ऊर्ध्वं । एषः ॥ अस्य । एव । विज्ञानमयस्य । जाग्रत्स्वमाद्यवस्थाः । सुखदुःखभोगः ॥ १८९ ॥

**अर्थः**—" मी " १ ह्या प्रत्ययाचा आश्रय २ अनादिकाळचा ( आणि ) ३ जीव ( म्हटलेला ) ४ हा-विज्ञानमय कोश ( लौकिक वैदिक ) सर्व ५ व्यवहार करणारा ( आहे ) ६ पूर्वींच्या ( शुभाशुभ ) कर्मवासनांनीं युक्त होऊन ( हा ) ७ शुभ ८ आणि ९ पापरूप १० देखील ११ कर्में १२ करीत असतो; ( आणि ) १३ त्यांचीं ( सुखदुःखादिरूप ) फळें १४ भोगितो. १५-जीव-१६ नानाप्रकारच्या १७ हि १८ योनिपर्यें-मनुष्यपश्वादि शरीरांत-१९ जाऊन २० खालीं २१ वर २२ येत २३ जात असतो २४ ह्या २५ विज्ञानमय २६ कोशालाच २७ जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति ह्या अवस्था (व) २८ सुखदुःखांचे भोग घडतात. ।१८९।

विज्ञानमयकोश सकलव्यवहार करणारा व शुभाशुभ कर्मांचीं फळें भोगणारा आहे. ॥ १८८ ॥ १८९ ॥

**देहादिनिष्ठाश्रमधर्मकर्मगुणाभिमानं सततं ममेति । विज्ञानकोशोयमतिप्रकाशः प्रकृष्ट सांनिध्यवशात्परात्मनः ॥ अतो* भवत्येष उपाधिरस्य यदात्मधीःसंसरति भ्रमेण ॥ १९० ॥**

देहादिनिर्ष्ठाश्रमधर्मकर्मगुणाभिमानं । सततं । मम । इति ॥ विज्ञानकोशः । अयं । अतिप्रकाशः । प्रकृष्टसांनिध्यवशात् । परात्मनः ॥ अतः । भवति । एषः । उपाधिः । अस्य । यदात्मधीः । संसरति । भ्रमेण ॥ १९० ॥

**अर्थः**--१ शुद्ध चेतनाच्या २ अत्यंत समीप असल्यामुळें ३ हा ४ विज्ञानमय कोश ५ अतिप्रकाशमान होऊन-बाह्यांतर ज्ञानसंपादून व स्वतः विज्ञानसंपन्न होऊन ( हे ) ६ माझे ( आहेत ) ७ असा ८ देहादिसंघाताच्या ठिकाणीं कल्पित ( असे जे ) वर्ण, आश्रम, धर्म, क्रिया, गुण त्यांचा अभिमान निरंतर ( धरीत असतो ). १० यास्तव ११ हा-विज्ञानमयकोश १२ ह्या-( आत्म्याचा ) १३ उपाधि १४ आहे. १५ त्याच्या ठिकाणीं तादात्म्याध्यास करून ( आत्मा ) १६ भ्रमानें १७ संसारी होतो. ।१९०।

विज्ञानमय कोश आत्म्याचा उपाधि आहे व त्याच्याशीं तादात्म्य केल्यामुळें आत्मा संसारी नसून संसाऱ्यासारखा होतो. ह्यास अवच्छेदवाद ह्मणतात. ॥ १९० ॥

**योऽयं विज्ञानमयः प्राणेषु हृदि स्फुरत्ययं ज्योतिः । कूटस्थः सन्नात्मा कर्ता भोक्ता भवत्युपाधिस्थः ।१९१।**

यः । अयं । विज्ञानमयः । प्राणेषु । हृदि । स्फुरति । अयं । ज्योतिः ॥ कूटस्थः । सन् । आत्मा । कर्ता । भोक्ता । भवति । उपाधिस्थः ॥ १९१ ॥

* " भवत्येव " असाहि पाठ आढळतो व्याकरणदृष्ट्या वरील पाठ बरा दिसतो, व अर्थांतरही होत नाहीं.

अर्थः-( ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें व पंच प्राण मिळून पंधरा ; १ प्राणांच्या समीप ( आणि ) २ हृदयस्थ बुद्धीच्या ठिकाणीं ( असणारा ) ३ हा-अपरोक्ष-४ ज्योतिस्वरूप ५ आत्मा ६ प्रकाशमान आहे. ( असा ) ७ जो ८ हा ९ विज्ञानमय-ज्ञानसाधनांत श्रेष्ठ-( तो ) १० कूटस्थ * ११ असून ( विज्ञानमयकोशाच्या ) १२ उपाधीमुळें ( परिच्छिन्न होऊन ) १३ कर्ता, १४ भोक्ता ( असा ) १५ होतो. ॥ १९१ ॥

अवच्छेदवादाचेंच निरूपण केलें आहे. ॥ १९१ ॥

**स्वयंपरिच्छेदमुपेत्य बुद्धेस्तादात्म्यदोषेण परं मृषात्मनः । सर्वात्मकः सन्नपि वीक्षते स्वयं स्वतः पृथक्त्वेन मृदो घटानिव ॥ १९२ ॥**

स्वयं । परिच्छेदं । उपेत्य । बुद्धेः । तादात्म्यदोषेण । परं । मृषात्मन, ॥ सर्वात्मकः । सन् । अपि । वीक्षते । स्वयं । स्वतः । पृथक्त्वेन । मृदः । घटान् । इव ॥ १९२ ॥

अर्थः—( हा आत्मा ) १ सर्वव्यापक २ असून ३ हि ४ विज्ञानमय कोशाच्या ५ परिच्छिन्नतेप्रत ६ स्वतांच--अनादिकालापासून--७ प्राप्त होऊन-विज्ञानमयच आपण आहों असें मानून-८ नंतर ९ मिथ्यास्वरूप ( जो देहादि संघात त्याच्याशीं ) १० कल्पित तादात्म्य-तो देहादिसंघातच मी आहे अशी भावना-करून ११ मातीपासून वेगळे १२ पणानें ( मूर्ख मनुष्य ) १३ घटांना १४ ज्याप्रमाणें ( पाहतो, तद्वत् ) १५ आपल्यापासून ( १२ वेगळे पणानें ) १६ स्वतांला १७ पाहतो-देहव-पुत्रादि-रूपच आपण आहों असें मानितो. ॥ १९२ ॥

अवच्छेदवादच विशेष स्पष्ट केला आहे. ॥ १९२ ॥

**उपाधिसम्बन्धवशात्परात्मा ह्युपाधिधर्माननुभाति**

---

* धातु घडून त्यांस निरनिराळे आकार देण्याकरितां सोनार लोहार इत्यादिकांच्या ऐथें जो ऐरण असतो त्यास कूट ह्मणतात. वर ठेविलेले धातु विकार पावत असतां तो, जसाच्या तसा निर्विकार असतो, तद्वत् आत्मा निर्विकार आहे.

**तद्गुणः । अयोविकारानविकारिवान्हिवत्**
**सदैकरूपोऽपि परःस्वभावात् ॥ १९३ ॥**

उपाधिसंम्बन्धवशात् । परात्मा । हि । उपाधिधर्मान् । अनुभाति । तद्गुणः ॥ अयोविकारान् । अविकारिवान्हिवत् । सदा । एकरूपः । अपि । परः । स्वभावात् ॥ १९३ ॥

अर्थः—१ ज्याप्रमाणें निर्विकार अग्नि ( लोखंडाच्या उपाधीमुळें ) २ लोखंडाचे विकार ( १२ असलेला १३ भासतो तद्वत ) ३ अविद्येहून ४ हि पर ५ ( असाजो ) ६ सदा ७ एकरूप-८ च निर्विकार स्वभाव-सर्वांचा ९ चेतनात्मा ( तो अविद्यारूप किंवा बुद्धिरूप ) १० उपाधी-च्या संबंधामुळें त्या ११ ( उपाधींचे ) धर्म आपले मानून १२ त्या उपाधिधर्मांचें १३ अनुकरण करणारा दिसतो. ॥ १९३ ॥

निर्विकार आत्मा उपाधीमुळें विकारी झाल्यासारखा भासतो हें दृष्टांत पूर्वक कथन केलें आहे. ॥ १९३ ॥

शिष्य उवाच

**भ्रमेणाप्यन्यथा वाऽस्तु जीवभावः परात्मनः ।**
**तदुपाधेरनादित्वान्नानादेर्नाश इष्यते ॥ १९४ ॥**
**अतोऽस्य जीवभावोऽपि नित्या भवति संसृतिः ।**
**न निवर्तेत तन्मोक्षः कथं मे श्रीगुरो वद ॥१९५॥**

शिष्यः । उवाच ॥ भ्रमेण । अपि । अन्यथा । वा । अस्तु । जीवभावः । परात्मनः ॥ तदुपाधेः । अनादित्वात् । न । अनादेः । नाशः । इष्यते ॥ १९४ ॥ अतः । अस्य । जीवभावः । अपि । नित्या । भवति । संसृतिः ॥ न । निवर्तेत । तत् । * मोक्षः । कथं । मे । श्रीगुरो । वद ॥ १९५ ॥

* " तन्मोक्षः "=" तस्यजीवस्य मोक्षः "=" त्याजीवला मोक्ष " असें एक सामासिक पदहि घेतां येईल.

**अर्थः**–शिष्य ह्मणाला, हे १ श्रीगुरो, २ चेतनात्म्याला ( आलेला ) ३ जीवपणा ४ भ्रमामुळें ५ किंवा ६ दुसऱ्या कारणानें-प्रमादाज्ञानानें-७ हि ८ असो ९ त्याच्या उपाधींचें-अविद्यादिकांचें-१० अनादित्व असल्यामुळें ( व ) ११ अनादि पदार्थाचा १२ नाश १३ इष्ट १४ नाहीं-कोणाला हि संमत नाहीं-१५ ह्मणून १६ ह्या ( चेतनाचा ) १७ जीवभाव १८ देखील १९ निवृत्त होणार २० नाहीं, ( आणि ) २१ संसार २२ निरंतर २३ होईल. २४ तरमग ( त्या जीवाला ) २५ मोक्ष २६ कसा ( होईल तें ) २७ मला २८ सांगा. ॥ १९४ ॥ १९५ ॥

उपाधीमुळें बंध आहे व उपाधि अनादि आहे असें ऐकून शिष्यानें प्रश्न केला आहे. ॥ १९४ ॥ १९५ ॥

श्रीगुरुरुवाच.

**सम्यक्पृष्टं त्वया विद्वन् सावधानेन तच्छृणु ।**
**प्रामाणिकी न भवति भ्रान्त्या मोहितकल्पना १९६**

श्रीगुरुः। उवाच ॥ सम्यक् । पृष्टं । त्वया । विद्वन् । सावधानेन । तत् । शृणु ॥ प्रामाणिकी । न । भवति । भ्रान्त्या । मोहितकल्पना ॥ १९६ ॥

**अर्थः**–श्रीगुरु ह्मणाले, हे १ विद्वान्-तर्ककुशल-शिष्या, २ तूं ३ चांगला ४ प्रश्न केला आहेस ५ ह्मणून ६ लक्ष्यपूर्वक ७ ऐक ८ भ्रांतीनें मोह ९ पावलेल्या-अविवेकी पुरुषांची-( जीवभावसत्य आहे ही ) कल्पना १० प्रमाण सिद्ध ११ असत १२ नाहीं. ॥ १९६ ॥

चेतनाच्या ठायीं भ्रांतीनेंच जीवभाव आलेला आहे. ॥ १९६ ॥

**भ्रान्तिं विना त्वसङ्गस्य निष्क्रियस्य निराकृतेः ।**
**न घटेतार्थसम्बन्धो नभसो नीलतादिवत् ॥ १९७ ॥**

भ्रान्तिं । विना । तु । असङ्गस्य । निष्क्रियस्य । निराकृतेः ॥ न । घटेत । अर्थसम्बन्धः । नभसः । नीलतादिवत् । १९७ ।

अर्थः--१ आकाशाला ज्याप्रमाणें २ निळेपणा वगैरेचा ( ६ संबंध ८ भ्रांतीं ९ वांचून १० घडत ११ नाहीं, तद्वत् ) ३ असंग, ४ कूटस्थ ( आणि ) ५ निराकार ( अशा परमात्म्याला ) ६ द्वैतसंबंध ७ निश्चयानें ८ भ्रांती ९ वांचून १० घडत ११ नाहीं. ॥ १९७ ॥

भ्रांतीनें द्वैतसंबंध कसा संभवतो हें दृष्टांतपूर्वक सांगितलें आहे. ॥ १९७ ॥

**स्वस्य द्रष्टुर्निर्गुणस्याक्रियस्य प्रत्यग्बोधानन्दरूपस्य बुद्धेः । भ्रान्त्या प्राप्तो जीवभावो न सत्यो मोहापाये नास्त्यवस्तुस्वभावात् ॥१९८ ॥**

स्वस्य । द्रष्टुः । निर्गुणस्य । अक्रियस्य । प्रत्यग्बोधानन्दरूपस्य । बुद्धेः ॥ भ्रान्त्या । प्राप्तः । जीवभावः । न । सत्यः । मोहापाये । न । अस्ति । अवस्तुस्वभावात् ॥ १९८ ॥

अर्थः—१ द्रष्टा, २ निर्गुण, ३ अक्रिय, ४ प्रत्यग्बोधरूप आणि आनंदरूप ( असा जो ) ५ आत्मा त्याला ६ जीवत्व धर्म ७ अंतःकरणाच्या ८ भ्रांतीनें-तादात्म्यबुद्धीनें-९ प्राप्त झाला आहे. त्याच्या ठिकाणीं कल्पित आहे. ( तो ) १० वास्तविक ११ नाहीं. ( त्या भ्रांतीचें कारण जें ) १२ अज्ञान ( तें ) निवृत्त झालें असतां ( तो ) जीवत्वधर्म १३ वस्तुस्वरूप नसल्यामुळें--रज्जुसर्पवत् कांहींच नसल्यामुळें–१४ रहात १५नाहीं. ॥ १९८ ॥

स्वरूपाच्या ठिकाणीं भ्रांतीनें भासलेला जीवत्वधर्म भ्रांतीचें कारण नष्ट झल्याबरोबर नाहींसा होतो, ह्मणून सत्य नाहीं. ॥ १९८ ॥

**यावद्भ्रान्तिस्तावदेवास्य सत्ता मिथ्याज्ञानोज्जृम्भितस्य प्रमादात् । रज्ज्वां सर्पो भ्रान्तिकालीन एव भ्रान्तेर्नाशे नैव सर्पोऽपि तद्वत् ॥ १९९ ॥**

यावत् । भ्रान्तिः । तावत् । एव । अस्य । सत्ता । मिथ्याज्ञानोज्जृम्भितस्य । प्रमादात् ॥ रज्ज्वां । सर्पः । भ्रान्तिका-

लीनः । एव । भ्रान्तेः । नाशे । न । एव । सर्पः । अपि । तद्वत् ॥ १९९ ॥

**अर्थः**—१ मिथ्याज्ञानानें-अज्ञानानें-उत्पन्न झालेल्या २ ह्या ( जीवत्वाची व संसाराची ) ३ सत्ता ( आत्मज्ञानाविषयीं ) ४ प्रयत्न न केल्यामुळें ५ जोंपर्यंत ६ भ्रांति ( असते ) ७ तोंपर्यंत ८ च ( असते ). ९ रज्जूवर १० सर्प, ११ भ्रांतीच्या वेळेपुरता १२ च ( भासतो ). १३ भ्रांति १४ नाहींशी झाली असतां, १५ सर्प १६ हि १७ नसतो १८ च १९ त्याप्रमाणेंच ( हें समजावें ) ॥ १९९ ॥

भ्रांतीनें भासलेला जीवत्वधर्म भ्रांतिकाळींच असतो हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. १९९

**अनादित्वमविद्यायाः कार्यस्यापि तथेष्यते ।**
**उत्पन्नायां तु विद्यायामाविद्यकमनाद्यपि ॥२०० ॥**
**प्रबोधे स्वप्नवत्सर्वं सहमूलं विनश्यति ।**
**अनाद्यपीदं नो नित्यं प्रागभाव इव स्फुटम् ॥२०१॥**

अनादित्वं । अविद्यायाः । कार्यस्य । अपि । तथा । इष्यते ॥ उत्पन्नायां । तु । विद्यायां । आविद्यकं । अनादि । अपि ॥ २०० ॥ प्रबोधे । स्वप्नवत् । सर्वं । सहमूलं । विनश्यति ॥ अनादि । अपि । इदं । नो । नित्यं । प्रागभावः । इव । स्फुटम् ॥ २०१ ॥

**अर्थः**—१ अविद्येचें २ आणि ३ अविद्याकार्याचें ४ हि ५ अनादित्व ( वेदांताचार्यांना ) ६ संमत आहे. ७ तथापि ( ब्रह्मात्मैक्यरूप ) ८ विद्या ९ उदयास आली असतां, ( अंतः करणादि ) १० अविद्याकार्य ११ अनादि ( असून ) १२ हि १३ ज्याप्रमाणें स्वप्नांत पाहिलेले पदार्थ १४ जागृतींत ( १७ नष्ट होतात तद्वत ) आपल्या १५ कारणासह अविद्येसह-१६ सर्व १७ नाहींसें होतें हें-१८ अविद्येसह-जगत्-१९ अनादि ( असून ) २० हि २१ प्रागभावा २२ प्रमाणें २३ उघड उघड २४ नित्य २५ नाहीं ॥ २०१ ॥

अविद्या व तिचें कार्य-जगत्-हीं अनादि असून हि नाश पावतात हें दृष्टांतपूर्वक सांगितलें प्राक् ह्मणजे पूर्वी आणि अभाव ह्मणजे नसणें घटाचा प्रागभाव ह्मणजे घट उत्पन्न होण्यापूर्वी त्याचें नसणें हें अनादि आहे, कारण घट अमूक वेळेपासून नाहीं असें सांगतां येत नाहीं. परंतु हा त्या घटाचा प्रागभाव अनादि असून हि घट निर्माण झाल्याबरोबर नष्ट होतो. ॥ २०० ॥ २०१ ॥

**अनादेरपि विध्वंसः प्रागभावस्य वीक्षितः ।**
**यद्बुद्ध्युपाधिसम्बन्धात् परिकल्पितमात्मनि ।२०२।**
**जीवत्वं न ततोऽन्यस्तु*स्वरूपेण विलक्षणः ।**
**सम्बन्धः स्वात्मनो बुध्या मिथ्याज्ञानपुरःसरः।२०३।**

अनादेः । अपि । विध्वंसः । प्रागभावस्य । वीक्षितः ॥ *यद्बुद्ध्युपाधिसम्बन्धात् । परिकल्पितं । आत्मनि ॥ २०२ ॥
जीवत्वं । न । ततः । अन्यः । तु । स्वरूपेण । विलक्षणः ॥
सम्बन्धः । स्वात्मनः । बुध्या । मिथ्याज्ञानपुरःसरः ॥२०३॥

अर्थः—१ अनादि २ प्रागभावाचा ३ हि ४ नाश ५ पाहण्यांत येतो. ( कारण प्रागभावाच्या नाशावांचून घटसिद्धीच होणार नाहीं. ) ६ ज्या, बुद्धीच्या उपाधीचा संबंधझाल्यामुळें ७ आत्म्याच्या ठायीं ८ जीवत्व ९ कल्पित केलें आहे ( तो उपाधि अनात्मा असल्यामुळें ) १० नाहींच-सत्य-नाहीं ११ त्या ( उपाधीहून ) १२ अन्य-उपाधि धारण करणारा जिवात्मा-१३ तर १४ आपल्या ( चेतन ) रूपानें ( त्या असत्य उपाधीहून ) १५ विलक्षण-सत्यस्वरूप- ( आहे ) १६ बुद्धीबरोबर-स्वोपाधीभूत अंतःकरणाशीं-१७ चेतनात्म्याचा १८ संबंध १९ मिथ्याज्ञानपूर्वक अज्ञानमूलक- आहे. ॥ २०२ ॥ २०३ ॥

---

* " अन्यत्तु " असाहि एक पाठ आहे. त्यांत " अन्यतः "-" वेगळें " ह्याचा संबंध जीवत्वाकडे लावावा, व उपाधि संबंधाहून जीवत्व वेगळें नाहीं असा अर्थ करावा, आणि " स्वरूपेण विलक्षणः " हे शब्द पुढील वाक्याशीं जोडावे.

* " यद् "-" ज्याअर्थी " असें निराळें पदहि काढितां येतें. त्यावेळीं " तत " " त्या अर्थी " असें लावून बाकीचा अर्थ सरल करावा.

उपाधि व उपाधीचा संबंध हे दोन्ही मिथ्या असून, अधिष्ठान आत्मामात्र सत्य आहे. ॥ २०२ ॥ २०३ ॥

**विनिवृत्तिर्भवेत्तस्य सम्यग्ज्ञानेन नान्यथा ।**
**ब्रह्मात्मैकत्वविज्ञानं सम्यग्ज्ञानं श्रुतेर्मतम् ॥२०४॥**

विनिवृत्तिः[2] । भवेत्[4] । तस्य[1] । सम्यग्ज्ञानेन[3] । न[6] । अन्यथा[5] ॥
ब्रह्मात्मैकत्वविज्ञानं[7] । सम्यग्ज्ञानं[8] । श्रुतेः[9] । मतम्[10] ॥ २०४ ॥

**अर्थः**— १ त्या ( अज्ञानमूलक उपाधीची ) २ निवृत्ति ३ यथार्थ ज्ञानानें ४ होते. ( कर्मउपासना इत्यादि ) ५ अन्य प्रकारांनीं ( होत )६ नाहीं. ७ ब्रह्माच्या आणि जीवात्म्याच्या ऐक्याचें ( जें ) ज्ञान ( तें ) ८ यथार्थ ज्ञान ( होय असें ) ९ श्रुतीला १० संमत आहे. ॥ २०४ ॥

ब्रह्मात्मैक्यज्ञानच उपाधीचें निवर्तक आहे. ॥ २०४ ॥

**तदात्मानात्मनोः सम्यग्विवेकेनैव सिध्यति ।**
**ततो विवेकः कर्तव्यः प्रत्यगात्मसदात्मनोः ।२०५।**

तत्[1] । आत्मानात्मनोः[2] । सम्यग्विवेकेन[3] । एव[4] । सिध्यति[5] ॥
ततः[6] । विवेकः[8] । कर्तव्यः[9] । प्रत्यगात्मसदात्मनोः[7] ॥ २९५ ॥

**अर्थः**—१ तें-ब्रह्मात्मैक्यज्ञान-२ आत्मा व अनात्मा यांच्या ३ यथार्थ विवेकानें ४ च-जड तितकें अनात्मा कल्पित, व सदा अविनाशी चैतन्य आत्मा मात्र सत्य अशा दृढ ज्ञानानें-५ सिद्ध होतें. ६ यास्तव ७ प्रत्यगात्मा व चिदात्मा यांचा ८ विवेक ९ करावा-जिव आणि ब्रह्म ह्यांच्या उपाधींचा त्याग करून शुद्ध चैतन्याचा निश्चय करावा. ॥ २०५ ॥

ब्रह्मात्मैक्यज्ञान कसें होतें तें सांगितलें आहे. ॥ २०५ ॥

**जलं पङ्कवदत्यन्तं पङ्कापाये जलं स्फुटम् ।**

* यथा भाति तथात्मापि दोषाभावे स्फुटप्रभः २०६

जलं । पङ्कवत् । अत्यन्तं । पङ्कापाये । जलं । स्फुटम् ॥ यथा । भाति । तथा । आत्मा । अपि । दोषाभावे । स्फुटप्रभः ॥ २०६ ॥

अर्थः—१ ज्याप्रमाणें २ चिखलानें मिश्रित ( असलेलें ) ३ पाणी ४ चिखल काढिला असतां ५ अतिशय ६ स्वच्छ ७ पाणी ( आहे असें प्रत्ययाला येतें ), ८ त्या प्रमाणेंच ( स्वरूपतः शुद्ध ) ९ आत्मा १० देखील ( अविद्यावरणरूप ) ११ दोष नाहींसा झाला असतां १२ निरावरण प्रकाशरूप ( असा ) १३ प्रत्ययास येतो. ॥ २०६ ॥

दृष्टांतपूर्वक विवेकाचें फल सांगितलें आहे. ॥ २०६ ॥

असन्निवृत्तौ तु सदात्मना स्फुटं प्रतीतिरेतस्य
भवेत्प्रतीचः । ततो निरासः करणीय एव
सदात्मनः साध्वहमादिवस्तुनः ॥ २०७ ॥

असन्निवृत्तौ । तु । सदात्मना । स्फुटं । प्रतीतिः । एतस्य । भवेत् । प्रतीचः ॥ ततः । निरासः । करणीयः । एव । सदात्मनः । साधु । अहमादिवस्तुनः ॥ २०७ ॥

अर्थ—१ असताची-अविद्यादिउपाधींची, निवृत्ति झाली २ ह्मणजे ३ ह्या-अतिसन्निद्ध-४ प्रत्यगात्म्याचा ५ अद्वयानंदरूपानें ६ स्पष्टपणें ७ साक्षात्कार ८ होतो ९ यास्तव १० सत्यस्वरूप आत्म्यापासुन ( मिथ्या असुन सत्याप्रमाणें भासणाऱ्या ) ११ अहंकारादि ( अनात्म ) वस्तूंचा १२ उत्तम रीतीनें १३ निरास १४ च १५ केला पाहिजे. ॥ २०७ ॥

पूर्वीचा अर्थच विशेष स्पष्ट केला आहे. ॥ २०७ ॥

अतो नायं परात्मा स्याद्विज्ञानमयशब्दभाक् ।
विकारित्वाज्जडत्वाच्च परिच्छिन्नत्वहेतुतः ॥

---

* ह्या श्लोकाचें हें उत्तरार्ध एका छापील आवृत्तींत मात्र आढळलें. इतर आवृत्तींत ह्या श्लोकांतील दृष्टांताचा संबंध पुढील श्लोकांतील दार्ष्टांताशींच जोडलेला आहे. कदाचित् हें उत्तरार्ध क्षेपक असेल.

**दृश्यत्वाद्व्यभिचारित्वान्नानित्यो नित्य इष्यते२०८**

अतः[१] । न[६] । अयं[२] । परात्मा[४] । स्यात्[५] । विज्ञानमय[३]शब्दभाक् ॥
विकारित्वात्[७] । जडत्वात्[९] । च[८] । परिछिन्नत्व[१०]हेतुतः ॥ २०८ ॥
दृश्यत्वात्[११] । व्यभिचारित्वात्[१२] । न[१६] । अनित्यः[१३] । नित्यः[१४] । इष्यते[१५] ।

अर्थः--१ यासाठीं-पुढें सांगितलेल्या कारणांमुळें-२ हा ३ विज्ञानमय नांवाचा कोश ४ परमात्मा होऊं ५ शकत ६ नाहीं. ( कारण ) ( कामादि ) ७ विकारवान ८ आणि ९ जड, ( देशकालवस्तु ) १० परिच्छेदवान्, ११ दृश्य-चेतनाकडून भासणारा-, ( सुषुप्तींत न भासणार ह्मणून ) १२ व्यभिचारी ( असा हा ) १३ अनित्य ( विज्ञानमय कोश ) १४ नित्य ( असा जो आत्मा तो ) होऊं १५ शकत १६ नाहीं. २०८

विज्ञानमय कोश आत्मा नाहीं हें कारणांसह सांगितलें. ॥ २०८ ॥

**आनन्दप्रतिबिम्बचुम्बिततनुर्वृत्तिस्तमोजृम्भिता**
**स्यादानन्दमयः प्रियादिगुणकः स्वेष्टार्थलाभोदयः ***
**पुण्यस्यानुभवे विभाति कृतिनामानन्दरूपः स्वयं**
*** भूत्वा नन्दाति यत्र साधु तनुभृन्मात्रः प्रयत्नं विना२०९**

आनन्दप्रतिबिम्बचुम्बिततनुः[१] । वृत्तिः[३] । तमोजृम्भिता[२] । स्यात् ।
आनन्दमयः[४] । प्रियादिगुणकः[७] । स्वेष्टार्थलाभोदयः[६] ॥ पुण्यस्य ।
अनुभवे[९] । विभाति[११] । कृतिनां[१०] । आनन्दरूपः[१६] । स्वयं[१८] । भूत्वा[१७] ।
नन्दाति[२०] । यत्र[१२] । साधु[१९] । तनुभृन्मात्रः[१३] । प्रयत्नं[१४] । विना[१५] ॥२०९॥

अर्थः--१ आनंदरूप आत्म्याचा प्रतिबिंबानें युक्त आहे स्वरूप जिचें ( अशी ) २ अविद्यापरिणामरूपी ( सत्त्वगुणप्रधान ) ३ वृत्ति ४ आनं-

---

* " स्वेष्टार्थ लाभोदये " असाहि पाठ आढळतो. " इष्टार्थ लाभ झाला असतां" असा अर्थ करावा.

* " भूत्वा " बद्दल " सर्वो " असा एका ठिकाणीं पाठ आहे, सर्वः सर्व हें तनुभृन्मात्रा बरोबर घ्यावें.

दमय कोश ५ आहे. ६ आपणास आवडत्या पदार्थांच्या लाभानें उद्यास आलेला, ( व इष्टदर्शनरूप ) ७ प्रिय, ( इष्टलाभरूप ) मोद ( आणि इष्टभोगरूप ) प्रमोद हे धर्म ज्यामध्यें आहेत ( असा हा आनंदमय कोश ) ८ पुण्याचा ९ उदय झाला असतां १० पुण्यवान् लोकांना ११ विशेष करून भासमान होतो. १२ ह्या ( आनंदमय कोशांत ) १३ शरीर धारण करणारा प्रत्येक प्राणी १४ प्रयत्ना १५ वांचून १६ सुखरूप १७ होऊन १८ स्वतः १९ उत्तम प्रकारानें २० आनंदाचा अनुभव घेतो. ॥ २०९ ॥

आनंदमय कोशाचें लक्षण सांगितलें. ॥ २०९ ॥

**आनन्दमयकोशस्य सुषुप्तौ स्फूर्तिरुत्कटा ।**
**स्वप्नजागरयोरीषदिष्टसंदर्शनादिना ॥ २१० ॥**

आनन्दमयकोशस्य । सुषुप्तौ । स्फूर्तिः । उत्कटा ॥ स्वप्नजागरयोः । ईषत् । इष्टसंदर्शनादिना ॥ २१० ॥

**अर्थः**–( अंतःकरणासहित सर्व विरोधी वृत्तींचा लय झाल्यामुळें ) १ सुषुप्तींत २ आनंदमय कोशाचें ३ स्फुरण ४ अतिशय-पूर्ण-( होतें ), ( आणि ) ५ स्वप्नांत व जागृतींत ६ इष्ट वस्तूच्या दर्शनादिकानें अल्पजोंपर्यंत वृत्ति अंतर्मुख असते तोंपर्यंतच-( होतें ). ॥ २१० ॥

आनंदमयकोशांतील विशेष गोष्ट सांगितली. ॥ २१० ॥

**नैवायमानन्दमयः परात्मा सोपाधिकत्वात्प्रकृतेर्विकारात् । कार्यत्वहेतोः सुकृतक्रियाया विकारसङ्घातसमाहितत्वात् ॥ २११ ॥**

न । एव । अयं । आनंदमयः । परात्मा । सोपाधिकत्वात् । प्रकृतेः । विकारात् ॥ कार्यत्वहेतोः । सुकृतक्रियायाः । विकारसङ्घातसमाहितत्वात् ॥ २११ ॥

**अर्थः**-१ हा २ आनंदमयकोश ( प्रियमोदप्रमोदया ) ३ उपाधीनें युक्त आहे, ४ अविद्येचा ५ परिणाम आहे, ६ पुण्यकर्माचें ७ कार्य आहे ( आणि अन्नमयादि ) ८ विकार समूहाच्या अगदीं आधीन आहे म्हणून ( तो ) ९ परमात्मा १० नाहीं. ॥ २११ ॥

आनंदमय कोश हि अनात्मा आहे परमात्मा नाहीं, हें कारणासह सांगितलें।२११।

**पञ्चानामपि कोशानां निषेधे युक्तितःश्रुतेः ।**
**तन्निषेधावधिः साक्षी बोधरूपोऽवशिष्यते ॥२१२॥**

पञ्चानां । अपि । कोशानां । निषेधे । युक्तितः । श्रुतेः ॥
तन्निषेधावधिः । साक्षी । बोधरूपः । अवशिष्यते ॥ २१२ ॥

**अर्थः**--( आत्मावरण करणाऱ्या अन्नमयादि ) १ पांच २ हि ३ कोशांचा ४ श्रुतीनें ( आणि पूर्वोक्त ) ५ युक्तीनें ( हे अनात्मा कल्पित आहेत असा ) ६ निषेध केला असतां त्या ( ७ कल्पितांचा ) निषेध करणारा अधिष्ठानभूत ८ स्वयंप्रकाश ९ ज्ञानस्वरूप ( चैतन्यात्मा अबाध्यरूप ) १० उर्वरित राहतो. ॥ २१२ ॥

पंचकोशाचा निषेध ब्रह्मात्मैक्यज्ञान होण्याला कसा उपयोगीं पडतो हें सांगितलें।२१२।

**योऽयमात्मा स्वयंज्योतिः पञ्चकोशविलक्षणः ।**
**अवस्थात्रयसाक्षी सन्निर्विकारो निरञ्जनः ॥२१३॥**
**सदानन्दः स विज्ञेयः स्वात्मत्वेन विपश्चिता ।**

यः । अयं । आत्मा । स्वयंज्योतिः । पञ्चकोशविलक्षणः ॥
अवस्थात्रयसाक्षी । सन् । निर्विकारः । निरञ्जनः ॥ २१३ ॥
सदानन्दः । सः । विज्ञेयः । स्वात्मत्वेन । विपश्चिता ।

**अर्थः**-१ जो २ हा ३ आत्मा ४ स्वयंप्रकाश-अवेद्य असून अपरोक्षव्यवहारयोग्य-५ पंच कोशाहून वेगळा, ( जाग्रदादि ) तिन्ही ६ अवस्थांना प्रकाशित करणारा ७ असून ( जन्मादि ) ८ षड्विकाररहित, ( अवि-

ध्याकृत ) ९ आवरणविरहित ( आणि ) १० अविनाशी आनंदरूप ( आहे ) ११ तो १२ विज्ञानानें-श्रुति, युक्ति व अनुभव हीं यथार्थ समजण्यांत कुशल असलेल्या पुरुषानें-१३ आपला आत्मा आहे असें १४ जाणावें-तो आत्मा आपण आहों असा साक्षात्कार करून घेण्यांत आळस करूं नये. ॥ २१३ ॥

आत्मस्वरूपाची ओळख सांगितली ॥ २१३ ॥

शिष्य उवाच

**मिथ्यात्वेन निषिद्धेषु कोशेष्वेतेषु पञ्चसु ।**
**सर्वाभावं विना किञ्चिन्न पश्याम्यत्र हे गुरो ॥**
**विज्ञेयं किमु वस्त्वस्ति स्वात्मनात्मविपाश्चिता २१४**

शिष्यः । उवाच ॥ मिथ्यात्वेन । निषिद्धेषु । कोशेषु । एतेषु । पञ्चसु । सर्वाभावं । विना । किञ्चित् । न । पश्यामि । अत्र हे । गुरो ॥ विज्ञेयं । किमु । वस्तु । अस्ति । स्वात्मना । आत्मविपाश्चिता ॥ २१४ ॥

अर्थः—शिष्य ह्मणाला, १ हे २ श्रीगुरो ३ ह्या ४ पांच ५ कोशांचा हे ६ मिथ्या-व्याप्य विकारी वगैरे-आहेत असा ७ निषेध केला असतां, ८ ह्या ( पिंडांत व ब्रह्मांडांत ) ९ सर्व पदार्थांच्या अभावा १० वांचून-सर्वशून्याशिवाय-( मला ) ११ कांहीं हि १२ दिसत १३ नाहीं-कशाचाही तर्क करितां येत नाहीं-( ह्मणून ) १४ आत्माविचार करण्यांत कुशल असलेल्या पुरुषानें १५ स्वात्मत्वानें १६ जाणण्याला योग्य ( अशी ) १७ कोणती १८ वस्तु १९ आहे बरें ?-सर्व अभावरूप असल्यामुळें कोणतीहि नाहीं. असें वाटतें. ॥ २१४ ॥

शून्यवाद्यांची शंका घेऊन शिष्यानें प्रश्न केला आहे. ॥ २१४ ॥

श्रीगुरुरुवाच

**सत्यमुक्तं त्वया विद्वन्निपुणोऽसि विचारणे ।**
**अहमादिविकारास्ते तदभावोऽयमप्यनु ॥ २१५ ॥**

**सर्वे येनानुभूयन्ते यः स्वयं नानुभूयते ।**
**तमात्मानं वेदितारं विद्धि बुद्ध्या सुसूक्ष्मया ॥ २१६ ॥**

श्रीगुरुः । उवाच ॥ सत्यं । उक्तं । त्वया । विद्वन् । निपुणः । असि । विचारणे ॥ अहमादिविकाराः । ते । तदभावः । अयं । अपि । अनु ॥ २१५ ॥ सर्वे । येन । अनुभूयन्ते । यः । स्वयं । न । अनुभूयते ॥ तं । आत्मानं । वेदितारं । विद्धि । बुध्या । सुसूक्ष्मया ॥ २१६ ॥

**अर्थः**—श्रीगुरु ह्मणाले, ( हे ) १ विद्वान् ( शिष्या )-शून्य-वादखण्डनाविषयीं उत्सुक असणाऱ्या-( तूं सत्यवस्तूचा ) २ निर्णय करून घेण्यांत ३ कुशल ४ आहेस ५ तूं ६ बरोबर ७ ह्मटले आहेस-शून्य वाद्यांच्या मताचा बरोबर अनुवाद केला आहेस-८ अहंकारादि ( जे ) विकार ( आहेत ) ९ ते ( आणि त्यांच्या ) १० नंतर ( जो ) ११ हा ( सुषुप्तींत ) १२ त्यांचा अभाव ( तो ) १३ हि, ( असे ) १४ सर्व-भाव व अभाव हि-१५ ज्यांकडून १६ अनुभविलें जातात—ज्यांकडून प्रकाशित होतात-( परंतु ) १७ जो १८ स्वतः ( कोणाकडूनहि ) १९ प्रकाशित होत २० नाहीं २१ त्या २२ सर्वज्ञाला-भावाभावांच्या साक्षीला-२३ आत्मा-स्वरूप-( असें ) २४ अतिसूक्ष्म २५ बुद्धीनें २६ जाण २२५।२२६

भाव व अभाव ह्या उभयतांचा जो साक्षी तोच आत्मा. ॥ २१५ ॥ २१६ ॥

**तत्साक्षिकं भवेत्तत्तद्यद्यद्येनानुभूयते ।**
**कस्याप्यननुभूतार्थे साक्षित्वं नोपयुज्यते ॥ २१७ ॥**

तत्साक्षिकं । भवेत् । तत् । तत् । यद् । यद् । येन । अनुभूयते ॥ कस्य । अपि । अननुभूतार्थे । साक्षित्वं । न । उपयुज्यते ॥ २१७ ॥

**अर्थः**—१ जो २ जो ( पदार्थ ) ३ ज्या ( पुरुषाकडून प्रत्यक्ष ) ४ अनुभविलेला असतो, ५ तो ६ तो ( पदार्थ ) ७ त्याच्या साक्षित्वाला

योग्य ८ होतो-अनुभूत पदार्थाबद्दल मात्र साक्ष देतां येतें-( आणि ) ज्याचा ९ अनुभव नाहीं अशा पदार्थाविषयीं १० कोणाचें ११ हि १२ साक्षित्व १३ उपयोगास येत १४ नाहीं. ॥ २१७ ॥

अनुभव असलेल्या पदार्थाचें मात्र साक्षित्व घडतें, व अनुभव नसलेल्याचें घडत नाहीं, ह्मणून सर्व शून्याचा जर कोणी साक्षी नाहीं असे ह्मटलें, तर सर्वशून्य ह्मणणारा कोणी नसल्यामुळें सर्वशून्यच सिद्ध होत नाहीं; आणि जर सर्वशून्य आहे असें सांगणारा सर्व सून्याचा साक्षी आहे. असें मानिलें, तर साक्षी आहे ह्मणून सर्वशून्य होत नाहीं. ॥ २१७ ॥

**असौ स्वसाक्षिको भावो यतः स्वेनानुभूयते ।**
**अतः परं स्वयं साक्षात् प्रत्यगात्मा न चेतरः २१८**

[3]असौ । [5]स्वसाक्षिकः । [6]भावः । [1]यतः । [2]स्वेन । [4]अनुभूयते ॥ [7]अतः । [11]परं । [9]स्वयं । [10]साक्षात् । [8]प्रत्यगात्मा । [14]न । [12]च । [13]इतरः ॥ २१८ ॥

**अर्थः**—१ ज्या अर्थी २ स्वतां कडूनच ३ ह्या ( सर्वाधिष्ठान चेतनात्म्याचा ) ४ अनुभव घडतो, ( त्या अर्थी हा ) ५ आपला साक्षी आपणच आहे, ( व हा ) ६ भावरूप-असणारा-सत्तारूप वास्तविक-आहे. ७ यास्तव ( हा ) ८ प्रत्यगात्मा ९ स्वतः १० प्रत्यक्ष ११ परब्रह्मरूप ( आहे ) १२ आणि ( ह्याहून ) १३ अन्य ( कोणी ह्याचा साक्षी ) १४ नाहीं. ॥ २१८ ॥

आत्मा स्वयंप्रकाश असल्यामुळें त्याला प्रकाशित करणारा दुसरा कोणी नाहीं.२१८

**जाग्रत्स्वप्नसुषुप्तिषु स्फुटतरं योऽसौ समुज्जृम्भते**
**प्रत्यग्रूपतया सदाहमहमित्यन्तः स्फुरन्नैकधा * ।**
**नानाकारविकारभागिन इमान् पश्यन्नहंधीमुखान्**
**नित्यानन्दचिदात्मना स्फुरति तं विद्धि स्वमेतं हृदि २१९**

* " स्फुरन्नेकधा " असा पाठ पुष्कळ प्रतींत आढळतो, परंतु " नैकधा "= " अनेक प्रकारांनीं " हें अर्थाला बरोबर जुळत नाहीं.

जाग्रत्स्वप्नसुषुप्तिषु । स्फुटतरं । यः । असौ । समुज्जृम्भते । प्रत्यग्रूपतया । सदा । अहं । अहं । इति । अन्तः । स्फुरन् । एकधा । नानाकारविकारभागिनः । इमान् । पश्यन् । अहंधीमुखान् । नित्यानन्दचिदात्मना । स्फुरति । तं । विद्धि । स्वं । एतं । हृदि ॥ २१९ ॥

**अर्थः**–१ जो २ हा ( चिदात्मा ) ३ सर्वकाळ-सर्व अवस्थांत-४ मी ५ मी ६ असा ( सर्वशरीरांत ) ७ आंतून ८ एकाच प्रकारें ९ स्फुरत असून जागृति स्वप्न ( आणि सुषुप्ति ( ह्या तीन अवस्थांत ) ११ सर्वांतरात्मरूपानें १२ स्पष्टपणें १३ प्रत्ययाला येतो, ( आणि ) १४ नानाप्रकारच्या विकारांना प्राप्त होणाऱ्या १५ ह्या १६ अहंबुद्धि अंतःकरणादिकांना १७ पहात-प्रकाशीत-असून १८ हृदयांत १९ सच्चिदानंदरूपानें २० स्फुरण पावतो २१ त्या २२ ह्या ( चिदात्म्याला ) २३ आपला आत्मा २४ समज-त्याचा कधींहि अभाव मानूं नको ॥ २१९ ॥

सर्वांच्या अंतरांत भावरूप आत्मा अपरोक्ष कसा आहे हें दाखविलें ॥ २१९ ॥

**घटोदके बिम्बितमर्कबिम्बमालोक्य मूढो**
**रविमेव मन्यते । तथा चिदाभासमुपाधिसंस्थं**
**भ्रान्त्याहमित्येव जडोऽभिमन्यते ॥ २२० ॥**

घटोदके । बिम्बितं । अर्कबिम्बं । आलोक्य । मूढः । रविं । एव । मन्यते ॥ तथा । चिदाभासं । उपाधिसंस्थं । भ्रान्त्या । अहं । इति । एव । जडः । अभिमन्यते ॥ २२० ॥

**अर्थः**–( ज्याप्रमाणें ) १ मूर्ख मनुष्य २ भांड्यांतील ३ पाण्यांत प्रतिबिंबित झालेलें ४ सूर्यमंडळ ५ पाहून ( त्या प्रतिबिंबाला ) ६ सूर्य ७ च ८ मानितो, ९ त्याप्रमाणें ( बुद्धिरूप ) १० उपाधींत असलेल्या शुद्ध ११ चैतन्याच्या प्रतिबिंबाला १२ भ्रांतीनें १३ अविवेकी पुरुष १४ मी १५ असें १६ च १७ मानितो-बिंबभूत शुद्ध चेतनात्म्याला जाणत नाहीं २२०

शुद्ध बिंबरूप चेतनात्म्यास न ओळखितां मूर्ख लोक चिदाभासालाच आत्मा ह्मणतात हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. ॥ २२० ॥

घटं जलं तद्गतमर्कबिम्बं विहाय सर्वं
विनिरीक्ष्यतेऽर्कः । तटस्थ एतत्त्रितयावभासकः
स्वयं प्रकाशो विदुषा यथा * तथा ॥ २२१ ॥

देहं धियं चित्प्रतिबिम्बमेवं विसृज्य बुद्धौ
निहितं गुहायाम् । द्रष्टारमात्मानमखण्डबोधं
सर्वप्रकाशं सदसद्विलक्षणम् ॥ २२२ ॥

नित्यं विभुं सर्वगतं सुसूक्ष्ममन्तर्बहिःशून्यमन-
न्यमात्मनः । विज्ञाय सम्यङ् निजरूपमेतत्
पुमान् विपाप्मा * विरजा विमृत्युः ॥ २१३ ॥

विशोक आनन्दघनो विपश्चित् स्वयं कुतश्चिन्न
बिभेति कश्चित् । नान्योऽस्ति पन्था भवबन्धमुक्ते-
र्विना स्वतत्वावगमं मुमुक्षोः ॥ २२४ ॥

घटं । जलं । तद्गतं । अर्कबिम्बं । विहाय । सर्वं । विनिरीक्ष्यते । अर्कः । तटस्थः । एतत्त्रितयावभासकः । स्वयंप्रकाशः । विदुषा । यथा । तथा ॥ २२१ ॥ देहं । धियं । चित्प्रतिबिम्बं । एवं ; विसृज्य । बुद्धौ । निहितं । गुहायाम् ॥ द्रष्टारं

---

* " यथा यथा " असाहि पाठ आढळतो. अर्थांतर होत नाहीं " तथा " या अर्थी पुढील श्लोकांत ' एवं " हें पद आहेच.

* '' विरजोविमृत्युः " असा पाठ पुष्कळ ठिकाणीं आढळतो. " विरजः " हें नपुंसकलिंगी पद " निजरूपं " त्याचें विशेषणकरावें.

आत्मानं[३४] । अखण्डबोधं[२४] । सर्वप्रकाशं[२५] । सदसद्विलक्षणम्[२६] ॥ २२२॥
नित्यं[२७] । विभुं[२८] । सर्वगतं[२९] । सुसूक्ष्मं[३०] । अंतर्बहिःशून्यं[३१] । अनन्यं[३३] ।
आत्मनः[३२] ॥ विज्ञाय[३८] । सम्यक्[३७] । निजरूपं[३६] । एतत्[३५] । पुमान्[३९] । विपाप्मा[४०] । विरजाः[४१] । विमृत्युः[४२] ॥ २२३ ॥ विशोकः[४३] । आनन्दघनः[४४] ।
विपश्चित्[४५] । स्वयं[४७] । कुतश्चित्[४८] । न[५०] । बिभेति[४९] । कश्चित्[४६] ॥
न[५८] । अन्यः[५५] । अस्ति[५७] । पन्थाः[५६] । भवबन्धमुक्तेः[५४] । विना[५३] । स्वतत्त्वावगमं[५२] । मुमुक्षोः[५१] ॥ २२४ ॥

**अर्थः**—१ ज्याप्रमाणें २ घट, ३ उदक, त्यांत पडलेलें सूर्याचें ५ प्रतिबिंब (हीं) ६ सर्व ७ सोडून या ८ तिघांस प्रकाशित करणारा ९ उपाधिविरहित-आकाशस्थ १० स्वयंप्रकाश ११ सूर्य १२ विद्वानाच्या १३ पाहण्यांत येतो; १४ तद्वत् १५ देह, १६ बुद्धि (आणि) १७ तसेंच (१८ तींत पडलेलें) चैतन्याचें प्रतिबिंब-चिदाभास-(यांस) १९ सोडून २० बुद्धिरूप २१ गुहेंत २२ असलेला २३ साक्षीभूत, २४ अखंडबोधस्वरूप, सर्व (२५ अध्यस्त जडाला) प्रकाशित करणारा) २६ कारण व कार्य ह्यांहून वेगळा, २७ नित्य, २८ व्यापक (गगनादि), सर्व (२९ अध्यस्तांत) अनुगत, ३० अतिसूक्ष्म, आंत ३१ व बाहेर अशा भेदाहून विरहित, ३२ स्वतांहून ३३ भिन्न नसलेला (असा जो हा) ३४ आत्मा ३५ हेंच आपलें ३६ स्वरूप (आहे असें) ३७ यथार्थ ३८ जाणून ३९ पुरुष ४० निष्पाप, ४१ रजोगुणदोषरहित, मृत्यूला हेतू ४२ विषयासक्ति दोषरहित, ४३ शोकरहित, ४४ केवलानंदस्वरूप (व) ४५ ज्ञानवान् (असा होऊन), (मग तो) ४६ कोणीहि-कोणत्याहि वर्णाचा किंवा आश्रमाचा-असो, ४७ तो ४८ कशाला हि ४९ भीत ५० नाहीं. ५१ मुमुक्षूला ५२ आत्मतत्त्वज्ञाना-५३ वांचून ५४ संसारबंधांतून सुटण्यास ५५ दुसरा ५६ मार्ग ५७ व ५८ नाहीं ॥ २२१ । २२२ । २२३ । २२४ ॥

उपाधित्यागानें शुद्धस्वरूपबोध होतो हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. २२१।२२२।२२३।२२४

**ब्रह्माभिन्नत्वविज्ञानं भवमोक्षस्य कारणम् ।**

येनाद्वितीयमानन्दं ब्रह्म सम्पद्यते बुधैः ॥२२५॥

ब्रह्माभिन्नत्वविज्ञानं । भवमोक्षस्य । कारणम् ॥ येन । अद्वितीयं । आनन्दं । ब्रह्म । सम्पद्यते । बुधैः ॥ २२५ ॥

**अर्थः**--( आत्म्याचा आपला ) १ निरुपाधि चैतन्याशीं जो अभेद आहे त्याचा साक्षात्कार २ संसारबंधनांतून मुक्त होण्यास ३ हेतु ( आहे ) ४ त्या ( साक्षात्काराच्या योगानें ) ५ ब्रह्मनिष्ठ विद्वान् पुरुष ६ द्वैतरहित ७ अनंदस्वरूप ८ ब्रह्माप्रत ९ प्राप्त होतात ॥ २२५ ॥

यांत ब्रह्मात्मैक्यज्ञानाचें फल सांगितलें आहे. ॥ २२५ ॥

ब्रह्मभूतस्तु संसृत्यै विद्वान्नावर्तते पुनः ।
विज्ञातव्यमतः सम्यग्ब्रह्माभिन्नत्वमात्मनः २२६

ब्रह्मभूतः । तु । संसृत्यै । विद्वान् । न । आवर्तते । पुनः । विज्ञातव्यं । अतः । सम्यक् । ब्रह्माभिन्नत्वं । आत्मनः ।२२६।

अर्थ--१ आणि ( अविद्या व जीवभाव निवृत्त होऊन ) २ ब्रह्मस्वरूप झालेला ३ विद्वान् ४ पुनः ( जन्मजरादिरूप ) ५ संसारचक्रावर ६ येत ७ नाहीं ८ ह्मणून ९ आत्म्याचें आपलें ( जें ) १० ब्रह्माशीं ऐक्य ( तें ) ११ उत्तम प्रकारें १२ जाणावें-त्याचा अपरोक्ष साक्षात्कार करून घ्यावा. ।२२५।

कर्म व उपासना यांच्या योगानें पुनर्जन्म होतो, परंतु ब्रह्मात्मैक्यज्ञानानें होत नाहीं. ॥ २२६ ॥

सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म विशुद्धं परं स्वतःसिद्धम् ।
नित्यानन्दैकरसं प्रत्यगभिन्नं निरन्तरं जयति ॥२२७॥

सत्यं । ज्ञानं । अनन्तं । ब्रह्म । विशुद्धं । परं । स्वतः । सिद्धम् ॥ नित्यानन्दैकरसं । प्रत्यगभिन्नं । निरन्तरं । जयति। २२७।

**अर्थः**--१ कालत्रयाबाधित स्वरूप, २ चैतन्यरूप, ३ देशकालवस्तुपरिच्छेदरहित, ४ अतिशय ५ पवित्र-अविद्या व अविद्याकार्य यांचा मळ न

लागलेलें-६ प्रमाण ७ निरपेक्षस्वरूप स्वयंप्रकाश ८ अविनाशी आनंदघन-कूटस्थ-प्रत्यगात्म्याहून-शोधित जीवस्वरूपाहून-अभिन्न, ( आणि ) १० बाह्याभ्यंतर भेदाविरहित ( असें ) ११ ब्रह्म १२ सर्वोत्कृष्ट मोक्षधामरूप आहे ॥ २२७ ॥

ब्रह्माचें लक्षण सांगितलें ॥ २२७ ॥

सदिदं परमाद्वैतं स्वस्मादन्यस्य वस्तुनोऽ
भावात् । न ह्यन्यदस्ति किञ्चित्
सम्यक्परमार्थतत्त्वबोधदशायाम् * ॥ २२८ ॥

सत् । इदं । परमाद्वैतं । स्वस्मात् । अन्यस्य । वस्तुनः । अभावात् ॥ न[14] । हि[13] । अन्यत् । अस्ति । किञ्चन । सम्यक् । परमार्थतत्त्वबोधदशायाम् ॥ २२८ ॥

अर्थः—१ स्वताहून-ब्रह्माहून-२ अन्य ३ वस्तु ४ नसल्यामुळें हें-ब्रह्मच ६ सत्य ( आणि ) ७ उत्कृष्ट असून, सजातीयविजातीयस्वगतभेद-रहित आहे. ८ परमार्थस्वरूपसाक्षात्कार उदयास येतो, त्या समयीं ९ इतर अधिष्ठान ब्रह्मरूपाहून भिन्न १० कांहीं हि ११ स्वतंत्रसत्तावान् १२ असत १३ च १४ नाहीं. ॥ २२८ ॥

एक ब्रह्मच सत्य व अद्वैत असून इतर सर्व कल्पित आहे ॥ २२८ ॥

यदिदं सकलं विश्वं नानारूपं प्रतीतमज्ञानात् ।
तत्सर्वं ब्रह्मैव प्रत्यस्ताशेषभावनादोषम् ॥ २२९ ॥

यत् । इदं । सकलं । विश्वं । नानारूपं । प्रतीतं । अज्ञानात् ॥ तत् । सर्वं । । ब्रह्म । एव । प्रत्यस्ताशेषभावनादोषम् ॥ २२९ ॥

अर्थः—१ जें २ हें ३ सर्व ४ जग ( अधिष्ठान ब्रह्माच्या ) ५ अज्ञानामुळें ( देव मनुष्य पश्वादि ) ६ अनेकरूपांनीं ( प्रत्यक्ष, अनुमान इत्यादि प्रमाणांच्या योगानें ) ७ प्रत्ययास येत आहे, ८ तें ९ सर्व सकल-कल्पना दोषांपासून वेगळें केलें असतां ११ ब्रह्म १२ च ( आहे ) २२९

* " परमार्थतत्त्वबोधे हि " असाहि पाठ आढळतो. अर्थ भेद नाहीं.

अज्ञानामुळें नानाकार भासणारें विश्व नानाकारकल्पना। निवृत्त झाली ह्मणजे ब्रह्मच आहे. ॥ २२९ ॥

**मृत्कार्यभूतोऽपि मृदो न भिन्नः कुम्भोऽस्ति सर्वत्र तु मृत्स्वरूपात् । न कुम्भरूपं पृथगस्ति कुम्भः कुतो मृषा कल्पितनाममात्रः ॥ २३० ॥**

मृत्कार्यभूतः । अपि । मृदः । न । भिन्नः । कुम्भः । अस्ति । सर्वत्र । तु । मृत्स्वरूपात् ॥ न । कुम्भरूपं । पृथक् । अस्ति । कुम्भः । कुतः । मृषा । कल्पितनाममात्रः ॥ २३० ॥

अर्थः—१ घट मातीचें २ कार्य असून ३ हि ४ मातीपासून ५ वेगळा ६ असत ७ नाहीं. ८ सर्वत्र-व्यवहारांत-( दिसणारें ) ९ घटस्वरूप १० मातीच्या स्वरूपाहून ११ तर १२ वेगळें १३ असत १४ नाहीं. ( मग ) १५ खोटेंच ज्याचें नांव १६ कल्पित केलें आहे ( असा ) १७ घट ( तरी ) १८ कोठून ( असणार? )-माती मात्र सत्य व घट ही मिथ्या कल्पना आहे ॥ २३० ॥

नानाकार भासणारें विश्व कल्पनेनें मात्र नानाकार असून वास्तविक स्वरूपच आहे हें दृष्टांतानें सांगितलें आहे. ॥ २३० ॥

**केनापि मृद्भिन्नतया स्वरूपं घटस्य संदर्शयितुं न शक्यते । अतो घटः कल्पित एव मोहा-न्मृदेव सत्यं परमार्थभूतम् ॥ २३१ ॥**

केन । अपि । मृद्भिन्नतया । स्वरूपं । घटस्य । संदर्शयितुं । न । शक्यते ॥ अतः । घटः । कल्पितः । एव । मोहात् । मृत् । एव । सत्यं । परमार्थभूतम् ॥ २३१ ॥

अर्थः—१ कोणाकडून २ हि ३ घटाचें ४ स्वरूप ५ मातीपासून वेगळेपणानें ६ दाखवितां येणें ७ शक्य ८ नाहीं. ९ यास्तव १० घट

( मातीच्या स्वरूपाच्या ) ११ अज्ञानामुळें १२ कल्पित १३ च ( आहे ). १४ माती १५ मात्र १६ सत्य ( आहे आणि तीच ) १७ परमार्थरूप-सत्य पदार्थ-आहे. ॥ २३१ ॥

मातीहून घटाचें वेगळें स्वरूपच नाहीं. आहे ती मातीच आहे, तद्वत् ब्रह्माहून वेगळें कांहीं नसून सर्वब्रह्मच आहे. ॥ २३१ ॥

**सद्ब्रह्मकार्यं सकलं सदैव * तन्मात्रमेतन्न**
**ततोऽन्यदस्ति । अस्तीति यो वक्ति न तस्य**
**मोहो विनिर्गतो निद्रितवत्प्रजल्पः ॥ २३२ ॥**

सद्ब्रह्मकार्यं[3] । सकलं[2] । सदा[4] । एवं[5] । तन्मात्रं[6] । एतत्[1] । न[10] । ततः[7] । अन्यत्[8] । अस्ति[9] ॥ अस्ति[12] । इति[13] । यः[11] । वक्ति[14] । न[18] । तस्य[15] । मोहः[16] । विनिर्गतः[17] । निद्रितवत्प्रजल्पः[19] ॥ २३२ ॥

**अर्थः**—१ हें २ सर्व ( जग ) ३ सद्रूप ब्रह्माचें कार्य आहे, ( ह्मणून तें ) ४ सर्वकाळ ५ हि ६ तद्रूपच-ब्रह्मस्वरूपच-( आहे ) ७ त्याहून ८ दुसरें ९ होत १० नाहीं-११ जो ( नैयायिक तें अन्य-भिन्न- ) १२ आहे १३ असें १४ ह्मणतो १५ त्याचें १६ अज्ञान १७ नष्ट झालें १८ नाहीं. ( जग सद्रूपब्रह्माहून भिन्न असून सद्रूप आहे हें ह्मणणें तेजाहून भिन्न जो अंधार तो तेजोरूप आहे ह्मणण्यासारखें असून ) झोंपीं १९ गेलेल्या मनुष्याच्या बरळण्याप्रमाणें आहे. ॥ २३२ ॥

मृत्तिकेच्या दृष्टांतांत सांगितल्या प्रमाणें सद्ब्रह्मच्या ठायीं विवर्तरूपानें भासणारें जगत् त्याहून भिन्न नाहीं हें दार्ष्टांतांत दाखविलें ॥ २३२ ॥

**ब्रह्मैवेदं विश्वमित्येव वाणी श्रौती ब्रूतेऽथर्व-**
**निष्ठा वरिष्ठा । तस्मादेतद्ब्रह्ममात्रं हि विश्वं**
**नाधिष्ठानाद्भिन्नतारोपितस्य ॥ २३३ ॥**

---

* " सदैवं " ह्या बद्दल " सदेवं " असाहि पाठ आहे. " सदैवं "—' सत् एवं ' अन्वयांत " एवं " " तसेंच-दृष्टांतांत सांगितल्याप्रमाणें- " हें पद आरंभी घ्यावें. " सत् "-" सत्य आहे " हें पद " सद्ब्रह्म कार्यां " पुढें घ्यावें, व ' एतत् तन्मात्रं ' असें निराळें वाक्य करावें.

ब्रह्म[3] । एव[4] । इदं[1] । विश्वं[2] । इति[5] । एव[6] । वाणी[9] । श्रौती[10] । ब्रूते[11] । अथर्वनिष्ठा[7] । वरिष्ठा[8] । तस्मात्[12] । एतत्[13] । ब्रह्ममात्रं[16] । हि[15] । विश्वं[14] । न[20] । अधिष्ठानात्[18] । भिन्नता[19] । आरोपितस्य[17] । २३३ ।

**अर्थः**—१ हें २ विश्व ३ ब्रह्म ४ च ( आहे ) ५ असें ६ च ७ अथर्ववेदांतील ८ श्रेष्ठ अपौरुषेय असल्यामुळें निर्दोष व प्रमाणभूत ९ श्रुतिरूप १० वाणी ११ सांगत आहे १२ यास्तव १३ हें १४ जग १५ निश्चयानें १६ ब्रह्मस्वरूपच ( आहे )-( शुक्तिरज्जु इत्यादिकांच्या ठिकाणीं रुपें, सर्प इत्यादि ) १७ आरोपित-कल्पित-पदार्थास ( शुक्ति, रज्जु इत्यादि ) १८ अधिष्ठानाहून-कल्पिताच्या आधाराहून-१९ वेगळेपण वेगळें अस्तित्व-२० नसतें. ॥ २३३ ॥

जग ब्रह्माहून भिन्न नाहीं ह्यास श्रुतीचें प्रमाण आहे हें सांगितलें. ॥ २३३ ॥

*** सत्यं यदि स्याज्जगदेतदात्मना नतत्त्वहानिर्निगमाप्रमाणता । असत्यवादित्वमपीशितुः स्यान्नैतत्त्रयं साधुहितं महात्मनाम् ॥ २३४ ॥**

सत्यं[5] । यदि[1] । स्यात्[6] । जगत्[3] । एतत्[2] । आत्मना[4] । न[8] । तत्त्वहानिः[7] । निर्गमाप्रमाणता[9] ॥ असत्यवादित्वं[12] । अपि[11] । ईशितुः[10] । स्यात्[13] । न[18] । एतत्[15] । त्रयं[16] । साधुहितं[17] । महात्मनाम्[14] ॥ २३४ ॥

**अर्थः**—१ जर २ हें ३ जग ४ आपल्या स्वरूपानें-स्वतंत्र पणानें-५ सत्य ६ असेल,-सत्य आहे असें मानिलें-( तर ) ७ सत्य वस्तूचीनिवृत्ति ८ होत नाहीं, ( ह्मणून जगाची निवृत्ति न होऊन अद्वैत सिद्धि होणार नाहीं ); ( ज्ञानानें संसाराची निवृत्ति होते असें सांगणाऱ्या )

* एथें " सत्यं " ह्या पदापासून " तत्त्वहानिः " ह्या पदापर्यंत पदच्छेद व अन्वययांत फेरफार केल्यानें शाब्दिक अर्थ वैचित्र्य दाखवितां येतें जसें " यदि जगत् एतदात्मना सत्यं न स्यात् ( तर्हि ) तत्त्वहानिः " असा अन्वय केला असतां ' जर जग ह्या आत्मरूपानें ह्मणजे ब्रह्मरूपानें सत्य नसेल, तर तत्त्वाची ह्मणजे अद्वैतसिद्धांताची हानि होईल " असा अर्थ होईल.

९ वेदवाक्यांना अप्रमाणता येईल; ( आणि वेदांचा उपदेशक जो ) १० ईश्वर त्याकडे ११ हि खोटें १२ बोलण्याचा दोष १३ येईल. १४ विवेकी थोर पुरुषांना १५ ह्या १६ तीन ( दोषांचा अंगीकार करणें ) १७ चांगलें ( व ) हितकर १८ नाहीं. ॥ २३० ॥

जग ब्रह्माहून भिन्न असून स्वतंत्रपणानें सत्य आहे असें मानिलें असतां तीन दोष येतात ते दाखविले आहेत ॥ २३४ ॥

**ईश्वरो वस्तुतत्वज्ञो न चाहं तेष्ववस्थितः ।**
**न च मत्स्थानि भूतानीत्येवमेव व्यचीक्लृपत् २३५**

ईश्वरः । वस्तुतत्त्वज्ञः । न । च । अहं । तेषु । अवस्थितः ॥ न । च । मत्स्थानि । भूतानि । इति । एवं । एव । व्यचीक्लृपत् ॥ २३५ ॥

**अर्थः**—१ वस्तुस्वरूप यथार्थ जाणणाऱ्या २ ईश्वरानें भगवान् श्रीकृष्णानें ( मीं सर्व जग व्यापिलें असून सर्वांचें अधिष्ठान मीच आहें अशारीतीनें जग आपल्या स्वरूपावर आरोपित आहे असें सांगून ) ३ नंतर ४ मी ५ त्या ( भूतांच्या ) ठिकाणीं ६ राहत ७ नाहीं. ८ आणि ९ भूतें १० माझ्या ठिकाणीं राहणारीं ११ नाहींत १२ अशा प्रकारें १३ तसा १४ च ( अपवाद हि भगवद्गीतेंत ) १५ सांगितला आहे. ॥ २३५ ॥

स्वरूपीं जग आरोपित आहे हें भगवद्गीतेंत ईश्वरच बोलिला आहे. ॥ २३५ ॥

**यदि सत्यं भवेद्विश्वं सुषुप्तावुपलभ्यताम् ।**
**यन्नोपलभ्यते किञ्चिदतोऽसत्स्वप्नवन्मृषा ॥ २३६ ॥**

यदि । सत्यं । भवेत् । विश्वं । सुषुप्तौ । उपलभ्यताम् । यत् । न । उपलभ्यते । किञ्चित् । अतः । असत् । स्वप्नवत् । मृषा ॥ २३६ ॥

**अर्थः**—१ जर २ जग ३ स्वतंत्र सत्तावान् ४ असतें ( तर ) ५ सुषुप्तींत ६ प्रत्ययास आलें असतें. ७ ज्या अर्थी ( स्थूल सूक्ष्म ) ८

कांहीं हि ९ प्रत्ययास येत नाहीं ११ त्या अर्थी १२ स्वप्नाप्रमाणें-स्वप्नांत दिसणाऱ्या पदार्थांप्रमाणें-( तें ) १३ खोटें १४ मिथ्यारूप ( आहे ). २३६

जग स्वरूपाने सत्य नाहीं हेंच विशेष स्पष्ट रीतीनें सांगितलें. ॥ २३६ ॥

**अतः पृथङ्नास्ति जगत्परात्मनः पृथक्प्रतीतिस्तु मृषा गुणादिवत् । आरोपितस्यास्ति किमर्थवत्ता-धिष्ठानमाभाति तथा भ्रमेण ॥ २३७ ॥**

अतः । पृथक् । न । अस्ति । जगत् । परात्मनः । पृथक् । प्रतीतिः । तु । मृषा । गुणादिवत् ॥ आरोपितस्य । अस्ति । किं । अर्थवत्ता । अधिष्ठानं । आभाति । तथा । भ्रमेण ॥ २३७ ॥

अर्थः---( मिथ्या आहे ) १ यास्तव २ जग ३ शुद्ध चेतनात्म्या-हून ४ वेगळें ५ असूं शकत ६ नाहीं. ७ आणि ( जगाचा ) ८ वेगळे पणानें ( जो ) ९ प्रत्यय येतो ( असें वाटतें तो आकाशांत निळेपणा वगैरे भासतो त्या मिथ्या भासणाऱ्या ) १० धर्माप्रमाणें ११ मिथ्या ( आहे ). ( भ्रमानें ) १२ आरोपित-कल्पित-केलेल्या ( पदार्थाला ) १३ यथार्थता-स्वतंत्र सत्यता-१४ असते १५ काय ? ( अर्थात् नसते ). १६ अधिष्ठानच १७ भ्रांतीमुळें तशा १८ प्रकारचें आरोपिताच्या रूपानें-१९ भासत असतें. ॥ २३७ ॥

जगाला स्वतंत्र सत्ता नसून भ्रांतीनें ब्रह्मच विश्वरूपानें भासत आहे. ॥ २३७ ॥

**भ्रान्तस्य यद्यद्भ्रमतः प्रतीतं ब्रह्मैव तत्तद्रजतं हि शुक्तिः । इदन्तया ब्रह्म सदैव रूप्यते त्वारोपितं ब्रह्मणि नाममात्रम् ॥ २३८ ॥**

भ्रान्तस्य । यत् । यद् । भ्रमतः । प्रतीतं । ब्रह्म । एव । तत् । तत् । रजतं । हि । शुक्तिः ॥ इदन्तया । ब्रह्म । सदा । एव । रूप्यते । तु । आरोपितं । ब्रह्मणि । नाममात्रम् । २३८।

**अर्थ**:-१ भ्रांत पुरुषाला ( ब्रह्माहून वेगळें ) २ जें ३ जें ४ भ्रमानें ५ भासतें ६ तें ७ तें ८ ब्रह्म ९ च ( आहे ). १० कारण ११ शुक्तिच ( शुक्तीवर भासणारें ) १२ रजत-रुपें-आहे. १३ हें ( अनात्मजग आहे ) अशा निर्देशानें १४ ब्रह्माचें १५ च १६ सर्वकाळ १७ निरूपण होत असतें. १८ आणि १९ आरोपित-जग-२० ब्रह्माच्या ठिकाणीं २१ नाममात्र ( आहे ). ॥ २३८ ॥

ब्रह्मावर भासणारें जग नाममात्र आहे, वास्तविक नाहीं हें सदृष्टांत सांगितलें २३८

**अतः परं ब्रह्म सदद्वितीयं विशुद्धविज्ञानघनं निरञ्जनम् । प्रशान्तमाद्यन्तविहीनमक्रियं निरन्तरानन्दरसस्वरूपम् ॥ २३९ ॥**
**निरस्तमायाकृतसर्वभेदं नित्यं सुखं निष्कलमप्रमेयम् । अरूपमव्यक्तमनाख्यमव्ययं ज्योतिः स्वयं किञ्चिदिदं चकास्ति ॥ २४० ॥**

अतः[१] । परं[२०] । ब्रह्म[२१] । सत्[२] । अद्वितीयं[३] । विशुद्धविज्ञानघनं[४] । निरञ्जनम्[५] ॥ प्रशान्तं[६] । आद्यन्तविहीनं[७] । अक्रियं[८] । निरन्तरानन्दरसस्वरूपम्[९] ॥ २३९ ॥ निरस्तमायाकृतसर्वभेदं[१०] । नित्यं[११] । सुखं[१२] । निष्कलं[१३] । अप्रमेयम्[१४] ॥ अरूपं[१५] । अव्यक्तं[१६] । अनाख्यं[१७] । अव्ययं[१८] । ज्योतिः[१९] । स्वयं[२२] । किञ्चित्[२३] । इदं[२४] । चकास्ति[२५] । २४० ।

अर्थः-( कल्पित जग कालत्रयीं हि सत्य नाहीं ) १ म्हणून २ त्रिकालाबाध्य, ३ द्वैतरहित ( विनाशादि ) ४ मळविरहित असून केवळज्ञानस्वरूप, ५ अविद्याकृतावरणशून्य, ६ रागादि दोषरहित, ७ उत्पत्तिविनाशवार्जित, ८ निष्क्रिय, ९ अखंडानंदरूप ( जीव, ईश्वर, जग इत्यादि ) १० अविद्याकृत सर्व भेदाहून वेगळें, ११ अविनाशी, १२ सुखमय, १३ निरवयव, १४ प्रमाणाला अविषय, १५ रूपरसादिशून्य, १६ अतींद्रिय, १७ नामप्रवृत्तीवार्जित, १८ निर्विकार ( आणि ) १९ चैतन्यस्वरूप २० पर २१ ब्रह्मच २२ स्वस्वरूपानें-निजमहिम्यानें कांहीं २३ तरी २४ हें-जगद्रूप-२५ भासत आहे. ॥ २४० ॥

भासमान अनात्मरूप दृश्य जग परब्रह्माचाच विलास आहे हें सांगून परब्रह्म कसें आहे तें सांगितलें ॥ २३९ । २४० ॥

ज्ञातृज्ञेयज्ञानशून्यमनन्तं निर्विकल्पकम् ।
केवलाखण्डचिन्मात्रं परं तत्त्वं विदुर्बुधाः ।२४१।

ज्ञातृज्ञेयज्ञानशून्यं । अनन्तं । निर्विकल्पकम् ॥ केवलाखण्डचिन्मात्रं । परं । तत्त्वं । विदुः । बुधाः ॥ २४१ ॥

अर्थः—१ ज्ञाता, ज्ञेय, ज्ञान या त्रिपुटीकल्पने विरहित २ देशकालवस्तुपरिच्छेदशून्य, ( अद्वैतरूप असल्यामुळें अनेक धर्मांचें ग्रहण करणाऱ्या ) ३ विकल्पानां अविषय, ४ अद्वैत अविनाशी चैतन्यस्वरूप, ( मायेहून ) ५ पर ( सर्वांच्या बाधाचें अवधिरूपअशा ) ६ पर ब्रह्माला ( ब्रह्मनिष्ठ ) ७ विद्वान् जाणतात. ॥ २४१ ॥

परब्रह्माचेंच लक्षण सांगितलें- ॥ २४१ ॥

अहेयमनुपादेयं मनोवाचामगोचरम् ।
अप्रमेयमनाद्यन्तं ब्रह्म पूर्णमहं महः ॥२४१ ॥

अहेयम् । अनुपादेयं । मनोवाचां । अगोचरम् ॥ अप्रमेयं । अनाद्यन्तं । ब्रह्म । पूर्णं । अहं । महः ॥ २४२ ॥

अर्थः—१ टाकितां येत नाहीं असें, ( व आत्मस्वरूप असल्यामुळें ) घेतां २ येण्यास अशक्य, ३ मन ( आणि ) वाणी ( यांना ) ४ अविषय, ५ माप करण्याला अयोग्य, ६ आद्यन्तरहित, ७ सर्व व्यापक ( आणि अलौकिक ) ८ तेजोरूप ( जें ९ ब्रह्म ( तें ) १० मी ( आहें असा निश्चय कर ). ॥ २४२ ॥

परब्रह्माचेंच लक्षण सांगितलें. ॥ २४२ ॥

तत्त्वंपदाभ्यामभिधीयमानयोर्ब्रह्मात्मनोः शोधितयोर्यदीत्थम् । श्रुत्या तयोस्तत्त्वमसीति सम्य-

गेकत्वमेव प्रतिपाद्यते मुहुः ॥ २४३ ॥

तत्त्वंपदाभ्यां । अभिधीयमानयोः । ब्रह्मात्मनोः । शोधितयोः । यदि । इत्थम् ॥ श्रुत्यां । तयोः । तत्त्वमसि ( तत् त्वं असि ) । इति । सम्यक् । एकत्वं । एव । प्रतिपाद्यते । मुहुः ॥ २४३ ॥

**अर्थः**–१ तत्पदानें आणि त्वंपदानें २ वाच्य ( जे ) ३ निरुपाधिक ४ ईश्वर आणि जीव ५ त्यांचें ६ अशा रीतीनें ७ तर ८ तत्त्वमसि-तें ( ब्रह्म ) तूं आहेस-९ ह्या १० श्रुतीनें ११ वारंवार-नऊ वेळां-( उपदेश करून ) १२ उत्तम प्रकारें १३ ऐक्य १४ च १५ प्रतिपादन केलें आहे. २४३

तत्त्वमसि ह्या महावाक्यानें ब्रह्मात्मैक्यच प्रतिपादन केलें आहे. तत्पद ह्मणजे ईश्वर, ब्रह्म; आणि त्वंपद ह्मणजे जीवात्मा. उपाधि त्यागानें दोघेहि एकच आहेत. २४३

ऐक्यं तयोर्लक्षितयोर्न वाच्ययोर्निगद्यतेऽन्योन्य-
विरुद्धधर्मिणोः । खद्योतभान्वोरिव राजभृत्ययोः
कूपाम्बुराश्योः परमाणुमेर्वोः ॥ २४४ ॥

ऐक्यं । तयोः । लक्षितयोः । न । वाच्ययोः । निगद्यते । अन्योन्यविरुद्धधर्मिणोः ॥ खद्योतभान्वोः । इव । राजभृत्ययोः । कूपाम्बुराश्योः । परमाणुमेर्वोः ॥ २४४ ॥

**अर्थः**–* १ लक्ष्यार्थानें २ त्यांचें-ईश्वराचें आणि जीवाचें-३ ऐक्य ( श्रुतीनें ) ४ सांगितलें आहे. ५ ज्याप्रमाणें ६ काजवा आणि सूर्य, ७ राजा आणि सेवक, ८ विहीर आणि समुद्र, ९ परमाणु आणि मेरुपर्वत ( या परस्पर विरुद्ध पदार्थांचें एकत्व असंभवनीय आहे तद्वत् )

* शब्दाचे वाच्य आणि लक्ष्य असे दोन अर्थ असतात. केवळ रूढीनें चालत आलेल्या अर्थाला वाच्यार्थ, व रुढार्थ असंभवनीय दिसून क्वचित् विशेष योग्य अर्थ घ्यावा लागतो त्या अर्थास लक्ष्यार्थ ह्मणतात. जसें " त्याचा वाडा गंगेवर आहे " या वाक्यांत गंगा शब्दाचा वाच्यार्थ जो जलप्रवाह तो न घेतां गंगा ह्मणजे गंगेचें तीर असा लक्ष्यार्थ घेतला पाहिजे.

१० परस्पर विरुद्ध धर्मवान् ( अशा त्या जीवेश्वरांच्या ) ११ वाच्यार्थांचें ( ऐक्य ) १२ नाहीं. ॥ २४४ ॥

सर्वज्ञत्व, अल्पज्ञत्व इत्यादि उपाधिधर्मांच्या त्यागानें अवशिष्ट राहिलेलें ईश्वर आणि जीव यांचें जें लक्ष्यस्वरूप शुद्धचैतन्य त्या लक्ष्यस्वरूपानेंच त्यांचें ऐक्य आहे. २४४

**तयोर्विरोधोऽयमुपाधिकल्पितो न वास्तवः कश्चिदुपाधिरेषः । ईशस्य माया महदादिकारणं जीवस्य कार्यं शृणु पञ्चकोशम् ॥ २४५ ॥**

तयोः । विरोधः । अयं । उपाधिकल्पितः । *न । वास्तवः । कश्चित् । उपाधिः । एषः ॥ ईशस्य । माया । महदादिकारणं । जीवस्य । कार्यं । शृणु । पञ्चकोशम् ॥ २४५ ॥

अर्थः—१ त्या ( जीवब्रह्मांचा ) २ हा ३ भेद ( अनाद्यविद्यादि ) ४ * उपाधीमुळें ( केवळ ) कल्पित आहे, ( सत्य नाहीं. ) ५ हा ६ उपाधिहि ७ कांहीं ८ सत्य ९ नाहीं. १० महत्वादिकांना कारणीभूत ( जी अनिर्वचनीय ) ११ माया ( ती ) १२ ईश्वराचा ( उपाधि आहे व मायेचें ) १३ कार्य ( जें ) १४ पंचकोश ( ते ) १५ जीवाचे ( उपाधि होत हें ) १६ ऐक-समज. ॥ २४५॥

जीवेश्वरभेद केवळ उपाधीमुळें भासतो, वास्तवीक नाहीं ईश्वर कारणोपाधि व जीवकार्योपाधि आहे. ॥ २४५ ॥

**एतावुपाधी परजीवयोस्तयोः सम्यङ्निरासे न परो न जीवः । राज्यं नरेन्द्रस्य भटस्य खेटकस्तयोरपोहे न भटो न राजा ॥ २४६ ॥**

---

* ज्याच्या योगानें वस्तूचें सत्य स्वरूप विपरित भासतें तो त्या वस्तूचा उपाधि होतो.

***** एथें " न वास्तवः कश्चित् " ह्या पदांचा संबंध " विरोध " पदाकडे हि लावितां येईल, व " उपाधिः एक " हीं दोन पदें " ईशस्य " इत्यादि पदांशीं जोडितां येतील अर्थ सहज समजेल.

एतौ । उपाधी । परजीवयोः । तयोः । सम्यक् । निरासे । न । परः । न । जीवः ॥ राज्यं । नरेन्द्रस्य । भटस्य । खेटकः । तयोः । अपोहे । न । भटः । न । राजा ॥ २४६ ॥

अर्थः--( माया आणि पंचकोश ) १ हे दोन २ ईश्वर आणि जीव ह्यांचे ३ उपाधि ( आहेत ) ४ त्या ( मिथ्याभूत उपाधींचा ) ५ चांगला ६ निरास केला असतां-ते मिथ्या आहेत ह्मणून मुळीं नाहींतच असा बरोबर निश्चय झाला ह्मणजे-( ईश्वर नांवाचा ) ७ ईश्वर ८ नाहीं ( व जीव नांवधारण करणारा ) ९ जीव १० नाहीं. ( तर एक शुद्ध ब्रह्म मात्र अवशिष्ट राहतें ) ( एकच पुरुष ) ११ राजा ( असला तर ) १२ राज्य ( हा त्याचा उपाधि होतो आणि ) १३ योद्धा ( असला ह्मणजे ) १४ ढाल ( हा त्याचा उपाधि होतो ) १५ त्या ( राज्य आणि ढाल अशा दोन्ही उपाधींचा ) १६ त्याग केला असतां १७ राजा १८ नाहीं ( आणि ) १९ योद्धा हि २० नाहीं, ( तर पुरुष मात्र आहे ) ॥ २४६ ॥

उपाधित्यागानें जीवेश्वरांचा भेदच नाहीं हें दृष्टांतपूर्वक सांगितलें ॥ २४६ ॥

**अथात आदेश इति श्रुतिः स्वयं निषेधति**
**ब्रह्मणि कल्पितं द्वयम् । श्रुतिप्रमाणानुगृहीतबोधा-**
**त्तयोर्निरासः करणीय एवम् ॥ २४७ ॥**

अथ । अतः । आदेशः । इति । श्रुतिः । स्वयं । निषेधति । ब्रह्मणि । कल्पितं । द्वयम् ॥ श्रुतिप्रमाणानुगृहीतबोधात् । तयोः । निरासः । करणीयः । एवम् ॥ २४७ ॥

अर्थः-" अथात आदेशः " ४ अशा ( आरंभाची ) ५ श्रुति ६ स्वतः-इतर प्रमाणांच्या साहाय्यावांचून-( शुद्ध ) ७ ब्रह्माच्या ठिकाणीं ८ आरोपित ९ द्वैताचा-अनात्म पदार्थांचा १० निषेध करीत आहे. ( ह्मणून ) ११ श्रुतिप्रमाणाला संमत अशा बोधानें १२ त्या ( कार्यकारणरूप दोन्ही उपाधींचा ) १३ वर सांगितल्याप्रमाणें १४ निरास १५ करावा. ॥२४७॥

जीवेश्वरांच्या उपाधींचा त्याग करावा अशाबद्दल श्रुति आहे हें सांगितलें. ॥२४७॥

नेदं नेदं कल्पितत्वान्न सत्यं *रज्जौ दृष्टव्यालव-
त्स्वप्नवच्च । इत्थं दृश्यं साधु युक्त्या व्यपोह्य
ज्ञेयः पश्चादेकभावस्तयोर्यः ॥ २४८ ॥

न । इदं । न । इदं । कल्पितत्वात् । न । सत्यं । रज्जौ । दृष्टव्यालवत् । स्वप्नवत् । च ॥ इत्थं । दृश्यं । साधु । युक्त्या । व्यपोह्य । ज्ञेयः । पश्चात् । एकभावः । तयोः । यः ॥ २४८॥

अर्थः—१ हें-स्थूल ( आत्मा ) २ नाहीं, ३ हें-सूक्ष्म-( आत्मा ) ४ नाहीं. ( स्थूल सूक्ष्म कांहीं हि ) ५ सत्य ६ नाहीं-सर्व विवेकानें बाधित होणारें आहे. ७ कल्पनेचा विषय असल्यामुळें ( हें सर्व ) ८ दोरीवर ९ भासलेल्या सर्पाप्रमाणें १० आणि ११ स्वप्नांत ( दिसणाऱ्या पदार्थां ) प्रमाणें ( आहे ). १२ अशा रीतीनें १३ दृश्याचा ( श्रुतिसंमत ) १४ युक्तीनें १५ साफ १६ निषेध करून १७ नंतर १८ त्या ( जीव ब्रह्माचें ) १९ जें २० ऐक्य ( तें ) २१ जाणावें. ॥ २४८ ॥

श्रुतींत सांगितलेल्या निषेधाचा प्रकार कथन केला आहे. ॥ २४८ ॥

ततस्तु तौ लक्षणया सुलक्ष्यौ तयोरखण्डैकर-
सत्वसिद्ध्यै । नालं जहत्या न तथाऽजहत्या
किन्तूभयार्थात्मिकयैव भाव्यम् ॥२४९ ॥

ततः । तु । तौ । लक्षणया । सुलक्ष्यौ । तयोः । अखण्डैकरसत्वसिद्ध्यै ॥ न । अलं । जहत्या । न । तथा । अजहत्या । किन्तु । उभयार्थात्मिकया । एव । भाव्यम् ॥ २४९ ॥

* " रज्जुदृष्टव्यालवत् " व " रज्जुर्दृष्टाव्यालवत् " असे हि पाठ आढळतात.

अर्थः–( उपाधीचा निरास सहज आहे ) १ ह्मणून २ च ३ ते दोन्ही प्रत्यगात्मा व अद्वयानंद परमात्मा-* ४ लक्षणेनें ५ अनायासानें जाणण्यास शक्य आहेत ६ त्या दोघांचें ७ अखंड एकरसत्व निश्चित करण्यांत ८ जहल्लक्षणा ९ पुरेशी-समर्थ-१० नाहीं, ( व ) ११ तशीच १२ अजहल्लक्षणाहि ( समर्थ ) १३ नाहीं; १४ परंतु ( जहत् व अजहत् या ) १५ दोन्ही अर्थांनीं युक्त ( अशी जी जहदजहल्लक्षणा किंवा भागत्यागलक्षणा ती ) १६ मात्र १७ समर्थ ( आहे ) तिचा उपयोग होतो २४९

उपाधिनिरासानंतर शुद्धाद्वैतबोध कोणत्या वृत्तीनें होतो तें सांगितलें ॥ २४९ ॥

**स देवदत्तोऽयमितीह चैकता विरुद्धधर्मांशमपास्य कथ्यते । यथा तथा तत्त्वमसीति वाक्ये विरुद्धधर्मानुभयत्र हित्वा ॥ २५० ॥**

**संलक्ष्य चिन्मात्रतया सदात्मनोरखण्डभावः परिचीयते बुधैः । एवं महावाक्यशतेन कथ्यते ब्रह्मात्मनोरैक्यमखण्डभावः ॥ २५१ ॥**

---

* २४४ व्या श्लोकावरील टिपेंत शब्दाचे वाच्य आणि लक्ष्य असे दोन अर्थ असतात असें सांगितलें आहे ज्या योग्य संबंधानें लक्ष्यार्थ घ्यावा लागतो त्यास लक्षण ह्मणतात लक्षणा तीन प्रकारची आहे जहल्लक्षणा, अजहल्लक्षणा आणि जहदजहल्लक्षणा. जहत् ह्मणजे टाकणें अजहत् ह्मणजे न टाकणें व जहदजहत् ह्मणजे कांहीं टाकणें व कांहीं न टाकणें वाच्यार्थ टाकून लक्ष्यार्थाचेंच जेथें ग्रहण केलें जातें ती जहल्लक्षणा होय जसें त्याचा वाडा गंगेवर आहे या वाक्यांत गंगेचा वाच्यार्थ जलप्रवाह टाकून गंगातीर असा लक्ष्यार्थ घ्यावा लागतो ह्मणून ही जहल्लक्षणा होय. वाच्यार्थ न टाकितां जेथें लक्ष्यार्थ घ्यावा लागतो ती अजहल्लक्षणा होय जसें रस्त्यावरून गाड्या धांवतात ह्या वाक्यांत गाड्या शब्दाचा वाच्यार्थ लांकडी सामान वगैरे न टाकितां लक्ष्यार्थ जो त्या गाड्यास जोडलेले घोडे वगैरे तोहि घ्यावा लागतो ह्मणून ही अजहल्लक्षणा होय. जेथें वाच्यार्थाचा व लक्ष्यार्थाचा कांहीं भाग टाकावा लागतो व कांहीं घ्यावा लागतो तेथें जहदजहल्लक्षणा किंवा भागत्यागलक्षणा होते जसें तोच हा देवदत्त ह्या वाक्यांत तो आणि हा ह्या शब्दांचे ती वेळ तो देश व त्या वेळचें वय आणि ही वेळ हा देश व ह्या वेळचें वय इत्यादि जे विरुद्ध अंश ते टाकून व्यक्तिमात्र जो देवदत्त तोच घ्यावा लागतो.

सः । देवदत्तः । अयं । इति । इह । वा । एकता । विरुद्ध-धर्मांशं । अपास्य । कथ्यते ॥ यथा । तथा । तत् । त्वं । असि । इति । वाक्ये । विरुद्धधर्मान् । उभयत्र । हित्वा २५० संलक्ष्य । चिन्मात्रतया । सदात्मनोः । अखण्डभावः । परिचीयते । बुधैः ॥ एवं । महावाक्यशतेन । कथ्यते । ब्रह्मात्मनोः । ऐक्यं । अखण्डभावः ॥ २५१ ॥

अर्थः—१ तो २ हा ३ देवदत्त ( आहे ) ४ ह्या ५ एथें-वाक्यांत-( तो ह्मणजे पूर्वी पाहिलेला व हा ह्मणजे आतां पाहतो तो असे देशकालादि सुचविणारे जे ) ६ विरुद्ध भाग ( त्यांचा ) ७ त्याग करून ( देवदत्तरूप व्यक्तीचें ) ८ एकत्व ९ च १० ज्याप्रमाणें ११ सांगण्यांत येतें, १२ त्याप्रमाणें १३ तें १४ तूं १५ आहेस १६ ह्या १७ वाक्यांत ( तें व तूं ह्यांचे वाच्यार्थ जे ईश्वर आणि जीव त्या ) १८ उभयतांचे ( सर्वज्ञत्व अल्पज्ञत्व इत्यादि ) १९ विरुद्धधर्म २० टाकून २१ केवल चैतन्यरूपानें ( दोघांच्याहि स्वरूपाचा ) २२ निश्चय करून २३ विवेकी पुरुष २४ अद्वयानंद व प्रत्यगात्मा ह्यांच्या २५ अभेदाचा २६ साक्षात्कार करून घेतात २७ अशा रीतीनें शेंकडों २८ महावाक्यांनीं ( शुद्ध निरुपाधिक ) २९ ईश्वर व जीव ह्यांचे ३० ऐक्य ( ह्मणजे ) ३१ अभिन्नत्वकथन केलें आहे ॥ २५० । २५१ ॥

तत्त्वमसि महावाक्याचा अर्थ करण्यांत जहदजहल्लक्षणेची योजना दृष्टांतपूर्वक केली आहे. ॥ २५० । २५१ ॥

अस्थूलमित्येतदसन्निरस्य सिद्धं स्वतो व्योमवद-
प्रतर्क्यम् । अतो मृषामात्रमिदं प्रतीतं जहीहि
यत्स्वात्मतया गृहीतम् ॥ ब्रह्माहमित्येव विशु-
द्धबुध्या विद्धि स्वमात्मानमखण्डबोधम् ॥२५२ ॥

अस्थूलं । इति । एतत । असत् । निरस्य । सिद्धं । स्वतः । व्योमवत् । अप्रतर्क्यम् । अतः । मृषामात्रं । इदं । प्रतीतं ।

जहीहि । यत् । स्वात्मतया । गृहीतम् । ब्रह्म । अहं । इति । एव । विशुद्धबुध्या । विद्धि । स्वं । आत्मानं । अखण्डबोधम् ॥ २५२ ॥

अर्थः—१ अस्थूल ह्मणजे आत्मा स्थूल नाहीं २ इत्यादि ( श्रुतिवाक्यानें ) ३ ह्या ( सत्यात्म्याच्या ठायीं कल्पित अशा ) ४ अनात्मवर्गाचा ५ निरास केल्यावर ६ आकाशाप्रमाणें असंग ( आणि ७ तर्काला अविषय ( असें चैतन्य ८ आपोआप ९ सिद्ध ( आहे ) १० यास्तव ११ जें देहेंद्रियादि जगत्-१२ आत्मरूपानें १३ भासत आहे ( आणि तसेंच ) १४ दृढ मानिलें जात आहे ( तें ) १५ हें १६ केवळ मिथ्या ( आहे ह्मणून त्याचा ) १७ त्यागकर तें आत्मा आहे असें मानूं नको- ( आणि ) १८ शुद्ध विवेक बुद्धीनें १९ अखंडचिद्रूप ( अशा ) २० आपल्या २१ आत्म्याला २२ मी २३ ब्रह्म ( आहें ) २४ असें २५ च २६ जाण. ॥ २५२ ॥

पूर्वीं कथन केलेला सिद्धांत पुनः स्पष्टपणें सांगितलेला आहे. ॥ २५२ ॥

**मृत्कार्यं सकलं घटादि सततं मृन्मात्रमेवाहितं**
**तद्वत्सज्जनितं सदात्मकमिदं सन्मात्रमेवाखिलम् ।**
**यस्मान्नास्ति सतः परं किमपि तत्सत्यं स आत्मा स्वयं**
**तस्मात्तत्त्वमसि प्रशान्तममलं ब्रह्माद्वयं यत्परम् ।२५३।**

मृत्कार्यं । सकलं । घटादि । सततं । मृन्मात्रं । एवं । आहितं । तद्वत् । सज्जनितं । सदात्मकं । इदं । सन्मात्रं । एव । अखिलम् ॥ यस्मात् । न । अस्ति । सतः । परं । किमपि । तत् । सत्यं । सः । आत्मा । स्वयं । तस्मात् । तत् । त्वं । असि । प्रशान्तं । अमलं । ब्रह्म । अद्वयं । यत् । परम् ।२५३

अर्थः—१ घट वगैरे २ सर्व ३ मृत्तिकेपासून झालेले पदार्थ ( तू भ्रांतीनें त्यात्यारूपानें सत्य ह्मणून बुद्धीच्या ठायीं ) ४ निरंतर ५ धारण

केले आहेस ( ते ) ६ केवळमृत्तिका ७ च ( आहेत ). ८ त्याप्रमाणेंच ९ हें १० सर्व-जग-११ सद्ब्रह्मापासून उत्पन्न झालेलें १२ सद्रूप ( असून ) १३ केवळ १४ ब्रह्मच ( आहे ) १५ ज्याअर्थीं १६ सद्ब्रह्माहून १७ अन्य १८ कांहीं हि १९ असूं शकत २० नाहीं, ( कारण अधिष्ठान ब्रह्मच त्या त्या रूपानें स्फुरत आहे, त्या अर्थीं ) २१ तें-सद्ब्रह्म २२ सत्य-अविनाशी-( आहे ). २३ तो ( सर्वांचा ) २४ आत्मा २५ स्वतः सिद्ध ( आहे ) २६ वास्तव २७ जें २८ अतिशांत, २९ शुद्ध, ३० कार्यकारणांहून विलक्षण, ३१ अद्वैत ( सच्चिदानंदरूप ) ३२ ब्रह्म ३३ तें ३४ तूं ३५ आहेस. ॥ २५३ ॥

तत्त्वमसिमहावाक्याचा पूर्वोक्त अर्थ दृष्टांतानें स्पष्ट केला आहे. ॥ २५३ ॥

**निद्राकल्पितदेशकालविषयज्ञात्रादि सर्वं यथा**
**मिथ्या तद्वदिहापि जाग्रति जगत्स्वाज्ञानकार्यत्वतः ।**
**यस्मादेवमिदं शरीरकरणप्राणाहमाद्यप्यसत्**
**तस्मात्तत्त्वमसि प्रशान्तममलं ब्रह्माद्वयं यत्परम् २५४**

निद्राकल्पितदेशकालविषयज्ञात्रादि । सर्वं । यथा । मिथ्या । तद्वत् । इह । अपि । जाग्रति । जगत् । स्वाज्ञानकार्यत्वतः ॥ यस्मात् । एवं । इदं । शरीरकरणप्राणाहमादि । अपि । असत् । तस्मात् । तत् । त्वं । असि । प्रशान्तं । अमलं । ब्रह्म । अद्वयं । यत् । परम् ॥ २५४ ॥

अर्थः-१ ज्याप्रमाणें २ झोंपेच्या दोषामुळें ( स्वप्नांत ) कल्पिलेले देश, काल, विषय व त्यांस जाणणारा इत्यादि ३ सर्व ४. मिथ्या-पाहतां पाहतांच नाश पावणारें ( असतें ), ५ त्याप्रमाणें ६ ह्या ७ जागृतींत ८ देखील ( हें ) ९. जग १० अज्ञानाचें कार्य असल्यामुळें ( मिथ्या आहे ). ११ ज्या अर्थीं १२ हें १३ देह,इंद्रियें, प्राण, अहंकार इत्यादिक १४ सुद्धां १५ असच-अज्ञानकार्य-( आहे ) १६ त्या अर्थीं ( तें )

१७ मिथ्या ( आहे आणि ) १८ जें १९ शांत २० शुद्ध, २१ कार्यकारणांहून विलक्षण. २२ अद्वैत २३ ब्रह्म २४ तें २५ तूं २६ आहेस. २५४

महावाक्यार्थच दुसऱ्या दृष्टांतानें सांगितला आहे. ॥ २५४ ॥

* यत्र भ्रान्त्या कल्पितं तद्विवेके तत्तन्मात्रं नैव तस्माद्विभिन्नम् । स्वप्ने नष्टं स्वप्नविश्वं विचित्रं स्वस्माद्भिन्नं किंनु दृष्टं प्रबोधे ॥ २५५ ॥

यत्र[१] । भ्रान्त्या[२] । कल्पितं[३] । तद्विवेके[४] । तत्[५] । तन्मात्रं[६] । न[९] । एवं[१०] । तस्मात्[७] । विभिन्नं[८] । स्वप्ने[१३] । नष्टं[१५] । स्वप्नविश्वं[१२] । [११]विचित्रं । स्वस्मात्[१७] । [१८]भिन्नं । [१९]किं । नु[२०] । दृष्टं[१४] । प्रबोधे[१६] २५५

**अर्थः**—१ ज्या ( मालादिकांच्या ठायीं ) २ भ्रांतीनें ३ भासलेला ( सर्प वगैरे असतो ) त्या ४ ( अधिष्ठान मालादिकांचा ) बरोबर विचार झाला असतां ५ तो ( भासलेला सर्प वगैरे ६ तद्रूप- अधिष्ठान मालादिरूपच-( असतो असें प्रत्ययास येतें ) ७ त्या ( अधिष्ठानाहून तो ) ८ भिन्न ९ नसतो १० च ( हत्ती घोडे वगैरे ) ११ विचित्र १२ स्वप्नांतील सृष्टि १३ स्वप्नांत १४ दिसत असतांनाच १५ नसते ( स्वप्नांत पाहिलेले कांहींहि १६ जागृतींत १७ स्वप्नांहून १८ भिन्न १९ असतें २० काय ॥ २५५ ॥

जगाला व्यावहारिक किंवा प्रातिभासिक हि सत्ता नाहीं हें दृष्टांत पूर्वक सांगितलें २५५

जातिनीतिकुलगोत्रदूरगं नामरूपगुणदोषवर्जितम् । देशकालविषयातिवर्ति यत् ब्रम्ह तत्त्वमसि भावयात्मनि ॥ २५६ ॥

जातिनीतिकुलगोत्रदूरगं[३] । नामरूपगुणदोषवर्जितम्[४] ॥ देश-कालविषयातिवर्ति । यत्[१] । ब्रह्म[२] । तत्[६] । त्वं[७] । असि । भावय । आत्मनि ॥ २५६ ॥

---

* हा श्लोक फक्त एका प्रतींतच आहे. दुसऱ्या चार प्रतींत दिलेला नाहीं.

**अर्थः**—१ जें २ ब्रह्म ( ब्राह्मणत्व क्षत्रियत्वादि ) ३ जाति ( राजनीति, धर्मनीति, इत्यादि ) नीति ( पितृकुल, गुरुकुल इत्यादि ) कुळें, ( आणि भारद्वाजादि ) गोत्रें यांच्या संबंधाहून वेगळें, ( देवदत्तादि ) ४ नांवें, ( शुक्लकृष्णादि ) रूपें, ( उपकार, संतोषादि किंवा सत्त्वादि ) गुण ( आणि अपकारादि किंवा लोभादि ) दोष यांनीं वर्जित, ( व अंगवंगादि ) ५ देश, ( भूत वर्तमानादि ) काल, ( आणि शब्दादि ) विषय यांहून पर ( असें आहे ) ६ तें ७ तूं ८ आहेस ९ मनांत ( त्या आत्मस्वरूपाचें १० चिंतन निदिध्यासन कर ॥ २५६ ॥

श्रुतीनें मध्यम अधिकाऱ्याकरितां नऊ वेळा अभ्यासद्वारा आत्मबोध केला आहे तो प्रकार एथें दहा श्लोकांनीं सांगितला आहे. जात्यादिविरहित जें ब्रह्म तेंच तूं आहेस हें ह्या श्लोकांत सांगितलें ॥ २५६ ॥

**यत्परं * सकलरागगोचरं गोचरं विमलबोधचक्षुषः । शुद्धचिद्घनमनादि वस्तु यद् ब्रम्ह तत्त्वमसि भावयात्मनि ॥ २५७ ॥**

यत् । परं । सकलरागगोचरं । गोचरं । विमलबोधचक्षुषः ॥ शुद्धचिद्घनं । अनादि । वस्तु । यत् । ब्रह्म । तत् । त्वं । असि । भावय । आत्मनि ॥ २५७ ॥

**अर्थः**—१ जें ( २ अविद्या व अविद्याकार्य यांहून ) वेगळें, ३ सर्वांच्या प्रीतीस पात्र सर्वांना आवडणारें ( ४ असंभावनादि ) मलरहित ( आणि महावाक्यजन्य ) ज्ञानरूप नेत्राला ५ विषय, ६ निर्मलचैतन्यरूप, ७ कार्यकारणांहून निराळें ( व ) ८ जें ९ सत्यस्वरूप आहे, १० तें ११ ब्रह्म १२ तूं १३ आहेस १४ मनांत ( त्या आत्मस्वरूपाचें ) १५ चिंतन कर. ॥ २५७ ॥

सर्वांच्या प्रेमाचें आस्पद आणि केवळ ज्ञानघन असें जें ब्रह्म तें तूं आहेस॥ २५७ ॥

---

* " सकलवागगोचरं " असा पाठ एका प्रतींत आढळतो सकल वाक् अगोचर ह्मणजे सर्व वाणींना अविषय

**षड्भिरूर्मिभिरयोगि योगिहृद्भावितं न करणै-**
**र्विभावितम् । बुध्यवेद्यमनवद्यमस्ति यद्ब्रह्म**
**तत्त्वमसि भावयात्मनि ॥ २५८ ॥**

षड्भिः । ऊर्मिभिः । अयोगि । योगिहृद्भावितं । न । करणैः । विभावितम् ॥ बुद्ध्यवेद्यं । अनवद्यं । अस्ति । यद् । ब्रह्म । तत् । इत्यादि पूर्ववत् ॥ २५८ ॥

**अर्थः**—मूढ जीवाला गटांगळ्या खावयास लावणारे देह, प्राण आणि मन ह्यांचे धर्म जे जरा, मरण, क्षुधा, तृषा, शोक आणि मोह हेच संसारसागरांतील ) १ सहा २ तरंग-लाटा-( आहेत त्या लाटांचा ) जेथें ३ संसर्ग नाहीं, ४ योगिजन हृदयांत ज्याचें चिंतन करितात, ( रूपादिज्ञान साधनें जीं नेत्रादि ) ५ इंद्रियें त्यांस ६ विषय ७ न होणारें, ८ बुद्धीला न कळणारें ( आणि ) ९ जें १० निर्दोष ११ सत्तामात्र आहे, १२ तें इत्यादि पूर्ववत् ॥ २५८ ॥

षड्भिरहित व बुद्धीला अगोचर असें शुद्ध ब्रह्म तूं आहेस. ॥ २५८ ॥

**भ्रान्तिकल्पितजगत्कलाश्रयं स्वाश्रयं च**
**सदसद्विलक्षणम् । निष्कलं निरुपमानवद्धि**
**यद् ब्रह्म तत्त्वमसि भावयात्मनि ॥ २५९ ॥**

भ्रान्तिकल्पितजगत्कलाश्रयं । स्वाश्रयं । च । सदसद्विलक्षणम् ॥ निष्कलं । निरुपमानवत् । हि । यद् । ब्रह्म । इ. २५९

**अर्थः**-१ भ्रांतीनें कल्पित केलेल्या जगाच्या ( प्राणादि ) कल्पनांचें अधिष्ठान, ( निराकार व चेतन असल्यामुळें ) २ स्वतांच्याच आश्रयानें असणारें-आश्रयाची अपेक्षा नसणारें-३ स्थूल ( आणि ) सूक्ष्म ह्यांहून भिन्न, ४ निरवयव ५ आणि ६ उपमारहित ( असें ) ७ जें ८ ब्रह्म इत्यादि. ॥ २५९ ॥

ब्रह्माचेंच स्वरूपलक्षण सांगितले ॥ २५९ ॥

**जन्मवृद्धिपरिणत्यपक्षयव्याधिनाशनविहीनम-**
**व्ययम् । विश्वसृष्टयवविघातकारणं ब्रह्म**
**तत्त्वमसि भावयात्मनि ॥ २६० ॥**

जन्मवृद्धिपरिणत्यपक्षयव्याधिनाशनविहीनं[1] । अव्ययम्[2] ॥ विश्वसृष्ट्यवविघातकारणं[3] । ब्रह्म[4] । इत्यादि. ॥ २६० ॥

**अर्थः**–१ जन्म, वृद्धि, परिणाम, क्षीणता, रोग, मृत्यु ( या विकारांनीं ) रहित, ( ह्मणूनच ) २ निर्विकार ( आणि ) ३ जगाच्या उत्पत्ति स्थितिसंहाराला कारण ( असें जें ) ४ ब्रह्म इत्यादि. ॥ २६० ॥

षड्विकाररहित व जगदुत्पत्तिस्थितिलय यांस हेतुभूत जें ब्रह्म तें तूं आहेस ॥२६०॥

**अस्तभेदमनपास्तलक्षणं निस्तरङ्गजलराशिनि-**
**श्चलम् । नित्यमुक्तमविभक्तमूर्ति यद्ब्रह्म**
**तत्त्वमसि भावयात्मनि ॥ २६१ ॥**

अस्तभेदं[1] । अनपास्तलक्षणं[2] । निस्तरङ्गजलराशिनिश्चलम्[3] ॥ नित्यमुक्तं[4] । अविभक्तमूर्ति[5] । यद्[6] । ब्रह्म[7] । इत्यादि. ॥ २६१ ॥

**अर्थः**–( जीव, ईश्वर, जगत् हा जेथें १ भेद नाहीं, ( सद्रूपानें सर्व काळ स्फुरत असल्यामुळें ) जें २ प्रकट स्वरूप आहे ३ लाटा नसलेल्या शांत समुद्राप्रमाणें जें गंभीर आहे ४ कालत्रयीं हि ज्याला बंधनाचा स्पर्श नाहीं ( आणि जें ) ५ वस्तुपरिच्छेद रहित आहे ( असें ) ६ जें ७ ब्रह्म इत्यादि, ॥ २६१ ॥

ब्रह्मस्वरूपाचेंच लक्षण सांगितलें ॥ २६१ ॥

**एकमेव सदनेककारणं * कारणान्तरनिरास्य-**
**कारणम् । कार्यकारणविलक्षणं स्वयं ब्रह्म**

---

* " कारणान्तरनिरासकारणं " असाहि पाठ आहे. " दुसऱ्या कारणांचा निरास करण्यास कारणीभूत " असा अर्थ होईल.

तत्त्वमसि भावयात्मनि ॥ २६२ ॥

एकं । एवं । सत् । अनेककारणं । कारणान्तरनिरास्यकारणम् ॥ कार्यकारणविलक्षणं । स्वयं । ब्रह्म । इ० ॥ २६२ ॥

**अर्थः**—१ एक २ च ३ असून ( जड व चेतन अशा ) अनेक ४ प्रकारच्या ( संसाराचें ) कारण, ( ब्रह्माहून भिन्न अशा ) ५ दुसऱ्या कारणाचा निरास करणाऱ्या ( वेदांतांनीं ) अकारणरूप-कारणशून्य-( असें वर्णिलेलें ) ६ माया आणि मायाकार्य ह्यांहून विलक्षण ( असें जें ) ७ इतरांची अपेक्षा न करणारें ८ ब्रह्म इत्यादि ॥ २६२ ॥

ब्रह्माचेंच लक्षण सांगितलें ॥ २६२ ॥

निर्विकल्पकमनल्पमक्षरं यत्क्षराक्षरविलक्षणं परम् । नित्यमव्ययसुखं निरञ्जनं ब्रह्म तत्त्वमसि भावयात्मनि ॥ २६३ ॥

निर्विकल्पकं । अनल्पं । अक्षरं । यत् । क्षराक्षरविलक्षणं । परम् ॥ नित्यं । अव्ययसुखं । निरञ्जनं । ब्रह्म । इ० ॥ २६३ ॥

**अर्थः**—( संशयविपर्ययादि ) १ विकल्पांनीं विरहित, २ परिच्छेदरहित, ३ अविनाशी, ४ शरीर व अविद्या ह्यांहून विलक्षण, सर्वांहून ५ उत्कृष्ट, ६ नित्य, ७ निर्विकार सुखरूप ( आणि ) ८ अविद्यावरणरहित ( असें ) ९ जें १० ब्रह्म इ० ॥ २६३ ॥

ब्रह्मस्वरूपाचेंच वर्णन केलें आहे. ॥ २६३ ॥

यद्विभाति सदनेकधा भ्रमान्नामरूपगुणविक्रियात्मना । हेमवत्स्वयमविक्रियं सदा ब्रह्म तत्त्वमसि भावयात्मनि ॥ २६४ ॥

यद् । विभाति । सत् । अनेकधा । भ्रमात् । नामरूपगुण-

विक्रियात्मना ॥ हेमवत् । स्वयं । अविक्रियं । सदा । ब्रह्म । तत् । इ० ॥ २६४ ॥

**अर्थः**—१ एक सुवर्णच ज्याप्रमाणें ( ४ भ्रमानें कटककुंडलादि ५ नामरूपांनीं ६ नानाप्रकारचें ७ भासतें ) तद्वत् २ जें ३ सद्रूप ( ब्रह्म एक असून हि ) ४ भ्रमानें ( देव, मनुष्य, पशु इत्यादि ) ५ नाम, रूप, गुण, क्रिया या भेदांनीं ६ अनेक प्रकारचें ( आहे असें ) ७ भासतें. ( परंतु ८ स्वतां ९ सर्वकाळ १० निर्विकार ( आहे ), ११ तें १२ ब्रह्म इ० ॥ २६४ ॥

एकच ब्रह्म अनेक प्रकारांनीं भासत आहे हें दृष्टांतानें सांगितलें. ॥ २६४ ॥

**यच्चकास्त्यनपरं परात्परं प्रत्यगेकरसमा-**
**त्मलक्षणम् । सत्यचित्सुखमनन्तमव्ययं**
**ब्रह्म तत्त्वमसि भावयात्मनि ॥ २६५ ॥**

यत् । चकास्ति । अनपरं । परात् । परं । * प्रत्यगेकरसं । आत्मलक्षणम् ॥ सत्यचित्सुखं । अनन्तं । अव्ययं । ब्रह्म । तत् । इ० ॥ २६५ ॥

**अर्थः**— १ जे ( ब्रह्म ) २ ज्याहून अन्य कोणी नाहीं. अशारीतीनें स्वताच ३ प्रकाशमान आहे, ( जें कार्य वर्गाहून पर अशा ) ४ अज्ञानाहून हि ५ पर, ६ सर्वांतरकूटस्थरूप, ७ मुख्यात्मस्वरूप, ८ सच्चिदानंदरूप, ९ देशकालादिपरिच्छेदरहित ( आणि ) १० अविनाशी ( आहे ), ११ तें १२ ब्रह्म इ० ॥ २६५ ॥

ब्रम्हात्मभावनेचें निरूपण पुरें केलें. ॥ २६५ ॥

**उक्तमर्थमिममात्मनि स्वयं * भावयेत्प्रथित-**

---

* " प्रत्यक् । एकरसं । " अशीं दोन पदें हि घेऊन अर्थ करितां येतील. जें प्रत्यग्रूप-सर्वांना प्रत्यक्ष-आणि एकरस असें आहे.

* " भावयेत् " ह्याबद्दल " भावये: " ह्मणजे " तूं चिंतनकर " असाहि पाठ आहे.

**युक्तिभिर्धिया । संशयादिरहितं कराम्बुवत्तेन तत्त्वनिगमो भविष्यति ॥ २६६ ॥**

उक्तं । अर्थं । इमं । आत्मनि । स्वयं । भावयेत् । प्रथित-युक्तिभिः । धिया ॥ संशयादिरहितं । कराम्बुवत् । तेन । तत्त्वनिगमः । भविष्यति ॥ २६६ ॥

**अर्थः**—( दहा श्लोकांनीं ) १ सांगितलेल्या २ श्रुति-साक्षात् अनुभवास येणाऱ्या-( परमार्थभूत ) ब्रह्मात्मैक्यरूप ) ३ अर्थाचें ४ स्वतांच ५ आपल्या अंतःकरणांत ६ वेदानुकूल अशा सत्य युक्तींच्या योगानें ( आणि शुद्ध ) ७ बुद्धीनें ( अहोरात्र ) ८ चिंतन करावें; ( म्हणजे ) ९ त्याच्या-योगानें हातांतील १० पाण्या प्रमाणें ११ संशय वगैरे कांहीं न राहतां १२ नित्याद्वैतब्रह्मस्वरूपाचा साक्षात्कार होईल ॥ २६६ ॥

वर सांगितलेल्या ब्रह्मात्मभावनेचें फल सांगितलें. ॥ २६६

**सम्बोधमात्रं परिशुद्धतत्त्वं विज्ञाय संघे नृपवच्च सैन्ये । तदाश्रयः स्वात्मनि सर्वदा स्थितो विलापय ब्रह्मणि विश्वजातम् ॥ २६७ ॥**

सम्बोधमात्रं । परिशुद्धतत्त्वं । विज्ञाय । संघे । नृपवत् । * च । सैन्ये ॥ तदाश्रयः । स्वात्मनि । सर्वदा । स्थितः । विलापय । ब्रह्मणि । विश्वजातम् ॥ २६७ ॥

**अर्थः**—१ सैन्यांत ( सैन्याचा स्वामी ) २ राजा ( असतो ) त्या-प्रमाणें ( शरीरेंद्रियादि ) ३ संघातांत ( त्याचा स्वामी ) ४ नित्य चेतनरूप ( आणि ) ५ अविद्या व अविद्याकार्य यांच्या मलानें विरहित ( असा आहे असें साक्षात् ६ जाणून ( व ) ७ त्या ( संघाताचें ) अधिष्ठान होऊन ( आणि ) ८ ब्रह्मात्मस्वरूपीं ९ सर्वकाल-भोजनादि व्यवहारांत देखील १० निष्ठा ठेवून ११ सर्व जड प्रपंचाचा १२ ब्रह्माच्या ठायीं १३ लय-

---

* "च" ह्या अव्ययाचा एथें कांहीं अर्थ होत नसून तें केवळ पादपूरणार्थ आहे

कर-कटकादि अलंकार ज्याप्रमाणें सुवर्णाहून भिन्न नाहींत त्याप्रमाणें प्रपंच ब्रह्माहून भिन्न नाहीं असा निश्चय कर॥ २६७ ॥

ब्रह्मसाक्षात्कारानें प्राप्त होणारी ब्रह्मनिष्ठा सांगितली आहे ॥ २६७ ॥

**बुद्धौ गुहायां सदसद्विलक्षणं ब्रह्मास्ति सत्यं**
**परमद्वितीयम् । तदात्मना योऽत्र वसेद्गुहायां**
**पुनर्न तस्याङ्ग गुहाप्रवेशः ॥ २६८ ॥**

बुद्धौ । गुहायां । सदसद्विलक्षणं । ब्रह्म । अस्ति । सत्यं । परं । अद्वितीयम् ॥ तदात्मना । यः । अत्र । वसेत् । गुहायां । पुनः । न । तस्य । अङ्ग । गुहाप्रवेशः ॥ २६८ ॥

अर्थः —( जडचेतनांचा निश्चय करणाऱ्या ) १ बुद्धिरूप २ गुहेंत ३ स्थूल व सूक्ष्म ह्यांहून विलक्षण, ४ उत्कृष्ट, ५ अद्वैत ( आणि ) ६ अविनाशी ७ ब्रह्म ८ आहे. * ९ हा ( शिष्या ) १० जो ( ब्रह्मवेत्ता ) ११ ब्रह्मस्वरूपानें १२ ह्या १३ गुहेंत १४ वास करील-बुद्धितादात्म्य टाकून एकाग्रतेनें ब्रह्मनिष्ठा संपादन करील-१५ त्याला १६ पुनः ( मातृकुक्षिरूप ) १७ गुहाप्रवेश ( होणार ) १८ नाहीं—तो पुनः जन्मास येणार नाहीं ॥ २६८ ॥

ब्रह्मनिष्ठेचें फल सांगितलें. ॥ २६८ ॥

**ज्ञाते वस्तुन्यपि बलवती वासनानादिरेषा**
**कर्ता भोक्ताप्यहमिति दृढा यास्य संसारहेतुः ।**
**प्रत्यग्दृष्ट्यात्मनि निवसता सापनेया प्रयत्ना-**
**न्मुक्तिं प्राहुस्तदिह मुनयो वासनातानवं यत् २६९**

ज्ञाते । वस्तुनि । अपि । बलवती । वासना । अनादिः । एषा । कर्ता । भोक्ता । अपि । अहं । इति । दृढा । या । अस्य ।

* सर्वत्र विद्यमान असलेल्या ब्रह्माचें बुद्धिस्थान श्रुतीनें वर्णन केलें आहे तें ब्रह्मप्राप्तीचें साधन म्हणून केलें आहे.

संसारहेतुः ॥ प्रत्यग्दृष्ट्या । आत्मनि । निवसता । सा । अप-
नेया । प्रयत्नात् । मुक्तिं । प्राहुः । तद् । इह । मुनयः ।
वासनातानवं । यत् ॥ २६९ ॥

**अर्थः**--१ परमात्मस्वरूपाचा २ निश्चय झाला असतां ३ हि ४ ही--सर्वांच्या अनुभवास येणारी--५ दृढ ( आणि ) ६ बळकट ७ मी ८ कर्ता ९ आणि १० भोक्ता ११ अशा प्रकारची १२ जन्मपरंपरेनें संपादन केलेली १३ वासना, १४ जी १५ ह्या ( जीवाला ) १६ संसार ( प्राप्त होण्यास ) कारण आहे; १७ ती १८ मी साक्षी स्वयंप्रकाश आहें ह्या आत्मदृष्टीनें १९ स्वात्मत्वीं २० राहणाऱ्या पुरुषानें ब्रह्मनिष्ठानें-२१ प्रयत्नानें २२ निवृत्त करावी. ( व्यासादि ) २३ मुनि २४ एथें-हें शरीर जीवंत असतांच-जें २६ वासनेचें कमी होणें २७ त्यालाच २८ मुक्ति २९ ह्मणतात. ॥ २६९ ॥

ब्रह्मनिष्ठेनें वासना शिथिल होऊन जीवन्मुक्तिसुख प्राप्त होतें. ॥ २६९ ॥

**अहं ममेति यो भावो देहाक्षादावनात्मनि ।**
**अध्यासोऽयं निरस्तव्यो विदुषा स्वात्मनिष्ठया २७०**

अहं । मम । इति । यः । भावः । देहाक्षादौ । अनात्मनि ॥
अध्यासः । अयं । निरस्तव्यः । विदुषा । स्वात्मनिष्ठया ।२७०।

**अर्थः**—१ देहेंद्रियादि २ आत्मभिन्न पदार्थांच्या ठिकाणीं ३ मी ( आणि ) ४ माझें अशा ५ प्रकारचें ६ जें ७ बुद्धिवृत्तीचें असणें ८ तो ९ अध्यास ( होय ) १० ब्रह्मवेत्त्यानें ११ ब्रह्मनिष्ठेच्या योगानें ( त्याचा ) १२ निरास करावा. ॥ २७० ॥

ब्रह्मनिष्ठेनें वासना शिथिल होऊन अध्यासाचा नाश होतो. ॥ २७० ॥

**ज्ञात्वा स्वं प्रत्यगात्मानं बुद्धितद्वृत्तिसाक्षिणम् ।**
**सोऽहमित्येव सद्वृत्त्याऽनात्मन्यात्ममतिं जहि।२७१।**

ज्ञात्वा । स्वं । प्रत्यगात्मानं । बुद्धितद्वृत्तिसाक्षिणम् ॥ सः । अहं । इति । एव । सद्वृत्त्या । अनात्मनि । आत्ममतिं । जहि ॥ २७१ ॥

अर्थः—१ अंतःकरण ( आणि ) त्याच्या वृत्ति यांचा साक्षी-त्यांस साक्षात् प्रकाशितकरणारा-२ प्रत्यगात्मा ( जो ) ३ आपण ( त्याला ) ४ जाणून ५ तो-साक्षी चिदात्मा-६ मी ( आहें. ) ७ अशाप्रकारच्या ८ च यथार्थ ९ ज्ञानरूप वृत्तीनें ( इंद्रियादि ) १० अनात्मवर्गाच्या ठायीं ( असलेली ) ११ आत्मबुद्धि १२ टाकून दे. ॥ २७१ ॥

यथार्थ स्वरूपज्ञानानें अनात्मवर्गाच्या ठिकाणीं झालेला आत्माध्यास दूर होतो.।२७१।

**लोकानुवर्तनं त्यक्त्वा त्यक्त्वा देहानुवर्तनम् ।**
**शास्त्रानुवर्तनं त्यक्त्वा स्वाध्यासापनयं कुरु ।२७२।**

लोकानुवर्तनं । त्यक्त्वा । त्यक्त्वा । देहानुवर्तनम् ॥ शास्त्रानुवर्तनम् । त्यक्त्वा । स्वाध्यासापनयं । कुरु ॥ २७२ ॥

अर्थः—१ लोकाचाराला २ टाकून, ( अभ्यंगचंदनलेपादि ) ३ देहसुखाला ४ टाकून ( आणि ५ शास्त्रांचें अध्ययन व अध्यापन ह्यांच्या चिंतनाला ६ टाकून ७ आपला अध्यास ८ दूरकर. ॥ २७२ ॥

ब्रह्मनिष्ठा सिद्ध होण्याकरितां लोकाचार वगैरे सोडून देणें जरूर आहे. ॥२७२॥

**लोकवासनया जन्तोः शास्त्रवासनयापि च ।**
**देहवासनया ज्ञानं यथावन्नैव जायते ॥ २७३ ॥**

लोकवासनया । जन्तोः । शास्त्रवासनया । अपि । च ॥ देहवासनया । ज्ञानं । यथावत् । न । एव । जायते ॥ २७३॥

अर्थः—१ लोकवासनेनें लोकांच्या संतोषार्थ आचरणानें-२ देह-वासनेनें-देह स्वच्छ आणि सुंदर रहावा ह्मणून तैलाभ्यंगादि करण्यानें-३ आणि ४ शास्त्रवासनेनें ५ देखील-सभेंत प्रतिष्ठा मिळण्याकरितां शास्त्र शिकण्यानें व शिकविण्यानें-६ पुरुषाला ७ ज्ञान ८ यथार्थ ९ होत १० च ११ नाहीं २७३

यथार्थ ज्ञान होण्यास लोकवासनादि तीन वासना सुटल्या पाहिजेत कारण त्या अनात्मदृष्टीवांचून होत नाहींत आणि जोंपर्यंत अनात्मदृष्टि आहे तोंपर्यंत यथार्थ आत्मज्ञानाची आशा नाहीं. ॥ २७३ ॥

**संसारकारागृहमोक्षमिच्छोरयोमयं पादनिब-**
**न्धशृङ्खलम् । वदन्ति तज्ज्ञाः पटु वासनात्रयं**
**योऽस्माद्विमुक्तः समुपैति मुक्तिम् ॥ २७४ ॥**

संसारकारागृहमोक्षं । ईच्छोः । अयोमयं । पादनिबन्धशृङ्खलम् । वदन्ति । तज्ज्ञाः । पटु । वासनात्रयं । यः । अस्मात् । विमुक्तः । समुपैति । मुक्तिम् ॥ २७४ ॥

**अर्थः**–२ ब्रह्मवेत्ते पुरुष ( वर सांगितलेल्या ) २ तीन वासना ३ संसाररूप कारागृहांतून सुटण्याची ४ इच्छा करणाऱ्या मुमुक्षूला ५ लोखंडी ६ अतिदृढ ७ पायांला जखडणाऱ्या बिड्या ( आहेत असें ) ८ ह्मणतात. ९ जो १० ह्या ( वासनात्रयापासून ) ११ सुटला ( त्याला ) १२ मोक्ष १३ प्राप्त होतो. ॥ २७४ ॥

वासनात्रय लोखंडी बेडी प्रमाणें बंधनाला कारण आहे. ॥ २७४ ॥

**जलादिसंसर्गवशात्प्रभूतदुर्गन्धधूतागरुदि-**
**व्यवासना । संघर्षणेनैव विभाति सम्यग्**
**विधूयमाने सति बाह्यगन्धे ॥ २७५ ॥**

**अन्तःश्रितानन्तदुरन्तवासनाधूलीविलिप्ता**
**परमात्मवासना । प्रज्ञातिसंघर्षणतो विशुद्धा**
**प्रतीयते चन्दनगन्धवत्स्फुटम् ॥ २७६ ॥**

जलादिसंसर्गवशात् । प्रभूतदुर्गन्धधूता । अगरुदिव्यवासना ॥ संघर्षणेन । एव । विभाति । सम्यक् । विधूयमाने । सति । बाह्यगन्धे ॥ २७५ ॥

अन्तःश्रितानन्तदुरन्तवासनाधूलीविलिप्ता । परमात्मवासना ॥ प्रज्ञातिसंघर्षणतः । विशुद्धा । प्रतीयते । चन्दनगन्धवत् । स्फुटम् ॥ २७६ ॥

अर्थः—(ज्याप्रमाणें) १ दुर्गंध पाण्याचा संबंध झाल्यामुळें २ अतिशय दुर्गंधानें आच्छादून गेलेला ३ चंदनाचा उत्कट सुवास ४ घांसण्यानें ५ बाहेरील दुर्गंध ६ साफ ७ नाहींसा झाला ८ असतां ९ च १० प्रगट होतो; (त्याप्रमाणें) ११ अंतःकरणांत असलेल्या असंख्य दुर्भेद्यवासनारूपी धुळीनें आच्छादित झालेली १२ परमात्मस्वरूपाची वासना-आत्मानंदाभिव्यक्ति-आत्मानंदाचा प्रकट भाव-१३ शुद्धबुद्धीच्या ब्रह्मनिष्ठासंपादनरूप उत्तम घर्षणानें १४ अतिशुद्ध (होऊन) १५ चंदनाच्या सुवासाप्रमाणें १६ स्पष्ट १७ प्रत्ययास येते. ॥ २७५ ॥ २७६ ॥

लोकवासनादि वासनांच्या योगानें आच्छादित झालेली परमात्मस्वरूपाची वासना उत्कट ब्रह्मनिष्ठेनें व्यक्त होते हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. ॥ २७५ ॥ २७६ ॥

* अनात्मवासनाजालैस्तिरोभूतात्मवासना ।
नित्यात्मनिष्ठया तेषां नाशे भाति स्वयं स्फुटम् २७७

अनात्मवासनाजालैः । तिरोभूता । आत्मवासना ॥ नित्यात्मनिष्ठया । तेषां । नाशे । भाति । स्वयं । स्फुटम् ॥ २७७ ॥

अर्थः--(देहादि) १ अनात्म पदार्थांच्या (दुर्गंधिरूप पूर्वोक्त) वासनांच्या समूहांनीं २ आच्छादित झालेली ३ आत्मानंदाभिव्यक्ति ४ नित्याद्वैत ब्रह्मनिष्ठेनें ५ त्या (आनात्म वासना समूहांचा) ६ नाश झाला असतां ७ स्वतांच-दुसऱ्या प्रकाशाच्या अपेक्षेवांचून-८ स्पष्टपणें ९ प्रकाशित होते. ॥ २७७ ॥

पूर्वोक्त अर्थाचेंच विवरण केलें आहे. ॥ २७७ ॥

यथा यथा प्रत्यगवस्थितं मनस्तथा तथा मुञ्चति बाह्यवासनाम् । निःशेषमोक्षे सति वासनाना-

* एका प्रतींत हा श्लोक नाहीं.

आत्मानुभूतिः प्रतिबन्धशून्या ॥ २७८ ॥

यथा । यथा । प्रत्यगवस्थितं । मनः । तथा । तथा । मुञ्चति । बाह्यवासनाम् ॥ निःशेषंमोक्षे । सति । वासनानां । आत्मानुभुतिः । प्रतिबन्धशून्या ॥ २७८ ॥

**अर्थः**–१ अंतःकरण २ जसें जसें ४ साक्षी आत्म्याच्या ठायीं स्थिर होत जाईल, ५ तसें ६ तसें ( तें देहेंद्रियवित्तसुतादि ) ७ बाह्य वासनांचा ८ त्याग करील. ९ वासनांचा १० सर्वथैव नाश झाला ११ असतां १२ प्रतिबंधावांचून १३ आत्मानंदाभिव्यक्ति ( होते ). ॥ २७८ ॥

विषयवासना अनंत असल्या तरी एका ब्रह्मनिष्ठेनें त्या सर्वांची हळु हळु निवृत्ति होत जाते. ॥ २७८ ॥

स्वात्मन्येव सदा स्थित्वा मनो नश्यति योगिनः ।
वासनानां क्षयश्चातः स्वाध्यासापनयं कुरु ॥ २७९ ॥

स्वात्मनि । एव । सदा । स्थित्वा । मनः । नश्यति । योगिनः । वासनानां । क्षयः । च । अतः । स्वाध्यासापनयं । कुरु । २७९ ।

**अर्थः**–१ आत्माभ्यासी-आत्मस्वरूपीं मनाची योजना करणाऱ्या-पुरुषाचें २ मन ३ अद्वैतात्मस्वरूपीं ४ च ५ निरंतर ६ राहून ७ सर्वसंकल्परहित होतें; ८ आणि ९ असें झाल्यामुळें ( मनाच्या अधीन असलेल्या ) १० वासनांचा ( मनाच्या नाशाबरोबर ) ११ नाश ( होतो; ह्मणून तूं ) १२ आपला अध्यास दूर १३ कर. ॥ २७९ ॥

आत्मनिष्ठेनें जीवन्मुक्तिसुख प्रकट होतें. ह्मणून तिचाच अवलंब करून अनर्थपरंपरा प्राप्त करून देणारी जी अध्यासपरंपरा तिचा त्याग करावा, हें नऊ श्लोकांनीं सांगितलें आहे. आत्मस्वरूपीं मन ठेविल्यानें त्याचा लय होऊन वासनांचा क्षय होतो हें ह्या श्लोकांत सांगितलें आहे. ॥ २७९ ॥

तमो द्वाभ्यां रजः सत्त्वात्सत्त्वं शुद्धेन नश्यति ।
तस्मात्सत्त्वमवष्टभ्य स्वाध्यासापनयं कुरु ॥ २८० ॥

तमः । द्वाभ्यां । रजः । सत्त्वात् । सत्त्वं । शुद्धेन । नश्यति ॥
तस्मात् । सत्त्वं । अवष्टंभ्य । इत्यादि । पूर्ववत् ॥ २८० ॥

अर्थः-( प्रमादालस्यादिकांचें कारण जो ) १ तमोगुण ( त्याचा शुभमार्गाकडे प्रवृत्ति करणारा जो ) रजोगुण ( व परमात्मज्ञानाला कारण जो ) सत्त्वगुण ह्या २ दोहोंच्या ( आधिक्यानें ७ नाश होतो ) ८ ह्मणून ९ सत्त्वगुणाचें १० अवलंबनकरून इत्यादि पूर्ववत् ॥ २८० ॥

अध्यासाला हेतुभूत जे त्रिगुण त्याचा नाश कसा करावा हें सांगितलें ॥ २८० ॥

**प्रारब्धं पुष्यति वपुरिति निश्चित्य निश्चलः ।**
**धैर्यमालम्ब्य यत्नेन स्वाध्यासापनयं कुरु ॥२८१॥**

प्रारब्धं । पुष्यति । वपुः । इति । निश्चित्य । निश्चलः ॥ धैर्यं । आलम्ब्य । यत्नेन । इत्यादि ॥ २८१ ॥

अर्थः-( पूर्वजन्मार्जित कर्मसमूहानें बनलेल्या माझ्या ) १ शरीराचें ( तें ) २ प्रारब्ध ( कर्मच ) ३ पोषण करील असा ( मनात ) निश्चय ५ करून ६ शांत ( हो आणि ) ७ धैर्य ८ धरून ९ प्रयत्नानें-ब्रह्मनिष्ठेच्या अभ्यासानें इ० ॥ २८१ ॥

ज्या प्रारब्धानें शरीर प्राप्त झालें आहे तेंच प्रारब्ध त्याचें पोषण करील ह्मणून शरीर धारणें बद्दल निश्चित असून ब्रह्मनिष्ठाच वाढवावी ॥ २८१ ॥

**नाहं जीवः परं * ब्रह्मेत्यतद्व्यावृत्तिपूर्वकम् ।**
**वासनावेगतः प्राप्तस्वाध्यासापनयं कुरु ॥ २८२ ॥**

न । अहं । जीवः । परं । ब्रह्म । इति । अतद्व्यावृत्तिपूर्वकम् । वासनावेगतः । प्राप्तस्वाध्यासापनयं । कुरु ॥ २८२ ॥

अर्थः-१ मी-शुद्ध चिदात्मा-२ कार्यकारणांहून भिन्न ३ ब्रह्मस्वरूप ( आहे ) ४ जीवत्वाचा आश्रय करणारा ५ नाहीं; ६ अशा प्रकारें जें तें

* दोन प्रतींत " ब्रह्मेत्येतद्व्यावृत्तिपूर्वकम् " असा पाठ आहे. " एतद्व्यावृत्तिपूर्वकं " ह्मणजे " पूर्वोक्तपंचकोश मिथ्या पदार्थांच्या निषेधा सह "

ब्रह्म-७ नाहीं त्याचा-कार्यकारणरूप अनात्मवर्गाचा-निषेध करून (द्वैतसंस्कारलक्षण दुर्गंधिरूप) ८ वासनांच्या प्राबल्यानें प्राप्त ९ झालेला आपला अध्यास दूर १० कर ॥ २८२ ॥

अनात्मा ब्रह्म नाहीं असा अनात्मवर्गाचा निषेध करून अध्यास दूर करावा असें व्यतिरेकमुखानें सांगितलें ॥ २८२ ॥

**श्रुत्या युक्त्या स्वानुभूत्या ज्ञात्वा सार्वात्म्यमात्मनः ।**
**क्वचिदाभासतः प्राप्तस्वाध्यासापनयं कुरु ॥ २८३ ॥**

श्रुत्या । युक्त्या । स्वानुभूत्या । ज्ञात्वा । सार्वात्म्यं । आत्मनः । क्वचित् । आभासतः । प्राप्तस्वाध्यासापनयं । कुरु ॥ २८३ ॥

**अर्थः**–(पुढेंमागें सर्वत्र हें सर्व ब्रह्मच आहे अशा अर्थाच्या) १ श्रुतीच्या योगानें, (दोरीवर भासणारा सर्प दोरीहून भिन्न नसतो, ह्मणजे जें ज्याच्या सत्तेनें भासतें तें त्याहून भिन्न नसतें, ह्मणून माझ्या सत्तेनें भासणारें जगत् मजहून भिन्न नाहीं इत्यादि) २ युक्तींच्या योगानें (आणि समाधिकालीं प्रत्ययास येणाऱ्या अद्वैत) ३ आत्मानुभवानें ४ स्वतांच्या ५ अपरिच्छिन्नतेचा ६ साक्षात्कार करून घेऊन ७ केव्हांहि ८ आभासमात्रानें ९ प्राप्त होणारा आपला अध्यास दूर १० कर. २८३

आपण सर्वत्र आहों असें आपलें स्वरूप जाणून केवळ आभासमात्र-खरा नव्हे- असा जो अध्यास त्याचा निरास करावा. ॥ २८३ ॥

**अनादानविसर्गाभ्यामीषन्नास्ति क्रिया * मुनेः ।**
**तदेकनिष्ठया नित्यं स्वाध्यासापनयं कुरु ॥ २८४ ॥**

अनादानविसर्गाभ्यां । ईषत् । न । अस्ति । क्रिया । मुनेः ॥ तदेकनिष्ठया । नित्यं । इ० ॥ २८४ ॥

**अर्थः**–१ ग्रहणबुद्धि व त्यागबुद्धि या दोहोंच्याहि अभावामुळें २ मननशील अशा विद्वानाकडून ३ अल्पहि ४ क्रिया ५ होत ६ नाहीं,

---

* "क्रिया मुनेः" याबद्दल "क्रियात्मनः" असाहि पाठ आहे, "क्रिया आत्मनः नास्ति" ह्मणजे आत्म्याकडून क्रिया होत नाहीं.

( कारण प्राणाच्या क्रियेप्रमाणें केवळ स्वाभाविक क्रियेनें अध्यास घडत नाहीं. ह्मणून ) त्या ७ एका ब्रह्मनिष्ठेनें ८ सर्वकाळ इ० ॥ २८४ ॥

स्नानपानादि शरीराच्या अवश्य क्रियांनीं विद्वानाला अध्यास प्राप्त होत नाहीं. २८४

**तत्त्वमस्यादिवाक्योत्थब्रह्मात्मैकत्वबोधतः ।**
**ब्रह्मण्यात्मत्वदार्ढ्याय स्वाध्यासापनयं कुरु ॥२८५॥**

तत्त्वंमस्यादिवाक्योत्थब्रह्मात्मैकत्वबोधतः । ब्रह्मणि । आत्मत्वदार्ढ्याय । इ० ॥२८५ ॥

**अर्थः**– " १ तत्त्वमसि– " तें ब्रह्म तूं आहेस–इत्यादि ( ब्रह्म आणि जीव ह्यांचें ऐक्य प्रतिपादन करणारीं जीं गुरुमुखानें ऐकिलेलीं ) महावाक्यें ( त्यांच्या मनन निदिध्यासन द्वारा ) उत्पन्न झालेला ( जो ) ब्रह्म आणि आत्मा यांच्या ऐक्याचा ( साक्षात् ) बोध त्याच्या योगानें ( शुद्ध असें जें तत्पदलक्ष्य ) २ ब्रह्म त्याच्याशीं ३ आपला अभेद दृढ करण्यासाठीं इ० ॥ २८५ ॥

अध्यास दूर केल्यानें ब्रह्मात्मैक्यबोध निश्चित होतो. ॥ २८५ ॥

**अहंभावस्य देहेऽस्मिन्निःशेषविलयावधि ।**
**सावधानेन युक्तात्मा स्वाध्यासापनयं कुरु । २८६ ।**

अहंभावस्यं । देहे । अस्मिन् । निःशेषविलयावधि ॥ सावधानेन । युक्तात्मा । इ० ॥ २८६ ॥

**अर्थः**–१ ह्या २ देहमुख्य संघाताच्या ठिकाणीं ( असलेली ) ३ आत्मबुद्धि ४ निःशेष नष्ट होईपर्यंत ५ सावधपणानें ६ योगाभ्यासांत तत्पर होऊन इ० ॥ २८६ ॥

अध्यासनिवृत्तीची सीमा सांगितली. ॥ २८६ ॥

**प्रतीतिर्जीवजगतोः स्वप्नवद्भाति यावता ।**
**तावन्निरन्तरं विद्वन् स्वाध्यासापनयं कुरु ॥२८७॥**

प्रतीतिः । जीवजगतोः । स्वप्नवत् । भाति । यावता ॥
तावत् । निरन्तरं । विद्वन् । इ० ॥ २८७ ॥

**अर्थः**—( ज्यास आत्मतत्त्व कळलें आहे अशा ) १ विद्वान् शिष्या, २ जोंपर्यंत जीव ३ आणि जगत् ह्यांचा ४ स्वप्नाप्रमाणें ( तुला ) ५ प्रत्यय ६ भासूं लागेल, ७ तोंपर्यंत ८ निरंतर इ० ॥ २८७ ॥

अध्यासनिवृत्तीचाच अवधि सांगितला. ॥ २८७ ॥

**निद्राया लोकवार्तायाः शब्दादेरपि विस्मृतेः ।**
**क्वचिन्नावसरं दत्वा चिन्तयात्मानमात्मनि ॥२८८॥**

निद्रायाः । लोकवार्तायाः । शब्दादेः । अपि । विस्मृतेः ॥
क्वचित् । न । अवसरं । दत्वा । चिन्तय । आत्मानं । आत्मनि २८८

**अर्थः**—( समाधीला विरोध करणाऱ्या तामसी ) १ निद्रावृत्तीला, ( देशांतरांतील कोणा पुरुषाच्या कुशलाकुशल प्रश्नरूप चित्ताला विक्षेप करणाऱ्या ) २ लोकवार्तेला, ( अनुकूल प्रतिकूलरूप भेदबुद्धि उत्पन्न करणाऱ्या ) ३ शब्दादि ( विषयांना ), ४ आणि ५ स्वात्मस्मृतीला विरोध करणाऱ्या वृत्तीला ६ केव्हां हि ७ अवकाश ८ न ९ देतां १० आपल्या चित्तांत ( सर्वव्यापक प्रत्यगभिन्न ) ११ आत्म्याचें १२ ध्यान कर. ॥ २८८ ॥

सावधानपणानें अध्यास दूर कसा करावा तें सांगितलें. ॥ २८८ ॥

**मातापित्रोर्मलोद्भूतं मलमांसमयं वपुः ।**
**त्यक्त्वा चाण्डालवद्दूरं ब्रह्मीभूय कृती भव ॥२८९॥**

मातापित्रोः । मलोद्भूतं । मलमांसमयं । वपुः ॥ त्यक्त्वा ।
चाण्डालवत् । दूरं । ब्रह्मीभूय । कृती । भव ॥ २८९ ॥

**अर्थः**—१ आईबापांच्या ( स्पर्श करण्याला अयोग्य अशा शुक्र-शोणितरूप ) २ मलापासून उत्पन्न झालेल्या ( आणि ) ३ मलमांसांनीं

भरलेल्या ४ शरीराला ( अपवित्र ) ५ चांडालाप्रमाणें ६ दूर ७ सोडून-तें अनात्मा आहे असें समजून त्यावरील आत्मत्व टाकून-( ब्रह्मनिष्ठेनें ) ८ ब्रह्मरूप होऊन ९ कृतार्थ १० हो. ॥ २८९ ॥

देहतादात्म्य सुटण्याकरितां देहाची अमंगलता व अनात्मता सांगितली आहे. २८९

**घटाकाशं महाकाश इवात्मानं परात्मनि ।**
**विलाप्याखण्डभावेन तूष्णीं भव सदा मुने ॥ २९० ॥**

घटाकाशं[2] । महाकाशे[3] । इव[4] । आत्मानं[5] । परात्मनि[6] ॥
विलाप्य[8] । अखण्डभावेन[7] । तूष्णीं[10] । भव[11] । सदा[9] । मुने[1] । २९० ।

अर्थः-( हे मननिपुण ) १ शिष्य २ घटाकाश-घागरींतील पोकळी ३ महाकाशांत-व्यापक पोकळींत-( घटोपाधि त्यागानें ८ लय पावतें ), ४ तद्वत् ( निरुपाधि शुद्ध चिन्मात्र ) ५ जीवात्म्याचा ( तत्पदलक्ष्य अद्वयानंद ) ६ ब्रह्मस्वरूपांत ( भेद करणाऱ्या उपाधित्यागानें प्राप्त झालेल्या ) ७ असंग निर्भेद स्वरूपाच्या योगानें ८ लय करून ९ सर्वकाळ १० स्तब्ध ११ रहा भेद करणारे कुतर्क सोडून सुखी हो. ॥ २९० ॥

नैयायिकांनीं मानिलेल्या जीवब्रह्मांच्या भेदाचें दृष्टांतपूर्वक निरसन केलें आहे. ॥ २९० ॥

**स्वप्रकाशमधिष्ठानं स्वयंभूय सदात्मना ।**
**ब्रह्माण्डमपि पिण्डाण्डं त्यज्यतां मलभाण्डवत् २९१.**

स्वप्रकाशं[2] । अधिष्ठानं[3] । स्वयंभूय[4] । सदात्मना[1] । ब्रह्माण्डं[5] ।
अपि[6] । पिण्डाण्डं[7] । त्यज्यतां[9] । मलभाण्डवत्[8] ॥ २९१ ॥

अर्थः-१ सत्यभूत ब्रह्मस्वरूपाच्या योगानें अन्य २ प्रकाशाची अपेक्षा नसणारा ( व कल्पित नामरूपाच्या आरोपाला ) ३ आश्रयभूत ( असा ) ४ स्वतः होऊन ५ ब्रह्मांडाला-समष्टीला-६ आणि ७ शरीराला-व्यष्टीला-८ मलानें भरलेल्या भांड्याप्रमाणें ९ टाकून दे. त्यांच्या ठायीं असलेली आत्मबुद्धि सोड. ॥ २९१ ॥

पिंड व ब्रह्मांड हीं दोन्ही अनात्मा असल्यामुळें निंद्य व हेय आहेत ॥ २९१ ॥

**चिदात्मनि सदानन्दे देहारूढामहंधियम् ।**
**निवेश्य लिङ्गमुत्सृज्य केवलो भव सर्वदा ॥२९२॥**

चिदात्मनि । सदानन्दे । देहारूढां । अहंधियम् ॥ निवेश्य । लिङ्गं । उत्सृज्य । केवलः । भव । सर्वदा ॥ २९२ ॥

**अर्थः**–( अनेक जन्मांपासून ) १ स्थूल शरीरावर असलेली २ आत्मबुद्धि ३ नित्यानंदैकरस ४ चिद्रूप प्रत्यगात्म्याच्या ठायीं-सच्चिदानंदस्वरूपीं-५ ठेवून ( व ) ६ लिंगदेहाचा ( अभिमान ) ७ सोडून ८ सर्वकाळ-सर्व अवस्थांच्या ठायीं-९ अद्वैतात्मस्वरूप १० हो. ॥ २९२ ॥

देहबुद्धित्यागाचें फल सांगितलें. ॥ २९२ ॥

**यत्रैष जगदाभासो दर्पणान्तः पुरं यथा ।**
**तद्ब्रह्माहमिति ज्ञात्वा कृतकृत्यो भविष्यसि ।२९३।**

यत्र । एषः । जगदाभासः । दर्पणान्तः । पुरं । यथा ॥ तद् । ब्रह्म । अहं । इति । ज्ञात्वा । कृतकृत्यः । भविष्यसि ॥ २९३॥

**अर्थः**–१ ज्याप्रमाणें २ आरशांत ( प्रतिबिंबित ) ३ नगर ( दिसतें, त्या प्रमाणें ) जेथें-४ ज्या ब्रह्माच्या ठायीं ५ हा प्रत्यक्ष दिसणारा-६ प्रातिभासिक जगद्विलास आहे, ७ तें-जगत्कल्पनेचें अधिष्ठान-८ ब्रह्म ९ मी ( आहें ) १० असें साक्षात् ११ जाणून ( तूं ) १२ कृतकृत्य १३ होसील-तुला कांहीं हि कर्तव्य राहणार नाहीं. ॥ २९३ ॥

अद्वैतज्ञानाचें फल कृतार्थता आहे हें सांगितलें ॥ २९३ ॥

**यत्सत्यभूतं निजरूपमाद्यं चिदद्वयानन्दमरूपमक्रियम् । तदेत्य मिथ्यावपुरुत्सृजेत * शैलूषवद्वेषमुपात्तमात्मनः ॥ २९४ ॥**

---

* " मिथ्यावपुरुत्सृजेत " ह्याबद्दल " मिथ्यावपुरुत्सृजेच्च " असाहि पाठ आहे. अर्थ तोच आहे. परस्मैपदरूप असून चकार पादपूरणार्थ आहे.

यत् । सत्यभूतं । निजरूपं । आद्यं । चिदद्वयानंदं । अरूपं । अक्रियम् ॥ तद् । एत्य । मिथ्यावपुः । उत्सृजेत । शैलूषवत् । वेषं । उपात्तं । आत्मनः । ॥ २९४ ॥

अर्थः—१ जें ( ब्रह्म ) २ त्रिकालाबाध्य, ( सर्वांचे ) ३ आदि-पुरातन-४ ज्ञानस्वरूप, द्वैतवर्जित ( व ) सुखरूप, ५ रूपरसादि गुण वार्जित ( आणि ) ६ क्रियाशून्य ( आहे ) ७ त्या आपल्या ८ स्वरूपाप्रत ९ प्राप्त होऊन १० आपलें ११ घेतलेलें ( लीलोपयोगी ) १२ सोंग १३ ज्याप्रमाणें नट ( टाकितो त्याप्रमाणें ह्या ) १४ कल्पित शरीरावरील अभिमान १५ सोडून द्यावा ॥ २९४ ॥

कृतार्थ होण्याचाच प्रकार दृष्टांतपूर्वक सांगितला. ॥ २९४ ॥

**सर्वात्मना दृश्यमिदं मृषैव नैवाहमर्थः**
**क्षणिकत्वदर्शनात् । जानाम्यहं सर्वमिति प्रतीतिः**
**कुतोऽहमादेःक्षणिकस्य सिध्येत् ॥ २९५ ॥**

सर्वात्मना । दृश्यं । इदं । मृषा । एव । न । एव । अहं । अर्थः । क्षणिकत्वदर्शनात् । जानामि । अहं । सर्वं । इति । प्रतीतिः । कुतः । अहमादेः । क्षणिकस्य । सिध्येत् ॥ २९५ ॥

अर्थः—१ हें २ दृश्य सर्वजड-३ निःशेष ४ मिथ्या ५ च ( आहे ). ६ क्षणिक असल्यामुळें * ७ अंतःकरणहि ८ परमार्थ वस्तु ९ नाहीं १० च. ११ मी १२ सर्व १३ जाणतों १४ असा १५ अनुभव ( सुषुप्त्यादिकांत नसणाऱ्या विस्मरणशील ) १६ क्षणिक १७ अहंकारादिकांला १८ कोठून १९ सिद्ध होईल ? ॥ २९५ ॥

---

* " अहमर्थः " असें एक पद करून त्याचा " दृश्यं " ह्या पदाशीं विधेयार्थी संबंधजोडून " हें दृश्य मिथ्याच आहे; क्षणिक असल्यामुळें तें ' मी ' याचा जो वास्तविक अर्थ ह्मणजे " आत्मा " तो होऊं शकत नाहीं " असाहि अर्थ कोठें केलेला आहे.

देहाभिमान सुटल्यावर अहंकाराभिमानहि विचारानें सुटेल कारण अहंकार, क्षणिक असल्यामुळें, त्याच्या ठिकाणीं सर्वज्ञता संभवत नाहीं, ह्मणून तोहि दृश्य व हेयच आहे. ॥ २९५ ॥

अहंपदार्थस्त्वहमादिसाक्षी नित्यं सुषुप्तावपि भावदर्शनात् । ब्रूते ह्यजो नित्य इति श्रुतिः स्वयं तत्प्रत्यगात्मा सदसद्विलक्षणः ॥ २९६ ॥

अहंपदार्थः । तु । अहमादिसाक्षी । नित्यं । सुषुप्तौ । अपि । भावदर्शनात् ॥ ब्रूते । हि । अजः । नित्यः । इति । श्रुतिः । स्वयं । तत् । प्रत्यगात्मा । सदसद्विलक्षणः ॥ २९६ ॥

अर्थः-( मी सर्व जाणतों या वाक्यांत ) मी १ शब्दाचा अर्थ ( अहंकार नाहीं, ) २ तर ३ अहंकारादिकांचा साक्षी ( चिदात्मा असा आहे ). कारण ४ गाढझोंपेमध्यें देखील ( साक्षी ) ६ नेहमीं ७ असतोच. ( नाहीं तर मला गाढ झोंप लागली हें कोणाच्या अनुभवास आलें असतें? ) ८ ज्या अर्थी ( आत्मा ) ९ अज-न जन्मणारा-१० नित्य ( आहे ) ११ असें १२ श्रुति १३ साक्षात् १४ सांगत आहे, १५ त्या अर्थी १६ अंतरात्मा १७ स्थूल व सूक्ष्म शरीरांहून वेगळा ( आहे ).२९६

स्थूल सूक्ष्म शरीरांहून विलक्षण जो अंतरात्मा तोच सर्व जाणणरा असून अहंकारादिकांचा साक्षी आहे. ॥ २९६ ॥

विकारिणां सर्वविकारवेत्ता नित्याविकारो भवितुं समर्हति । मनोरथस्वप्नसुषुप्तिषु स्फुटं पुनः पुनर्दृष्टमसत्त्वमेतयोः ॥ २९७ ॥

विकारिणां । सर्वविकारवेत्ता । नित्याविकारः । भवितुं । समर्हति ॥ मनोरथस्वप्नसुषुप्तिषु । स्फुटं । पुनः । पुनः । दृष्टं । असत्त्वं । एतयोः ॥ २९७ ॥

अर्थः—( हा आत्मा स्थूल सूक्ष्मादि ) १ विकारी पदार्थांच्या ( स्थूलता, सूक्ष्मता इत्यादि ) २ सर्व विकारांना जाणणारा ( आहे म्हणून ) ३ नित्य व अविकारी ४ होण्यास ५ योग्य आहे. ६ या दोहोंचा-स्थूल सूक्ष्म शरीरांचा-७ मनोराज्यांत, स्वप्नांत आणि सुषुप्तींत ८ वारं ९ वार १० स्पष्टपणें-सर्वांच्या प्रत्ययानें-११ अभाव १२ पाहण्यांत येतो. हीं नसून ह्यांचा साक्षी आत्मा तिन्ही अवस्थांमध्यें विद्यमान असतो. ॥ २९७ ॥

अवस्थात्रयाचा साक्षी आत्मा नित्य व निर्विकार आहे. ॥२९७॥

**अतोभिमानं त्यज मांसपिण्डे पिण्डाभिमानिन्य पिबुद्धिकल्पिते । कालत्रयाबाध्यमखण्डबोधं ज्ञात्वा स्वमात्मानमुपैहि शान्तिम् ॥ २९८ ॥**

अतः । अभिमानं । त्यज । मांसपिण्डे । पिण्डाभिमानिनि । अपि । बुद्धिकल्पिते ॥ कालत्रयाबाध्यं । अखण्डबोधं । ज्ञात्वा । स्वं । आत्मानं । उपैहि । शान्तिम् ॥ २९८ ॥

अर्थः—( देह, अहंकार वगैरे अनात्मा आहेत ) १ म्हणून ( भ्रांत ) बुद्धीला २ गोचर होणाऱ्या ( ह्या ) ३ मांसप्रधान स्थूल देहाचा ( व ) स्थूल देहाचा अभिमान बाळगणाऱ्या ( अहंकाराचा ) ५ सुद्धा ६ अभिमान ७ टाकून दे, ( आणि ) ८ कालत्रयीं नाश न पावणाऱ्या ९ अखंड ज्ञानरूप १० आपल्या ११ आत्म्याला १२ साक्षात् जाणून ( विषयाशारूप अग्नीपासून ) १३ निवृत्तीला १४ प्राप्त हो ॥ २९८ ॥

देहाहंकारांचा अभिमान सोडल्यानें शांति प्राप्त होते. ॥ २९८ ॥

**त्यजाभिमानं कुलगोत्रनामरूपाश्रमेष्वार्द्रशवाश्रितेषु । लिङ्गस्य धर्मानपि कर्तृतादींस्त्य व । भवाखण्डसुखस्वरूपः ॥ २९९ ॥**

त्यज । अभिमानं । कुलगोत्रनामरूपाश्रमेषु । आर्द्रशवाश्रितेषु ॥ लिङ्गस्य । धर्मान् । अपि । कर्तृतादीन् । त्यक्त्वा । भव । अखण्डसुखस्वरूपः ॥ २९९ ॥

**अर्थः**– ( देहाभिमान सुटला म्हणजे ) १ ओल्या प्रेता ( सारख्या ह्या देहाच्या ) आश्रयानें राहणारे ( जे ) २ कुल, गोत्र, नाम, रूप. आश्रम ( त्यांच्या ठिकाणीं असलेला ) ३ अभिमान ४ सोडून दे. ( त्या प्रमाणेंच ) ५ लिंग देहाचे ६ कर्तृत्वादि ७ धर्म ८ देखील ९ टाकून १० नित्यानंदात्मा ११ हो- तसा आहेसच, पण आहें हें जाण ॥२९९॥

देहाभिमान सुटला असतां वर्णाश्रमादिकांचा अभिमान सहजच सुटेल.॥ २९९ ॥

* सन्त्यन्येप्रतिबन्धाः पुंसः संसारहेतवो दृष्टाः ।
* तेषामेवं मूलं प्रथमविकारो भवत्यहङ्कारः ॥३००॥

सन्ति । अन्ये । प्रतिबन्धाः । पुंसः । संसारहेतवः । दृष्टाः ।
तेषां । एवं । मूलं । प्रथमविकारः । भवति । अहंकारः ॥ ३००॥

**अर्थ**–( मोक्षेच्छु ) १ पुरुषाला ( जन्मादि ) २ संसारप्राप्तीला हेतूभूत ३ इतर ४ प्रतिबंध ५ पाहण्यांत आलेले ६ आहेत. ( परंतु ) ७ त्या ( सर्वांचं ) ८ वर सांगितल्याप्रमाणं ९ मूळ ( म्हणजे म्हणजे अज्ञानकार्य ) १० मुख्य विकार ११ अहंकार ( हें ) १२ आहे. ॥ ३०० ॥

प्रथमविकार जो अहंकार तोच सर्व अध्यासांचें आदिकारण आहे. ॥ ३०० ॥

यावत्स्यात्स्वस्य सम्बन्धोऽहंकारेण दुरात्मना ।
तावन्न लेशमात्रापि मुक्तिवार्ता विलक्षणा ॥३०१॥

यावत् । स्यात् । स्वस्य । सम्बन्धः । अहंकारेण । दुरात्मना ॥
तावत् । न । लेशमात्रा । अपि । मुक्तिवार्ता । विलक्षणा ३०१

**अर्थः**–१ जोंपर्यंत ( दुर्जनाप्रमाणें सन्मार्गाला प्रतिबंध करणाऱ्या ) २ दुष्ट ३ अहंकाराबरोबर ४ आपला-जीवाचा-५ संबंध ६ असेल, ७ तोंपर्यंत ८ अलौकिक ( अशी जी ) ९ मोक्षाची गोष्ट ( ती ) १० लेशमात्र ११ सुद्धां ( काढावयास ) १२ नको. ॥ ३०१ ॥

---

* " सन्त्वन्ये " असाहि पाठ आहे. " सन्तु " म्हणजे " असोत. "

* " तेषामेकं " या पाठांत " एकं मूलं " म्हणजे " एकच मूळ " असा अर्थ करावा.

अहंकार आहे तोंपर्यंत मोक्ष होणार नाहीं. ॥ ३०१ ॥

**अहंकारग्रहान्मुक्तः स्वरूपमुपपद्यते**
**चन्द्रवद्विमलः पूर्णः सदानन्दः स्वयंप्रभः ॥ ३०२ ॥**

अहंकारग्रहात् । मुक्तः । स्वरूपं । उपपद्यते ॥ चन्द्रवत् । विमलः । पूर्णः । सदानन्दः । स्वयंप्रभः ॥ ३०२ ॥

अर्थः–( चंद्राला जसा राहू आच्छादित करितो त्या प्रमाणें स्वरूपाला आच्छादित करणाऱ्या ) १ अहंकाररूप ग्रहापासून ( जो पुरुष ) २ सुटला, ( तो राहूपासून मुक्त झालेल्या-ग्रहण सुटलेल्या- ) ३ चंद्राप्रमाणें ( अभिमानरूप ) ४ मलरहित, ५ परिच्छिन्न-बुद्धिविरहित, ६ दुःखाध्या-सशून्य, ( आणि ) ७ स्वप्रकाश ( असा होऊन ) ८ आपल्या स्वरूपभूत ( मुक्तिधामाप्रत ) ९ प्राप्त होतो. ॥ ३०२ ॥

अहंकारत्यागानें निर्विघ्नपणें मोक्ष होतो हें दृष्टांतपूर्वक निवेदन केलें आहे.।३०२।

**यो वा पुरे सोऽहमिति प्रतीतो बुद्ध्या प्रक्लृप्तस्तम-**
**सातिमूढया । तस्यैव निःशेषतया विनाशे**
**ब्रह्मात्मभावः प्रतिबन्धशून्यः ॥ ३०३ ॥**

यः । वा । पुरे । सः । अहं । इति । प्रतीतः । बुद्ध्या । प्रक्लृप्तः । तमसा । अतिमूढया ॥ तस्य । एव । निःशेषतया । विनाशे । ब्रह्मात्मभावः । प्रतिबन्धशून्यः ॥ ३०३ ॥

अर्थः—१ तसेंच २ जो ( अहंकार ) ३ तमोगुणानें ४ अतिशय व्यापिलेल्या ५ अहंबुद्धीपासून ६ उत्पन्न झालेला असतो ७ ता ८ देहा-दिसंघातांत ९ मी ( स्थूल आहें, पंडित आहें ) १० अशा ११ प्रत्ययानें प्रकट असतो. १२ त्या ( अभिमानरूप अहंकाराचा ) १३ च १४ समूळ १५ नाश केला असतां १६ शुद्धाद्वैत-चैतन्याशीं तादात्म्य, १७ कोणत्याहि प्रकारचा अडथळा न येतां, ( होईल ). ॥ ३०३ ॥

अहंकाराचा नाश झाल्यावर आत्मबोध होण्यास कोणत्याहि प्रकारचा प्रत्यवाय नसतो. ॥ ३०३ ॥

ब्रह्मानन्दनिधिर्महाबलवताऽहङ्कारघोराहिन।
संवेष्ट्यात्मनि रक्ष्यते गुणमयैश्चण्डैस्त्रिभिर्मस्तकैः ।
विज्ञानाख्यमहासिना श्रुतिमता विच्छिद्य शीर्षत्रयं
निर्मूल्याहिमिमं निधिं सुखकरं धीरोऽनुभोक्तुं क्षमः ३०४

ब्रह्मानन्दनिधिः । महाबलवता । अहंकारघोराहिना । संवेष्ट्य । आत्मनि । रक्ष्यते । गुणमयैः । चण्डैः । त्रिभिः । मस्तकैः ॥ विज्ञानाख्यमहासिना । श्रुतिमता । विच्छिद्य । शीर्षत्रयं । निर्मूल्य । अहिं । इमं । निधिं । सुखकरं । धीरः । अनु । भोक्तुं । क्षमः ॥ ३०४ ॥

अर्थः-( प्रबल विवेकावांचून नाश न पावणारा ) १ अतिबलवान् २ अहंकाररूप भयंकर सर्प ३ ब्रह्मानंदरूप निधीला-धनाला-४ सत्त्वगुण, रजोगुण आणि तमोगुण यांचे परिणाम ह्याच ५ प्रचंड ६ तीन ७ फडा त्यांनीं ८ वेष्टून तें धन बाहेरकाढण्याचें द्वार अडवून-९ स्वतांकरितां ( त्याचें ) १० रक्षण करित आहे. ११ बुद्धिमान् पुरुष १२ वैदिक ( अशा ) १३ विज्ञान नांवाच्या मोठ्या तरवारीनें ( त्या त्रिगुणरूप ) १४ तीन फडांचा १५ नाश करून १६ ह्या ( अहंकाररूप ) १७ सर्पाचें १८ निर्मूलन करून १९ नंतर २० सुख देणाऱ्या ( ब्रह्मानंदरूप ) २१ धनाचा २२ उपभोग घेण्यास समर्थ ( होतो ) ॥ ३०४ ॥

अहंकाराचें सर्परूपानें वर्णन करून विवेकविज्ञानरूप खड्गानें त्याचा नाश केला असतां ब्रह्मानंदरूप धन भोगावयास सांपडतें विवेकानें अहंकाराचा समूल नाश झाल्या शिवाय ब्रह्मानंद प्राप्त व्हावयाचा नाहीं. ॥ ३०४ ॥

यावद्वा यत्किञ्चिद्विषदोषस्फूर्तिरस्ति चेद्देहे ।
कथमारोग्याय भवेत्तद्वदहन्तापि योगिनो मुक्त्यै ३०५

यावत् । वा । यत्किञ्चित् । विषदोषस्फूर्तिः । अस्ति । चेत् । देहे ॥ कथं । आरोग्याय । भवेत् । तद्वत् । अहन्ता । अपि । योगिनः । मुक्त्यै ॥ ३०५ ॥

अर्थः—१ अथवा २ जोंपर्यंत ३ लेशमात्र हि ४ विषदोषाचा संचार ५ शरीरांत ६ जर ७ असेल, (तर तोंपर्यंत पुरुष) ८ रोग-निवृत्तिपूर्वक स्वास्थ्य मिळविण्यास ९ कसा (समर्थ) १० होईल? ११ त्याप्रमाणेंच १२ आत्मचिंतन करणाऱ्या मुमुक्षूला १३ देखील (जोंपर्यंत) १४ अहंता (स्फुरत आहे तोंपर्यंत) १५ मुक्ति मिळविण्यास (सामर्थ्य कोठून येईल?) ॥ ३०५ ॥

सर्प विषद्वारा घात करणारा आहे, म्हणून ह्या गीतींत अहंकाराचें विषरूपानें वर्णन करून तो समूळ नाहींसा झाल्याशिवाय मोक्ष नाहीं हें सांगितलें. ॥ ३०५ ॥

**अहमोऽत्यन्तनिवृत्त्या तत्कृतनानाविकल्पसंहृत्या ।**
**प्रत्यक्तत्त्वविवेकादिदमहमस्मीति विन्दते तत्त्वम् ३०६**

अहमः । अत्यन्तनिवृत्या । तत्कृतनानाविकल्पसंहृत्या ॥ प्रत्यक्तत्त्वविवेकात् । इदं । अहं । अस्मि । इति । विन्दते । तत्त्वम् ॥ ३०६ ॥

अर्थः—१ साक्षी आत्मा (देहादिकांहून भिन्न आहे अशा) विवेकानें २ अहंकाराची ३ समूल निवृत्ति झाली असतां ४ त्या (अहंकारापासून) उत्पन्न झालेले अनेक संशयविपर्यय निवृत्त होऊन ५ हें-अखंडानंद ब्रह्म-६ मी ७ आहें ८ अशा (संशयविपर्ययरहित) ९ परमार्थस्वरूपाची १० प्राप्ती होते. ॥ ३०६ ॥

अहंकार निवृत्त झाला असतां प्राप्त होणारें फळ सांगितलें आहे. ॥ ३०६ ॥

**अहङ्कारे कर्तर्यहमिति मतिं मुञ्च सहसा**
**विकारात्मन्यात्मप्रतिफलजुषि स्वस्थितिमुषि ।**
**यदध्यासात्प्राप्ता जनिमृतिजराद्धःखबहुला**
**प्रतीचश्चिन्मूर्तेस्तव सुखतनोः संसृतिरियम् ।३०७।**

अहङ्कारे । कर्तरि । अहं । इति । मतिं । मुञ्च । सहसा । विकारात्मनि । आत्मप्रतिफलजुषि । स्वस्थितिमुषि । यदध्यासात् ।

प्राप्ता । जनिमृतिजरादुःखबहुला । प्रतीचः । चिन्मूर्तेः । तव । सुखतनोः । संसृतिः । इयम् ॥ ३०७ ॥

अर्थः—( हे शिष्य ) १ शुद्ध चैतन्याचें प्रतिबिंब धारण करणाऱ्या ( आणि ह्मणूनच ) २ कर्तृत्वसमर्थ अशा ( व कर्तृत्वामुळेंच ) ३ विकाराला पावलेल्या ( आणि ) ४ स्वरूप स्थितीला झांकणाऱ्या ५ अहंकाराच्या ठिकाणीं ( असलेली ) ६ मी ७ अशी ८ बुद्धि-तादात्म्याध्यास-९ एकदम १० सोडून दे. ११ त्या ( अहंकाराच्या ) तादात्म्याध्यासामुळें १२ चैतन्यस्वरूप, १३ आनंदस्वरूप ( आणि ) १४ साक्षी अंतरात्मा ( असा जो तूं त्या ) १५ तुला १६ हा १७ जन्ममरण जरादिदुःखांनीं भरलेला १८ संसार १९ प्राप्त झाला आहे. ॥ ३०७ ॥

अहंकाराच्या अध्यासामुळें होणारे अनर्थ दाखवून तो सोडण्याविषयीं शिष्यास उपदेश केला आहे- ॥ ३०७ ॥

**सदैकरूपस्य चिदात्मनो विभोरानन्दमूर्तेरनवद्यकीर्तेः । नैवान्यथा क्वाप्यविकारिणस्ते विनाहमध्यासममुष्य संसृतिः ॥ ३०८ ॥**

सदा । एकरूपस्य । चिदात्मनः । विभोः । आनन्दमूर्तेः । अनवद्यकीर्तेः ॥ न । एव । अन्यथा । क्व । अपि । अविकारिणः । ते । विना । अहमध्यासं । अमुष्य । संसृतिः । ३०८।

अर्थः—( हे शिष्य ) १ सर्वकाळ २ एकरस ३ चैतन्यस्वरूप, ४ व्यापक, ५ सुखस्वरूप, ( आणि ह्मणूनच ) ६ निर्दोष ( व ) ७ विकार रहित ( अशा ) ८ तुला ९ ह्या ( अहंकाराच्या ) १० तादात्म्याध्यासा ११ शिवाय १२ दुसऱ्या कोणत्याहि प्रकारानें १३ कोठें १४ हि १५ संसार ( संभवत ) १६ नाहीं १७ च ॥ ३० ॥

अहंकार नसेल तर संसारदुःखपरंपरा हि नाहींच ॥ ३०८ ॥

**तस्मादहङ्कारमिमं स्वशत्रुं भोक्तुर्गले कण्टकवत्प्रतीतम् । विच्छिद्य विज्ञानमहासिना स्फुटं**

भुंक्ष्वात्मसाम्राज्यसुखं यथेष्टम् ॥ ३०९ ॥

तस्मात् । अहङ्कारं । इमं । स्वशत्रुं । भोक्तुः । गले । कण्टकवत् । प्रतीतम् ॥ विच्छिद्य । विज्ञानमहासिना । स्फुटं । भुङ्क्ष्व । आत्मसाम्राज्यं । यथेष्टम् ॥ ३०९ ॥

अर्थः—( अहंकार महादुःख देणारा आहे ) १ म्हणून २ जेवणाराच्या ३ घशांत ( अडकलेल्या ) ४ कांट्याप्रमाणें ( महा अनर्थकारक असा ) ५ प्रत्ययास येणारा ( जो ) ६ हा ७ अहंकाररूप ८ आपला शत्रु ( त्याचा ) ९ विज्ञानरूप मोठ्या तरवारीनें १० नाश करून ११ निरंकुश निरातिशय मोक्षानंदाचा १२ यथेष्ट १३ उघडपणें १४ अनुभव घे. ॥ ३०९ ॥

विलंब न लावितां अहंकाराचा नाश करून आत्मसाम्राज्यसुख कसें भोगावें हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. घशांत अडकलेला कांटा काढण्यास विलंब केला, तर कदाचित् मृत्युहि येईल, म्हणून तो काढण्याचा जसा शीघ्र उपाय करावा लागतो, तद्वत् अहंकाराचा हि शीघ्र नाश झाला पाहिजे. ॥ ३०९ ॥

ततोऽहमादेर्विनिवर्त्य वृत्तिं संत्यक्तरागः परमार्थलाभात् । तूष्णीं समास्स्वात्मसुखानुभूत्या पूर्णात्मना ब्रह्मणि निर्विकल्पः ॥ ३१० ॥

ततः । अहमादेः । विनिवर्त्य । वृत्तिं । संत्यक्तरागः । परमार्थलाभात् ॥ तूष्णीं । समास्स्व । आत्मसुखानुभूत्या । पूर्णात्मना । ब्रह्मणि । निर्विकल्पः ॥ ३१० ॥

अर्थः—( अहंकारनिवृत्ति व आत्मसाम्राज्य प्राप्ति झाल्या ) १ नंतर २ अहंकारादिकांच्या—अहंता व ममता ह्यांच्या—३ प्रवाहाचा ४ नाश करून ५ चैतन्य-स्वरूपाच्या लाभामुळें-प्रकट होण्यानें-( सर्व पदार्थांच्या ठायीं ) ६ विरक्त होऊन-कशाचीहि इच्छा न करून-७ आत्मसुखाच्या अनुभवानें ( मायामय अशा ) ८ संकल्प विकल्पांना टाकून ९ परमा-

त्याच्या ठिकाणीं १० तृप्तरूप होऊन ११ स्वस्थ १२ वस-दृढ निष्ठा प्राप्त करून घे ॥ ३१० ॥

अहंकारनिवृत्ति व आत्मप्राप्ति झाल्यावर कांहीं कर्तव्य रहात नाहीं हें सांगितलें. ३१०

**समूलकृत्तोऽपि महानहं पुनर्व्युल्लेखितः स्याद्यदि चेतसा क्षणम् । संजीव्य विक्षेपशतं करोति नभस्वता प्रावृषि वारिदो यथा ॥ ३११ ॥**

**समूलकृत्तः[3] । अपि[4] । महान्[1] । अहं[2] । पुनः[8] । व्युल्लेखितः[9] । स्यात्[10] । यदि[7] । चेतसा[5] । क्षणम्[6] ॥ संजीव्य[11] । विक्षेपशतं[16] । करोति[17] । नभस्वता[13] । प्रावृषि[15] । वारिदः[14] । यथा[12] ॥ ३११ ॥**

**अर्थः**—( हा ) १ जबरदस्त २ अहंकार ३ समूळ कापून काढिला, ४ तथापि ( अनात्म पदार्थांच्या प्रवाहाच्या संमुख असून भूत व भावी पदार्थांचें चिंतन करणाऱ्या ) ५ चित्ताकडून ६ क्षणमात्र ७ जर ८ पुनः ( मी मोठा राजा होतों, श्रीमान् होतों, आतां विरक्त झालों इत्यादि प्रकारचें त्याचें ) ९ स्मरण १० होईल, तर तो त्याच क्षणीं ) ११ जिवंत होऊन-पुनः उदयास येऊन-१२ ज्याप्रमाणें १३ वाऱ्यानें ( उठविलेला ) १४ मेघ १५ पावसाळ्यांत ( घरांचीं छपरें, भिंति वगैरे पाडणें, इत्यादि शेंकडों १६ विक्षेप १७ करितो, तद्वत् समाधी पासून उत्थान, वैराग्या विषयीं शिथिलता, अमानित्वादि साधनांचा भंग इत्यादि ) १६ शेंकडों विक्षेप १७ करितो. ॥ ३११ ॥

विवेक विज्ञानानें अहंकाराचा समूळ नाश झाला असूनहि जर तो लेशमात्र देखील प्रत्ययास येईल तर त्याचा पुनः उदय होऊन तो अनर्थ परंपरेला कारण होईल हें सांगितलें ॥ ३११ ॥

**निगृह्य शत्रोरहमोऽवकाशः क्वचिन्न देयो विषयानुचिन्तया । स एव संजीवनहेतुरस्य प्रक्षीणजम्बीरतरोरिवाम्बु ॥ ३१२ ॥**

निगृह्य । शत्रोः । अहंमः । अवकाशः । क्वचित् । न । देयः । विषयानुचिन्तया ॥ सः । एव । संजीवनहेतुः । अस्य । प्रक्षीणजम्बीरतरोः । इवं । अम्बु ॥ ३१२ ॥

**अर्थ**—( अहंकाराचा ) १ नाश केल्यावर ( ह्या ) २ अहंकाररूप ३ शत्रूला ४ विषयांच्या चिंतनानें ५ कोठेंहि ६ सवड ७ देऊं ८ नये-९ सुकलेल्या इड लिंबाच्या वृक्षाला १० ज्याप्रमाणें ११ पाणी ( जिवंत १५ करण्याला हेतु आहे त्याप्रमाणें ) १२ ती-विषय-चिंतनाला दिलेली सवड-१३ च १४ ह्या ( अहंकाराला ) १५ जिवंत करण्यासहेतु आहे.।३१२।

अहंकार नष्ट झाला असतांहि पुनः उदयास कसा येतो हें दृष्टांतपूर्वक सांगितलें३१२

देहात्मना संस्थित एव कामी विलक्षणः
कामयिता कथं स्यात् । अतोऽर्थसन्धानपर-
त्वमेव भेदप्रसक्त्या भवबन्धहेतुः ॥ ३१३ ॥

देहात्मना । संस्थितः । एव । कामी । विलक्षणः । कामयिता । कथं । स्यात् ॥ अतः । अर्थसन्धानपरत्वं । एव । भेदप्रसक्त्या । भवबन्धहेतुः ॥ ३१३ ॥

**अर्थः**—१ देहाच्या ठिकाणीं तादात्म्य करून २ राहिलेला ( पुरुष ) ३ मात्र ( सर्व विषयांची ) ४ इच्छा करणारा ( असतो. त्याहून ) ५ विलक्षण-देहाभिमानशून्य पुरुष-विषयांची ६ इच्छा करणारा ७ कसा ८ होईल? ९ यास्तव ( अनेक अनर्थांना हेतुभूत जी ) १० पदार्थांच्या चिंतनाविषयीं तत्परता ( ती ) ११ च ( आपणास देहरूप मानून ) १२ भेद-उत्पन्न केल्यामुळें ( जन्ममरणपरंपरारूप ) १३ संसारबंधनाचें कारण आहे. ॥ ३१३ ॥

देहाभिमानानेंच विषयवासनांचा उदय होऊन संसार प्राप्त होतो. देहाभिमानशून्य पुरुषाला विषय वासना होणारच नाहीं. म्हणून अहंकाराचेंच निर्मूलन झालें पाहिजे. ।३१३।

कार्यप्रवर्धनाद्बीजप्रवृद्धिः परिदृश्यते । कार्यना-
शाद्बीजनाशस्तस्मात्कार्यं निरोधयेत् ॥ ३१४ ॥

कार्यप्रवर्धनात् । बीजप्रवृद्धिः । परिदृश्यते ॥ कार्यनाशात् । बीजनाशः । तस्मात् । कार्यं । निरोधयेत् ॥ ३१४ ॥

**अर्थः**–( कामकर्मादिरूप ) १ कार्याची वृद्धि झाली असतां ( विषयवासनादिरूप ) २ बीजाची वृद्धि होते ( असें अज्ञजनांत, व वनस्पतींतहि रोपा वाढला असतां बीज वृद्धि होते हें ) ३ पाहण्यांत येतें. ( कामकर्मादि ) ४ कार्याचा नाश झाला असतां ( विषयवासनादिरूप ) ५ बीजाचा नाश होतो. ६ ह्मणून ( कामकर्मादि ) ७ कार्याचा ८ निरोध-सर्वथा त्याग-करावा. ॥ ३१४ ॥

अहंकाराच्या त्यागा बरोबरच पदार्थ चिंतन सुटलें पाहिजे नाहीं पेक्षां तें अनर्थाला हेतु होईल हें दृष्टांतपूर्वक सांगितलें आहे. ॥ ३१४ ॥

**वासनावृद्धितः कार्यं कार्यवृद्ध्या च वासना ।**
**वर्धते सर्वथा पुंसः संसारो न निवर्तते ॥ ३१५ ॥**

वासनावृद्धितः । कार्यं । कार्यवृद्ध्या । च । वासना ॥ वर्धते । सर्वथा । पुंसः । संसारः । न । १० विनिवर्तते ॥ ३१५ ॥

**अर्थः**–( पदार्थ चिंतनरूप बाह्य ) १ वासना वाढल्यानें ( कामकर्मादिरूप ) २ कार्य ३ वाढतें, ४ आणि ५ कार्य वाढल्यानें ६ वासना ( ३ वाढते. अशा रीतीनें ) ७ पुरुषाचा ( जन्मादिप्रवाहरूप ) ८ संसार ९ कोणत्याहि प्रकारें १० निवृत्त होत ११ नाहीं. ॥ ३१५ ॥

वासनांमुळें विषय चिंतन व विषयचिंतानानें वासना असा क्रम चालू असल्यामुळें संसारानिवृत्ति होणें फार दुरापास्त आहे. ॥ ३१५ ॥

**संसारबन्धविच्छित्त्यै तद्द्वयं प्रदहेद्यतिः ॥**
**वासनावृद्धिरेताभ्यां चिन्तया क्रियया बहिः। ३१६।**

संसारबन्धविच्छित्त्यै । तद् । द्वयं । प्रदहेत् । यतिः ॥ वासनावृद्धिः । एताभ्यां । चिन्तया । क्रियया । बहिः ॥ ३१६ ॥

अर्थः–( मोक्षसाधनाविषयीं ) १ यत्नशील पुरुषानें २ संसाररूप बंधनाच्या नाशासाठीं ३ त्या ४ दोन गोष्टी कामकर्मादि व विषयचिंतन-५ जाळून टाकाव्या-त्यांच्या निवृत्त्यर्थ दृढ प्रयत्न करावा.( कारण ) ६ बाह्य ( पदार्थांचें ) ७ चिंतन ( व सकामकर्मरूप बाह्य ) ८ क्रिया ( या ) ९ दोहोंच्या योगानें ( अनर्थमूलक ) १० वासना वाढते. ३१६

मोक्षप्राप्त्यर्थ सकाम कर्म आणि वासना ह्यांचा नाश झाला पाहिजे. ॥ ३१६ ॥

ताभ्यां प्रवर्धमाना सा सूते संसृतिमात्मनः ।
त्रयाणां च क्षयोपायः सर्वावस्थासु सर्वदा॥३१७॥
सर्वत्र सर्वतः * सर्वब्रह्ममात्रावलोकनैः ।
सद्भाववासनादार्ढ्यात्तत्त्रयं लयमश्नुते ॥ ३१८ ॥

ताभ्यां । प्रवर्धमाना । सा । सूते । संसृतिं । आत्मनः ॥ त्रयाणां । च । क्षयोपायः । सर्वावस्थासु । सर्वदा ॥ ३१७ ॥

सर्वत्र । सर्वतः । सर्वब्रह्ममात्रावलोकनैः ॥ सद्भाववासनादार्ढ्यात् । तत् । त्रयं । लयं । अश्नुते ॥ ३१८ ॥

अर्थः—१ त्या दोहोंच्या-सकामकर्म व विषयचिंतनयांच्या-योगानें २ वाढणारी ३ ती-वासना-४ स्वतांच्या ( जन्मजरादिदुःखपरंपरारूप ) ५ संसाराला ६ उत्पन्न करिते. ७ आणि ( सकामकर्म, विषयचिंतन व विषयवासना ह्या ) ८ तिहींच्या ९ नाशाचा उपाय ( असा आहेः संपत्ति, विपत्ति इत्यादि ) १० सर्वप्रकारच्या स्थितींत, ११ सर्वकाळ, १२ सर्व-ठिकाणीं ( व ) १३ सर्वउपायांनीं १४ सर्वाला केवळ ब्रह्मरूपाहून १५ सद्रूप ब्रह्माची भावना दृढ झाल्यानें १६ त्या १७ तीन गोष्टी १८ नाश १९ पावतात. ॥ ३१७ ॥ ३१८ ॥

वासनावृद्धीपासून होणारे अनर्थ सांगून सकामकर्म, विषयचिंतन आणि विषय-वासना ह्यांचा नाश कसा करावा तें सांगितलें. ॥ ३१७ ॥ ३१८ ॥

---

* " सर्व " असें निराळें पद तीन प्रतींत आढळतें. परंतु व्याकरणाच्या दृष्टीनें पाहिलें असतां " सर्वं " हा पाठच बरोबर दिसतो.

**क्रियानाशे भवेच्चिन्तानाशोऽस्माद्वासनाक्षयः ।**
**वासनाप्रक्षयो मोक्षः सा जीवन्मुक्तिरिष्यते ।३१९।**

क्रियानाशे । भवेत् । चिन्तानाशः । अस्मात् । वासनाक्षयः ॥ वासनाप्रक्षयः । मोक्षः । सा । जीवन्मुक्तिः । इष्यते ॥ ३१९ ॥

**अर्थः**–( सकाम ) १ कर्मांचा अभाव झाल्यानें ( विषयांच्या ) २ चिंतनाचा नाश ३ होतो. ४ ह्यापासून-विषयचिंतनाच्या अभावीं-५ वासनेचा क्षय होतो, ( आणि ) ६ वासनेचा अत्यंत नाश-उदय न होणें-( तो ) ७ मोक्ष ( होय, व ) ८ तीच ९ जीवन्मुक्ति ( आहे असें मुनींनीं ) १० मानिलें आहे. ॥ ३१९ ॥

वासनाक्षयालाच जीवन्मुक्ति ह्मटलें आहे. ॥ ३१९ ॥

**सद्वासनास्फूर्तिविजृम्भणे सत्यसौ विलीनाप्यह-**
**मादिवासना । अतिप्रकृष्टाप्यरुणप्रभायां**
**विलीयते साधु यथा तमिस्रा ॥ ३२० ॥**

सद्वासनास्फूर्तिविजृंभणे । सति । असौ । विलीना । अपि । अहमादिवासना ॥ अतिप्रकृष्टा । अपि । अरुणप्रभायां । विलीयते । साधु । यथा । तमिस्रा ॥ ३२० ॥

**अर्थः**–१ ज्याप्रमाणें २ अंधकार ३ अतिगाढ ( असला ) ४ तरी ( तो प्रातःकाळीं ) ५ अरुणाचा उदय झाला ह्मणजे त्याच्या प्रकाशांत ६ साफ ७ लयास जातो, ( त्याप्रमाणें ) ८ ब्रह्मभावनेच्या विशेष स्फूर्तीचा उदय ९ झाला असतां १० ही ( देहादिकांच्या ठिकाणीं असलेली ) ११ अहंकारादिवासना १२ देखील १३ लीन होते. ॥ ३२० ॥

अहंकारादि वासना कशी लीन होते हें सांगितलें. ॥ ३२० ॥

**तमस्तमः कार्यमनर्थजालं न दृश्यते सत्यु-**
**दिते दिनेशे । तथाद्वयानन्दरसानुभूतौ**

**नैवास्ति बन्धो न च दुःखगन्धः ॥ ३२१ ॥**

तमः । तमःकार्यं । अनर्थजालं । न । दृश्यते । सति । उदिते । दिनेशे ॥ तथा । अद्वयानन्दरसानुभूतौ । न । एव । अस्ति । बन्धः । न । च । दुःखगन्धः ॥ ३२१ ॥

**अर्थः**–( ज्याप्रमाणें ) १ दिवसाचा स्वामी-सूर्य-२ उगवला ३ असतां ४ अंधकार ( आणि ) ५ अंधकाराचें कार्य-खाड्यांत पडणें वगैरे-( जें ) ६ दुःखदुर्दशा देणारें आहे, ( तें कांहींहि ) ७दिसत ८ नाहीं, ९ त्याप्रमाणें १० अद्वैतानंद-रसाचा अनुभव झाला असतां ( अहंकारादि ) ११ बंध १२ असत १३ च १४ नाहीं, १५ आणि १६ दुःखलेश ( हि ) १७ नसतो. ३२१

ब्रह्मात्मैक्याचा अपरोक्ष बोध झाला असतां अहंकारादि बंध राहतच नाहीं हें दृष्टांत पूर्वक सांगितलें. ॥ ३२१ ॥

**दृश्यं प्रतीतं प्रविलापयन् सन् सन्मात्रमानन्दघनं विभावयन् । समाहितः सन् बहिरन्तरं वा कालं नयेथाः सति कर्मबन्धे ॥ ३२२ ॥**

दृश्यं । प्रतीतं । प्रविलापयन् । सन् । सन्मात्रं । आनन्द-घनं । विभावयन् ॥ समाहितः । सन् । बहिः * । अन्तरं । वा । कालं । नयेथाः । सति । कर्मबंधे ॥ ३२२ ॥

**अर्थः**—१ बाहेरील-ईशकल्पित-२ किंवा ३ आंतील-जीवकल्पित-( जें जें ) ४ दृश्य ५ भासतें ( त्याच्या ) ६ अभावाचें चिंतन करीत ७ होत्साता, ८ आनंदघन ( आणि ) ९ अविनाशी ( आत्मस्वरूपाची ) १० भावना करून ( व कुसंग प्राप्त झाला असतां ) ११ सावधान १२ होऊन १३ प्रारब्धकर्म अवशिष्ट १४ असतां ( जीवन्मुक्त स्थितीनें ) १५ काळ १६ घालीव. ॥ ३२२ ॥

बाकी राहिलेलें आयुष्य जीवनमुक्तस्थितींत कसें घालवावें तो प्रकार सांगितला ३२२

---

* “ बहिरन्तरं ” ह्याचा अन्वय “ समाहिता ” या पदाबरोबर करून त्याचा अर्थ “ आंत बाहेर ” असा हि केलेला आढळतो.

**प्रमादो ब्रह्मनिष्ठायां न कर्तव्यः कदाचन ।**
**प्रमादो मृत्युरित्याह भगवान् ब्रह्मणः सुतः ।३२३।**

प्रमादः । ब्रह्मनिष्ठायां । न । कर्तव्यः । कदाचन । प्रमादः । मृत्युः । इति । आह । भगवान् । ब्रह्मणः । सुतः ॥ ३२३ ॥

**अर्थः**-( हें सर्व दृश्य ब्रह्मच आहे अशा प्रकारची जी ) १ ब्रह्मनिष्ठा तिजविषयीं २ कधींहि ३ गाफिलपणा ४ करूं ५ नये-गैरसावध राहूं नये- ६ गाफिलपणा ( हा ) ७ मृत्यु ( आहे ) ८ असें ९ ब्रह्मदेवाचा १० पुत्र ११ भगवान् ( सनत्सुजात ह्यामुनीनें ) १२ म्हटलें आहे. ॥ ३२३ ॥

ब्रह्मनिष्ठेविषयीं कधींहि आळस करूं नये. ॥ ३२३ ॥

**न प्रमादादनर्थोऽन्यो ज्ञानिनः स्वस्वरूपतः । ततो मोहस्ततोऽहंधीस्ततो बन्धस्ततो व्यथा ॥ ३२४॥**

न । प्रमादात् । अनर्थः । अन्यः । ज्ञानिनः । स्वस्वरूपतः । ततः । मोहः । ततः । अहंधीः । ततः । बन्धः । ततः । व्यथा । ३२४।

**अर्थः**-१ ब्रह्मनिष्ठाला २ स्वात्मचिंतना विषयीं ३ आळस करणें ह्याहून ४ दुसरी ५ दुर्दशा ६ नाहीं-हीच मोठी दुर्दशा आहे-( कारण ) ७ त्या ( आत्मचिंतनाविषयींच्या आळसा पासून ) ८ अविवेक ( होतो ), ९ त्या ( अविवेकापासून देहादि अनात्म्याच्याठायीं ) १० अहंबुद्धि ( होते ), ११ त्या ( अहंबुद्धि पासून जन्मादि संसाररूप ) १२ बंध ( होतो, आणि ) १३ त्यापासून ( द्वैतभय व ) १४ दुःख ( हीं प्राप्त होतात. ) ॥ ३२४ ॥

आत्मचिंतनाविषयीं आळस केल्यानें अनर्थ कसा होतो हें सांगितलें ॥ ३२४ ॥

**विषयाभिमुखं दृष्ट्वा विद्वांसमपि विस्मृतिः । विक्षेपयति धीदोषैर्योषा जारमिव प्रियम् ॥ ३२५ ॥**

विषयाभिमुखं । दृष्ट्वा । विद्वांसं । अपि । विस्मृतिः ॥ विक्षेपयति । धीदोषैः । योषा । जारं । इव । प्रियम् ॥ ३२५॥

अर्थः—१ ज्याप्रमाणें २ स्त्री ( ७ विषयलंपट अशा आपल्या ) ३ आवडत्या ४ जाराला-उपपतीला-१० ( काम चिंतनादि दोषांच्या योगानें ११ क्लेश देते, तद्वत् ) ५ ब्रह्मवेत्याला ६ हि ७ विषयाकारवृत्ति झालेला ८ पाहून ( प्रमाद नांवाची स्वस्वरूपाची ) ९ विस्मृति ( अहंकारकामादि ) १० बुद्धिविकारांच्या योगानें ११ विक्षेप करिते. ॥ ३२५ ॥

स्वरूपानुसंधानाविषयीं प्रमाद ज्ञान्याला सुद्धां क्लेश देतो हें दृष्टांत पूर्वक सांगितलें३२५

**यथाऽपकृष्टं शैवालं क्षणमात्रं न तिष्ठति ।**
**आवृणोति तथा माया प्राज्ञं वापि पराङ्मुखम् ३२६**

यथा । अपकृष्टं । शैवालं । क्षणमात्रं । न । तिष्ठति ॥ आवृणोति । तथा । माया । प्राज्ञं । वा । अपि । पराङ्मुखम् ३२६

अर्थः—१ ज्याप्रमाणें २ शेवाळ ( हातानें वगैरे ) ३ एकीकडे केली असतां ४ क्षणभर देखील ( अन्यत्र ) ५ रहात ६ नाहीं, ( तर पुनः ठिकाणावर येऊन पाण्यास १२ झांकिते ). ७ त्याप्रमाणें ८ अविद्या ९ ब्रह्मवेत्त्याला १० हि ( तो ) ११ आत्मविमुख ( झाला असतां ) १२ आच्छादित करिते १३ च. ॥ ३२६ ॥

अविद्या नष्ट झाली असें मानूनच आत्मानुसंधानाविषयीं प्रमाद करणें बरोबर नाहीं हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. ॥ ३२६ ॥

**लक्ष्यच्युतं चेद्यदि चित्तमीषद्बहिर्मुखं सन्निपते-**
**त्ततस्ततः । प्रमादतः प्रच्युतकेलिकन्दुकः**
**सोपानपङ्क्तौ पतितो यथा तथा ॥ ३२७ ॥**

लक्ष्यच्युतं । चेद् । यदि । चित्तं । ईषत् । बहिर्मुखं । सन्निपतेत् । ततः । ततः ॥ प्रमादतः । प्रच्युतकेलिकन्दुकः । सोपानपङ्क्तौ । पतितः । यथा । तथा ॥ ३२७ ॥

अर्थः—१ ज्याप्रमाणें २ गैरसावधपणामुळें ( हातांतून ) सुटून गेलेला ३ खेळण्याचा चेंडू ४ जिन्याच्या पायऱ्यांवर ५ पडलेला ६ तेथून

( खालीं जाऊन पुनः ) ७ तेथून ( आणखी खालच्या पायऱ्यांवर ) ८ पडतो ( आणि पुनः वर येत नाहीं ), ९ तद्वत् १० चित्त ११ थोडेंहि १२ ब्रह्मापासून दूर होऊन १३ जर १४ कोणत्यावेळीं १५ बहिर्मुख ( होईल, तर रूपापासून रसावर, रसापासून स्पर्शावर असें तें ६ खालीं ७ खालीं ८ घसरत जाईल, व वर यावयाचें नाहीं ). ॥ ३२७ ॥

लक्ष्य जें ब्रह्म त्याच्या ठायीं चित्त राहिलें नाहीं, तर अनर्थपरंपरा कशी प्राप्त होते हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. ॥ ३२७ ॥

**विषयेष्वाविशच्चेतः संकल्पयाति तद्गुणान् ।**
**सम्यक्संकल्पनात्कामः कामात्पुंसः प्रवर्तनम् ।३२८।**

विषयेषु । आविशत् । चेतः । संकल्पयति । तद्गुणान् ॥ सम्यक्संकल्पनात् । कामः । कामात् । पुंसः । प्रवर्तनम् ।३२८।

अर्थः—१ अंतःकरण ( शब्दादि ) २ विषयांच्या ठायीं ( श्रोत्रादिइंद्रियद्वारा ) ३ प्रवेश करून ४ त्यांच्या-विषयांच्या- ( सुंदरतादि ) गुणांचें ५ चिंतन करितें. पुनः ६ पुनः संकल्प-चिंतन-केल्यामुळें ( त्या त्या पदार्थांविषयीं ) ७ अभिलाष ( उत्पन्न होतो. आणि ) ८ अभिलाषाच्या योगानें ( ते पदार्थ संपादन करण्याविषयीं ) ९ पुरुषाचे ( एकसारखे ) १० प्रयत्नचालूअसतात, ( व त्यामुळें त्यास सुख कधींच प्राप्त होत नाहीं. ।३२८।

चित्त अधोगतीला कसें प्राप्त होतें तें सांगितलें ॥ ३२८ ॥

**अतः प्रमादान्न परोऽस्ति मृत्युर्विवेकिनो ब्रह्मविदः समाधौ । समाहितः सिद्धिमुपैति सम्यक् समाहितात्मा भव सावधानः ॥ ३२९ ॥**

अतः । प्रमादात् । न । परः । अस्ति । मृत्युः । विवेकिनः । ब्रह्मविदः । समाधौ ॥ * समाहितः । सिद्धिं । उपैति ।

* " समाधौ प्रमादात् " असा अन्वय करून " समाधीविषयीं जो प्रमाद त्याहून " असाहि अर्थ कोठें केलेला आहे.

सम्यक् । समाहितात्मा । भव । सावधानः ॥ ३२९ ॥

अर्थः–( प्रमाद संसाररूप अनर्थांना हेतु आहे ) १ म्हणून २ विवेककरणाऱ्या ३ ब्रह्मवेत्त्याला ४ प्रमादाहून-आत्मविमुखतेहून-५ दुसरा ६ नाश करणारा ७ असत ८ नाहीं. ९ ब्रह्मनिष्ठेच्या ठायीं १० एकाग्रचित्त ( झालेल्या पुरुषास ) ११ उत्तम १२ जीवन्मुक्तिसुखानुभव १३ प्राप्त होतो. ( यासाठीं हे शिष्य, ) १४ आळसाला जिंकून १५ एकाग्रचित्त १६ हो. ॥ ३२९ ॥

प्रमादापासून अनर्थ होतात, व चित्ताच्या एकाग्रते पासून जीवन्मुक्तिसुख प्राप्त होतें. ॥ ३२९ ॥

ततः स्वरूपविभ्रंशो विभ्रष्टस्तु पतत्यधः । पतितस्य विना नाशं पुनर्नारोह ईक्ष्यते ॥ ३३० ॥

ततः । स्वरूपविभ्रंशः । विभ्रष्टः । तु । पतति । अधः ॥ पतितस्य । विना । नाशं । पुनः । न । आरोहः । ईक्ष्यते ३३०

अर्थः–( स्वरूपनिष्ठेविषयीं प्रमाद करून ब्रह्मवेत्ता विषयांच्या ठिकाणीं प्रवृत्त झाला असतां ) त्या प्रमादापासून गुरु व शास्त्र यांच्या उपदेशानें प्राप्त झालेल्या त्याच्या ) २ आत्मज्ञानाची हानि ( होते ),३ आणि ( स्वरूपापासून ) ४ भ्रष्ट झालेला ( पुरुष ) ( नरकादि ) ५ नीच ( योनींत ) ६ पडतो. ( कुसंगतीनें निरंतर दुर्दशा भोगणाऱ्या ) ७ पतिताला ८ नाशा ९ शिवाय १० पुनः ११ वर येणें-पुनः आत्मनिष्ठा प्राप्त होणें-१२ पाहण्यांत आलेलें १३ नाहीं. ॥ ३३० ॥

स्वरूपनिष्ठेविषयीं प्रमादकेल्यामुळें पतन पावलेल्या पुरुषाला पुनः स्वरूपनिष्ठा प्राप्त होत नाहीं. ॥ ३३० ॥

संकल्पं वर्जयेत्तस्मात्सर्वानर्थस्य कारणम् ।
जीवतो यस्य कैवल्यं विदेहे च स केवलः ॥३३१॥
यत्किञ्चित्पश्यतो भेदं भयं ब्रूते यजुःश्रुतिः ॥

संकल्पं । वर्जयेत् । तस्मात् । सर्वानर्थस्य । कारणम् ॥
जीवतः । यस्य । कैवल्यं । विदेहे । सः । च । केवलः ३३१
यत्किञ्चित् । पश्यतः । भेदं । भयं । ब्रूते । यजुः श्रुतिः ॥

अर्थः—( आत्मनाश होऊं नये व स्वात्मसुख प्रकट व्हावें ) १ म्हणून सर्व २ दुःखांना ३ कारण ( जो ) ४ संकल्प ( तो ) ५ सोडून द्यावा. ६ ज्याला ७ जिवंत असतांच ८ मोक्ष प्राप्त होतो. ९ तो १० च ११ देहत्यागानंतरहि १२ कैवल्यभागी ( होतो जीव ब्रह्मांचा ) १३ अल्पमात्रदेखील १४ भेद १५ पाहणाऱ्या ( पुरुषाला जन्ममरणादि ) १६ भय ( आहे असें ) १७ यजुर्वेदांतील श्रुति १८ ह्मणते. ॥ ३३१ ॥

मोक्षेच्छूनें संकल्पाचा त्याग करून जीवन्मुक्ति भोगावी. ॥ ३३१ ॥

**यदा कदा वापि विपश्चिदेष ब्रह्मण्यनन्तेप्यणु-**
**मात्रभेदम् । पश्यत्यथामुष्य भयं तदैव**
**यद्वीक्षितं भिन्नतया प्रमादात् ॥ ३३२ ॥**

यदा । कदा । वा । अपि । विपश्चित् । एषः । ब्रह्मणि ।
अनन्ते । अपि । अणुमात्रभेदम् ॥ पश्यति । अथ । अमुष्य ।
भयं । तद् । एव । यद् । वीक्षितं । भिन्नतया । प्रमादात् ३३२

अर्थः—१ हा २ विद्वान् ३ जर ४ केव्हां ५ तरी ६ देखील ७ भेदरहित ( अशा ) ८ परमात्मस्वरूपाच्या ठिकाणीं ९ अल्पमात्र भेद-वेगळेपणा-१० सुद्धां ११ पाहील, १२ तर १३ त्यावेळीं १४ च १५ त्याला १६ जें ( वस्तूला ) १७ प्रमादानें ( आपल्याहून ) १८ वेगळेपणानें १९ पाहणें ( तेंच ) २० भय ( आहे ). ॥ ३३२ ॥

यजुर्वेदांतील श्रुतीचा अर्थ स्पष्ट केला आहे. ॥ ३३२ ॥

**श्रुतिस्मृतिन्यायशतैर्निषिद्धे दृश्येऽत्र यः स्वात्म-**
**मतिं करोति । उपैति दुःखोपरि दुःखजातं**
**निषिद्धकर्ता स मलिम्लुचो यथा ॥ ३३३ ॥**

श्रुतिस्मृतिन्यायशतैः । निषिद्धे । दृश्ये । अत्र । यः । स्वात्ममतिं । करोति ॥ उपैति । दुःखोपरि । दुःखजातं । निषिद्धकर्ता । सः । मलिम्लुचः । यथा ॥ ३३३ ॥

**अर्थः**—१ जो ( पुरुष ) २ श्रुति, स्मृति, अनुमान इत्यादि शेंकडों प्रमाणांनीं ) ३ मिथ्या ठरविलेल्या ४ ह्या ( जडप्रपंचरूप ) ५ दृश्याच्या ठायीं ( हें मी आहें व माझें आहे अशी ) ६ आत्मबुद्धि ७ करितो ८ तो ( वेदांनीं ) ९ निषिद्ध केलेल्या ( मांसभक्षणादिकर्मांचें ) आचरण करणाऱ्या १० चोरा ११ प्रमाणें १२ दुःखामागून १३ एकसारखीं दुःखेंच पावत असतो ॥ ३३३ ॥

दृश्याच्या ठायीं आत्मबुद्धि करणाराला दुःखपरंपरा प्राप्त होते. ॥ ३३३ ॥

**सत्याभिसन्धानरतो विमुक्तो महत्वमात्मीयमुपैति नित्यम् । मिथ्याभिसन्धानरतस्तु नश्येद् दृष्टं तदेतद्यदचौरचौरयोः ॥ ३३४ ॥**

सत्याभिसन्धानरतः । विमुक्तः । महत्वं । आत्मीयं । उपैति । नित्यम् ॥ मिथ्याभिसन्धानरतः । तु । नश्येत् । दृष्टं । तत् । एतत् । यद् । अचौरचौरयोः ॥ ३३४ ॥

**अर्थः**—१ अद्वैत ब्रह्माच्याठायीं आत्मनिष्ठेनें राहणाऱ्या ( व आरोपितबंधभ्रांतीपासून ) २ मुक्त असलेल्या ( पुरुषास ) ३ आपलें ४ नित्यविद्यमान असून आरोपितत्वामुळें झांकलेलें—( ब्रह्मनिष्ठत्वरूप ) ५ महत्व ६ प्राप्त होतें; ७ आणि ८ मिथ्याभूत ( देहादिसंघाताच्या ठायीं ) आत्मत्वकरून तत्पर झालेला ( मूर्ख ) ९ नाश पावतो-मोक्षरूपपुरुषार्थाला आंचवून दुःख भोगणारा होतो-१० कारण ११ ही १२ तशी गोष्ट १३ साव आणि चोर यांच्यांत पाहण्यांत येते-सावाला चोरम्हटलें असतांहि तो राजद्वारीं दिव्य करून निर्दोष ठरून आपलें महत्त्व पावतो, व चोर मी साव आहें असें म्हणाला, तरी तो चोर ठरून दुःख पांवतो ॥ ३३४ ॥

आत्मनिष्ठ महत्त्व पावतो व अनात्म्याच्याठायीं आत्मबुद्धि करणारा दुःख पावतो हेंच श्रुतींतील साव व चोर यांच्या दृष्टांतानें स्पष्ट केलें आहे. ( तापलेलें लोखंड हातांत देऊन दिव्य करण्याची चाल पूर्वी होती. जो निर्दोष असे त्याचा हात भाजत नसे ).३३४

**यतिरसदनुसन्धिं बन्धहेतुं विहाय स्वयम-**
**यमहमस्मीत्यात्मदृष्ट्यैव तिष्ठेत् । सुखयति**
**ननु निष्ठा ब्रह्मणि स्वानुभूत्या हरति परमविद्या-**
**कार्यदुःखं प्रतीतम् ॥ ३३५ ॥**

यतिः । असदनुसन्धिं । बन्धहेतुं । विहाय । स्वयं । अयं । अहं । अस्मि । इति । आत्मदृष्ट्या । एव । तिष्ठेत् ॥ सुखयति । ननु । निष्ठा । ब्रह्मणि । स्वानुभूत्या । हरति । परं । अविद्याकार्यदुःखं । प्रतीतम् ॥ ३३५ ॥

**अर्थः**--( चित्ताचें यमन करणाऱ्या ) १ संन्याशानें ( जन्मादि ) २ बंधाला कारणीभूत ( जें देहादि ) ३ मिथ्या पदार्थांचें आत्मत्वानें स्मरण ( त्याला ) ४ सोडून ५ हा-अविनाशी प्रत्यगात्मा-६ स्वतः ७ मी ८ आहें ९ अशा १० स्वरूपदृष्टीनें ११ च १२ रहावें, ( व क्षणमात्रहि अनात्मबुद्धि होऊं देऊं नये ). १३ परमात्मस्वरूपाच्या ठायीं १४ स्वतांच्या अभेदबुद्धीनें ( उत्पन्न झालेली ) १५ ब्रह्मनिष्ठा-सर्वकाळ स्वात्मत्वीं तत्परता-१६ खरोखर १७ सुख देणारी आहे, ( व प्रतिकूल बुद्धीनें ) १८ भासणारें ( १९, अविद्येसह ) अविद्येचें कार्य ( जें त्रिविध ) दुःख ( त्याचा ) २० निःशेष २१ परिहार करिते. ॥ ३३५ ॥

ब्रह्मनिष्ठेनें समूल दुःखाचा नाश होऊन सुख प्राप्त होतें. म्हणून संन्याशानें सर्वकाळ आत्मदृष्टि असावें. ॥ ३३५ ॥

**बाह्यानुसन्धिः परिवर्धयेत्फलं दुर्वासनामेव तत-**
**स्ततोऽधिकाम् । ज्ञात्वा विवेकैः परिहृत्य बाह्यं**
**स्वात्मानुसन्धिं विदधीत नित्यम् ॥ ३३६ ॥**

बाह्यानुसन्धिः[1] । परिवर्धयेत्[8] । फलं[7] । दुर्वासनां[5] । एव[6] । ततः[2] । ततः[3] । अधिकाम्[4] ॥ ज्ञात्वा[10] । विवेकैः[9] । परिहृत्य[12] । बाह्यं[11] । स्वात्मानुसन्धिं[14] । विदधीत[15] । नित्यम्[13] ॥ ३३६ ॥

अर्थः— १ बाह्य विषयांचा संकल्प ( बाह्यविषयांसंबंधी ) २-३ उत्तरोत्तर ४ अधिक ५ दुष्टवासनारूप ६ च ७ फळाला ८ वाढवील-त्यापासून उत्तरोत्तर अधिकच दुःख प्राप्त होईल-( यास्तव ) ९ विवेकाच्या योगानें ( आत्मा सद्रूप आहे व अनात्म पदार्थ असद्रूप आहेत असें ) १० जाणून ( व ) ११ विषयानुसंधान १२ टाकून १३ सर्वकाळ १४ आत्मचिंतनच १५ करावें. ॥ ३३६ ॥

विषयचिंतनानें दुष्टवासना अधिक वाढून दुःखच प्राप्त होतें, ह्मणून सर्वदा आत्मचिंतनच करीत असावें. ॥ ३३६ ॥

**बाह्ये निरुद्धे मनसः प्रसन्नता मनःप्रसादे पर-**
**मात्मदर्शनम् । तस्मिन् सुदृष्टे भवबन्धनाशो**
**बहिर्निरोधः पदवी विमुक्तेः ॥ ३३७ ॥**

बाह्ये[1] । निरुद्धे[2] । मनसः[3] । प्रसन्नता[4] । मनःप्रसादे[5] । परमात्मदर्शनम्[6] ॥ तस्मिन्[7] । सुदृष्टे[8] । भवबन्धनाशः[9] । बहिर्निरोधः[10] । पदवी[12] । विमुक्तेः[11] ॥ ३३७ ॥

अर्थः—१ विषयांचें ( चिंतन मनानें ) २ टाकिलें असतां ( विक्षेपनिवृत्ति होऊन ) ३ मनाला ४ स्वस्थता ( प्राप्त होते ). ५ मन स्वस्थ झालें असतां ६ ब्रह्मात्मैक्यसाक्षात्कार ( होतो ). ७ तो ( साक्षात्कार ) ८ उत्तम झाला असतां ९ संसारबंधनाचा नाश-मोक्ष-( होतो. याप्रमाणें ) १० बाह्य संकल्पाचा त्याग ( हा ) ११ मोक्षाचा १२ मार्ग-उपाय-( आहे ) ॥ ३३७ ॥

बाह्यनिरोध हें मुक्तीचें साधन आहे. ॥ ३३७ ॥

**कः पण्डितः सन् सदसद्विवेकी श्रुतिप्रमाणः**

परमार्थदर्शी । जानन् हि कुर्यादसतोऽवलम्बं स्वपातहेतोः शिशुवन्मुमुक्षुः ॥ ३३८ ॥

कः[6] । पण्डितः[4] । सन्[5] । सदसद्विवेकी[1] । श्रुतिप्रमाणः[2] । परमार्थदर्शी[3] ॥ जानन्[8] । हि[9] । कुर्यात्[14] । असतः[12] । अवलम्बं[13] । स्वपातहेतोः[11] । शिशुवत्[10] । मुमुक्षुः[7] ॥ ३३८ ॥

अर्थः—१ सत्य व असत्य यांचा विवेक करण्यांत निपुण, २ वेदान्ताला जाणणारा, ३ ब्रह्मवेत्ता ( व ) ४ अतिसूक्ष्मार्थ जाणण्यांत कुशल ( असा ) ५ असून ६ कोणता ७ मोक्षेच्छु ( पुरुष बाह्य विषय अनर्थकारक आहेत असें ) ८ जाणत असून ९ हि १० मुलाप्रमाणें अविवेकी पुरुषाप्रमाणें ११ आपल्या अधोगतीला हेतूभूत ( अशा बाह्य ) १२ मिथ्या ( विषयांचें ) १३ अवलंबन १४ करील ? ॥ ३३८ ॥

ब्रह्मवेत्ता असून बाह्य प्रवृत्ति वाढवील हें संभवनीय नाहीं. ॥ ३३८ ॥

देहादिसंसक्तिमतो न मुक्तिर्मुक्तस्य देहाद्यभिमत्यभावः । सुप्तस्य नो जागरणं न जाग्रतः स्वप्नस्तयोर्भिन्नगुणाश्रयत्वात् ॥ ३३९ ॥

देहादिसंसक्तिमतः[1] । न[3] । मुक्तिः[2] । मुक्तस्य[4] । देहाद्यभिमत्यभावः[5] ॥ सुप्तस्य[6] । नो[8] । जागरणं[7] । न[11] । जाग्रतः[9] । स्वप्नः[10] । तयोः[12] । भिन्नगुणाश्रयत्वात्[13] ॥ ३३९ ॥

अर्थः—१ देहादि ( संघाताच्या ठिकाणीं ) आसक्ति-अभिमान-असलेल्या ( पुरुषाला ) २ मोक्ष ( होत ) ३ नाहीं, ( आणि ) ४ मुक्त ( पुरुषाच्या ठायीं ) ५ देहादिकांच्या अभिमानाची निवृत्ति ( असते ). ६ झोपीं गेलेल्या ( पुरुषाला ) ७ जागृति ८ नसते, ( आणि ) ९ जागा असलेल्या ( पुरुषाला ) १० झोंप ११ नसते. ( कारण ) १२ त्या दोहोंचे हि १३ परस्परविरुद्ध असे धर्म आहेत-देहादिकांचा अभिमान

द्वैतगोचर आहे, व मोक्ष अद्वैतरूप आहे; तसेंच झोंप अज्ञानावृत आहे व जागृति बोधयुक्त आहे. ॥ ३३९ ॥

देहादिकांचा अभिमान व मोक्ष हे परस्परविरुद्ध आहेत हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. ३३९

**अन्तर्बहिः स्वं स्थिरजङ्गमेषु ज्ञात्वात्मनाधारतया विलोक्य । त्यक्ताखिलोपाधिरखण्डरूपः पूर्णात्मना यः स्थित एष मुक्तः ॥ ३४० ॥**

**अन्तः । बहिः । स्वं । स्थिरजङ्गमेषु । ज्ञात्वा । आत्मना । आधारतया । विलोक्य ॥ त्यक्ताखिलोपाधिः । अखण्डरूपः । पूर्णात्मना । यः । स्थितः । एषः । मुक्तः ॥ ३४० ॥**

**अर्थः**—१ जो ( पुरुष ) २ स्थावर जंगमांच्या ठायीं ३ आंत ४ बाहेर ( सर्वत्र ) ५ आश्रयरूपानें ६ आपण ( आहों असें ) ७ शुद्धमनानें ( सामान्यत्वानें ) ८ जाणून ( व विशेषत्वानें ) ९ अवलोकन करून ( विवेकदृष्टीनें ) १० सर्व उपाधींचा त्याग करून ११ अविनाशस्वरूप ( होतसाता ) १२ परिच्छेदरहित चेतनरूपानें १३ राहतो, १४ तो १५ मुक्त ( होय ). ॥ ३४० ॥

मुक्त कोणाला ह्मणावें तें सांगितलें. ॥ ३४० ॥

*** सर्वात्मना बन्धविमुक्तिहेतुः सर्वात्मभावान्न परोऽस्ति कश्चित् । दृश्याग्रहे सत्युपपद्यतेऽसौ सर्वात्मभावोऽस्य सदात्मनिष्ठया ॥ ३४१ ॥**

**सर्वात्मना । बन्धविमुक्तिहेतुः । सर्वात्मभावात् । न । परः । अस्ति । कश्चित् ॥ दृश्याग्रहे । सति । उपपद्यते । असौ ।**

---

* " सर्वात्मता " असाहि पाठ एका प्रतींत आहे. " सर्वात्मता " ह्मणजे " सर्वत्र आत्मभाव असणें " हा बंधापासून मुक्त होण्याचा उपाय आहे. सर्वात्मभावाशिवाय दुसरा कोणता उपाय नाहीं असा अर्थ करावा.

सर्वात्मभावः । अस्य । सदा । * आत्मनिष्ठया ॥ ३४१ ॥

अर्थः—१ सर्व प्रकारांनीं २ बंधनांतून साफ मोकळें होण्याला उपाय ३ सर्व आपलेंच स्वरूप आहे ( असा निश्चय करणें ) ह्यावांचून ४ दुसरा कोणताहि ६ असत ७ नाहीं. ८ हा ९ सर्वात्मतेचा निश्चय १० ह्या ( मुमुक्षूला ) ११ निरंतर १२ स्वरूपनिष्ठेनें १३ बाह्य संकल्पांचा उदय न १४ होऊन १५ प्राप्त होतो. ॥ ३४१ ॥

सर्वत्र आत्मदृष्टि असल्यानें संकल्पांचा उदय न होऊन यथार्थ मोक्ष प्राप्ति होते. ३४१

दृश्यस्याग्रहणं कथं नु घटते देहात्मना तिष्ठतो
बाह्यार्थानुभवप्रसक्तमनसस्तत्तत्क्रियाः कुर्वतः ॥
संन्यस्ताखिलधर्मकर्मविषयैर्नित्यात्मनिष्ठापरैस्तत्त्वज्ञैः
करणीयमात्मनि सदानन्देच्छुभिर्यत्नतः ॥ ३४२ ॥

दृश्यस्य । अग्रहणं । कथं । नु । घटते । देहात्मना । तिष्ठतः । बाह्यार्थानुभवप्रसक्तमनसः । तत्तत्क्रियाः । कुर्वतः ॥ संन्यस्ताखिलधर्मकर्मविषयैः । नित्यात्मनिष्ठापरैः । तत्त्वज्ञैः । करणीयं । आत्मनि । सदानन्देच्छुभिः । * यत्नतः ॥ ३४२ ॥

अर्थः—१ देहाशींच आपलें तादात्म्य करून २ राहिलेल्या, ( वनिताविनोदादि ) ३ बाह्य पदार्थांचा रसास्वाद घेण्यांत ज्याचें चित्त लंपट झालें आहे अशा ( व ) ४ त्या त्या क्रिया-बाह्य पदार्थ संपादन करण्याकरितां कायिक, वाचिक व मानसिक व्यापार-५ करणाऱ्या ( पुरुषाला ) ६ दृश्याचें ७ ग्रहण न होणें-बाह्य संकल्प उदयास न येणें-( हें ) ८ कसें ९ बरें १० घडेल ? ( यास्तव ज्यांनीं ब्राह्मणत्वादि ) सर्व धर्म, ११ ( विहित व निषिद्ध ) कर्में ( आणि शब्दादि व स्रक्चंदन वनितादि ) विषय

* " सदात्मनिष्ठया " ह्मणजे " सद्रूप आत्म्याच्या-ब्रह्माच्या-ठायीं निष्ठा ठेऊन " असें सामासिक एक पदहि करितां येईल.

* " सदा । आनन्देच्छुभिः । " अशीं दोन पदेंहि एथें पडतात. अर्थांत विशेष फरक नाहीं.

( यांचा ) त्याग केला आहे, १२ नित्य ( असा जो ) आत्मा ( त्याच्या ठिकाणीं ज्यांची ) निष्ठा आहे, ( ज्यांनीं ) १३ सदसद्विवेक केला आहे ( व, जे ) १४ नित्यानंदाची इच्छाकरितात ( त्यांनीं ) १५ प्रयत्नानें १६ स्वतांच्या ठायीं ( बाह्य संकल्पांचा उदय होणार नाहीं असें अवश्य ) १७ करावें. ॥ ३४२ ॥

नित्यानंदप्राप्तिकरितां मनाच्या ठायीं बाह्य संकल्पांचा उदय होऊं न देणें हें अत्यंतावश्यक आहे. ॥ ३४२ ॥

**सर्वात्मसिद्धये भिक्षोः कृतश्रवणकर्मणः । समाधिं विद्धात्येषा शान्तो दान्त इति श्रुतिः ॥ ३४३ ॥**

सर्वात्मसिद्धये । भिक्षोः । कृतश्रवणकर्मणः ॥ समाधिं । विदधाति । एषा । शान्तः । दान्तः । इति । श्रुतिः ॥ ३४३ ॥

अर्थः—१ वेदांतश्रवणरूप कर्म करीत असून ( इतर सर्व कर्मांचा त्याग करणाऱ्या ) २ संन्याशाला " शान्तो दान्तः "—३ शम करणारानें, ४ दमन करणारानें-५ अशी ६ ही-ह्या आरंभाची-७ श्रुति ८ सर्वत्र आत्म भाव सिद्ध व्हावा ह्मणून ९ समाधि १० करावा ( असा उपदेश करीत आहे ). ॥ ३४३ ॥

मोक्षप्राप्त होण्यास सर्व कर्म त्यागाप्रमाणें समाधीचीहि आवश्यकता आहे. ३४३

**आरूढशक्तेरहमो विनाशः कर्तुं न शक्यः सहसापि पण्डितैः । ये निर्विकल्पाख्यसमाधिनिश्चलास्तानन्तरानन्तभवा हि वासनाः ॥ ३४४ ॥**

आरूढशक्तेः । अहमः । विनाशः । कर्तुं । न । शक्यः । सहसा । अपि । पण्डितैः ॥ ये । निर्विकल्पाख्यसमाधिनिश्चलाः । तान् । अन्तरा । अनन्तभवाः । हि । वासनाः ॥ ३४४ ॥

**अर्थः**–१ जे २ निर्विकल्प नांवाच्या समाधीच्या योगानें निश्चल-सर्वसंकल्परहित-( झाले असतील ) ३ त्यां ४ शिवाय ( लोकरंजन करणाऱ्या लौकिक ) ५ पंडितांस ६ हि ७ अतिप्रबल ( अशा ) ८ अहंकाराचा ९ नाश १० एकाएकीं ११ करणें १२ शक्य १३ नाहीं. १४ कारण १५ वासना १६ अनेक जन्मांच्या ( विषयाभ्यासानें दृढ झालेल्या आहेत. ) ॥ ३४४

अनेक जन्मांच्या अभ्यासानें दृढ झालेल्या वासनांचा क्षय होऊन अहंकाराचा नाश होणें हें निर्विकल्प समाधीवांचून शक्य नाहीं. ॥ ३४४ ॥

**अहंबुद्ध्यैव मोहिन्या योजयित्वावृतेर्बलात् ।**
**विक्षेपशक्तिः पुरुषं विक्षेपयाति तद्गुणैः ॥ ३४५ ॥**

अहंबुद्ध्या । एव । मोहिन्या । योजयित्वा । आवृतेः । बलात् ॥
विक्षेपशक्तिः । पुरुषं । विक्षेपयति । तद्गुणैः ॥ ३४५ ॥

**अर्थः**—* ( पूर्वी सांगितलेली रजोगुणाची ) १ विक्षेपशक्ति २ * आवरणशक्तीच्या ३ प्राबल्यानें ४ मोह पाडणाऱ्या ( अनात्माभिमानरूप ) ५ अहंबुद्धीशीं ( समाधि न करणाऱ्या ) ६ पुरुषाला ७ जोडून ८ च ( स्वतांच्या ठायीं आरोपित केलेल्या कर्तृत्वाभिमानादि ) ९ त्या ( अहंबुद्धीच्या ) गुणांनीं १० विक्षिप्त करिते-एकाग्रता संपादन करण्यास अवकाश न देऊन चित्त व्यग्र करून क्लेशसमूह वाढविते. ॥ ३४५ ॥

अहंकार नष्ट झाला नाहीं तर क्लेश कसे होतात हें सांगितलें. ॥ ३४५ ॥

**विक्षेपशक्तिविजयो विषमो विधातुं निःशेषमावरणशक्तिनिवृत्त्यभावे । दृग्दृश्ययोः स्फुटपयोजलवद्विभागे नश्येत्तदावरणमात्मनि च स्वभावात् निःसंशयेन भवति प्रतिबन्धशून्यो विक्षेपणं नहि तदा यदि चेन्मृषार्थे ॥ ३४६ ॥**

* श्लोक ११३ व ११५ पहा.

विक्षेपशक्तिविजयः[3] । विषमः[5] । विधातुं[4] । निःशेषं[1] । आवरणशक्तिनिवृत्त्यभावे[2] ॥ दृग्दृश्ययोः[7] । स्फुटपयोजलवत्[6] । विभागे[8] । नश्येत्[14] । तद्[10] । आवरणं[11] । आत्मनि[9] । च[13] । स्वभावात्[12] । निःसंशयेन[21] । भवति[23] । प्रतिबन्धशून्यः[22] । विक्षेपणं[18] । नहि[19] । तदा[20] । यदि[15] । चेत्[16] । मृषार्थे[17] ॥ ३४६ ॥

**अर्थः**–१ समूळ २ आवरणशक्तीची निवृत्ति झाली नाहीं ( तोंपर्यंत ) ३ विक्षेपशक्तीचा नाश ४ करणें ५ कठीण ( आहे ). ( चंचूनें हंसाकडून ) दूध आणि पाणी यांच्या स्पष्ट ( पृथक्करणाप्रमाणें ) ७ आत्मा आणि अनात्मा ह्यांचें ( विवेकानें तीक्ष्ण झालेल्या कुशाग्रबुद्धीनें ) ८ पृथक्करण झालें असतां, ९ आत्म्याच्या ठायीं ( असलेलें ) १० तें ११ आवरण ( आत्म्याच्या पृथग्भानरूप, स्वप्रकाश ) १२ स्वभावामुळें १३ च १४ नष्ट होतें. १५ ज्या ( कोणत्या ) वेळेस १६ जर ( मुमुक्षूला १७ मिथ्या पदार्थांविषयीं १८ विक्षेप ( होणार १९ नाहीं-पुत्रवित्तादिकांचा लाभ किंवा हानि झाली असतां चित्ताला हर्ष किंवा विषाद होणार नाहीं- ( तर ) २० त्याच वेळेस ( तो ) २१ निःसंशय २२ विक्षेपरहित-समाधीला योग्य-२३ होतो. ॥ ३४६ ॥

आवरणशक्तीचें प्राबल्य सांगून तिचा जय कसा करावा हें सांगितलें ॥ ३४६ ॥

**सम्यग्विवेकः स्फुटबोधजन्यो विभज्य दृग्दृश्यपदार्थतत्त्वम् । छिनत्ति मायाकृतमोहबन्धं यस्माद्विमुक्तस्य पुनर्न संसृतिः ॥ ३४७ ॥**

सम्यक्[4] । विवेकः[5] । स्फुटबोधजन्यः[3] । विभज्य[2] । दृग्दृश्यपदार्थतत्त्वम्[1] ॥ छिनत्ति[7] । मायाकृतमोहबन्धं[6] । यस्मात्[8] । विमुक्तस्य[9] । पुनः[10] । न[12] । संसृतिः[11] ॥ ३४७ ॥

**अर्थः**–१ आत्मा व अनात्मा यांच्या स्वरूपाचें २ पृथक्करण करून-त्यांच्या स्वरूपांचा जो परस्पर तादात्म्याध्यास आहे त्याचा त्याग करून-

( धर्मीच्या ) ३ निःसंशय ज्ञानानें उत्पन्न झालेला ( जो शोधित पदार्थांचा ) ४ उत्तम ५ विवेक ( तो ) ६ मायेनें केलेल्या अविवेकरूप बंधनाचें ७ छेदन करितो. ८ त्या ( अविवेकरूप बंधनापासून ) ९ सुटलेल्या ( पुरुषाला ) १० पुनः ११ संसार ( प्राप्त होत ) १२ नाहीं. ३४७

आत्मानात्मविवेक यथार्थ झाला असतां पुनः संसार प्राप्त होत नाहीं. ॥ ३४७ ॥

**परावरैकत्वविवेकवन्हिर्दहत्यविद्यागहनं ह्यशेषम् । किं स्यात्पुनः संसरणस्यबीजमद्वैतभावं समुपेयुषोऽस्य ॥ ३४८ ॥**

परावरैकत्वविवेकवन्हिः । दहति । अविद्यागहनं । हि । अशेषम् ॥ किं । स्यात् । पुनः । संसरणस्य । बीजं । अद्वैतभावं । समुपेयुषः । अस्य ॥ ३४८ ॥

**अर्थः**—१ ज्या अर्थी २ परमात्मा व जीव ह्यांच्या अभेदाचा बोधरूप अग्नि ३ समूल ४ अविद्यारूप वनाला ५ जाळितो, ( त्या अर्थी ) ६ कैवल्य पदाला ७ प्राप्त झालेल्या ८ ह्या ( पुरुषाला ) ९ पुनः १० संसाराचें ११ बीज १२ कोणतें १३ असणार? ॥ ३४८ ॥

ब्रह्मात्मैक्य ज्ञानानें अविद्येचा समूल नाश झाल्यावर पुनः संसाराचें बीज रहात नाहीं. ॥ ३४८ ॥

**आवरणस्य निवृत्तिर्भवति * च सम्यक्पदार्थदर्शनतः। मिथ्याज्ञानविनाशस्तद्विक्षेपजनितदुःखनिवृत्तिः।३४९।**

आवरणस्य । निवृत्तिः । भवति । च । सम्यक्पदार्थदर्शनतः ॥ मिथ्याज्ञानविनाशः । तद्विक्षेपजनितदुःखनिवृत्तिः ॥ ३४९ ॥

**अर्थः**—१ वस्तुस्वरूपाचें यथार्थ ज्ञान झालें असतां २ आवरणाची ३ निवृत्ति ४ होते. ५ आणि ( त्यानंतर भ्रमाला हेतूभूत जें ) ६ अज्ञान

* " च " च्या जागीं " हि " असा पाठ दोन प्रतींत आहे.

( त्याचा ) नाश ( होतो आणि त्यामुळें ) ७ त्या ( अज्ञानापासून झालेल्या ) विक्षेपाच्या योगानें उत्पन्न झालेल्या दुःखाची ( व भयाची हि ) निवृत्ति ( होते ). ॥ ३४९ ॥

विवेकजन्य स्वरूपज्ञानानें आवरणाचा भंग होऊन दुःखाची निवृत्ति कशी होते हें सांगितलें. ॥ ३४९ ॥

**एतत्त्रितयं दृष्टं सम्यग्रज्जुस्वरूपविज्ञानात् । तस्माद्वस्तुसतत्त्वं ज्ञातव्यं बन्धमुक्तये विदुषा ॥ ३५० ॥**

**एतत् । त्रितयं । दृष्टं । सम्यग्रज्जुस्वरूपविज्ञानात् ॥ तस्मात् । वस्तु । सतत्त्वं । ज्ञातव्यं । बन्धमुक्तये । विदुषा ॥ ३५० ॥**

**अर्थः**—१ रज्जुस्वरूपाचें यथार्थ ज्ञान झालें असतां २ ह्या ३ तीन गोष्टी-आवरणनिवृत्ति, मिथ्याज्ञाननाश व विक्षेपजन्यदुःखनिवृत्ति-४ पाहण्यांत येतात. ५ यास्तव ६ विद्वानानें ७ बंधांतून सुटण्याकरितां ८ यथार्थ ९ वस्तु-आत्मस्वरूप-१० जाणावें. ॥ ३५० ॥

यथार्थ वस्तुज्ञानानें आवरणादिकांची निवृत्ति होते हें अनात्मपदार्थांत हि पाहावयास कसें मिळतें हें सांगितलें. ॥ ३५० ॥

**अयोऽग्नियोगादिव सत्समन्वयान्मात्रादिरूपेण विजृम्भते धीः । तत्कार्यमेतद् * द्वितयं यतो मृषा दृष्टं भ्रमस्वप्नमनोरथेषु ॥ ३५१ ॥**

**अयः । अग्नियोगात् । इव । सत्समन्वयात् । मात्रादिरूपेण । विजृम्भते । धीः ॥ तत्कार्यं । एतद् । द्वितयं । यतः । मृषा । दृष्टं । भ्रमस्वप्नमनोरथेषु ॥ ३५१ ॥**

**अर्थः**—१ अग्नीचा संबंध झाल्यामुळें २ लोखंड ३ जसें ( दाहकरूपानें प्रत्ययास येतें तद्वत् ) ४ सद्रूप आत्म्याचा योग असल्यामुळें ५

---

* " तत्कार्यमेतत् त्रितयं " असाहि पाठ एका प्रतींत आहे. " एतत् त्रितयं " ह्मणजे " ( प्रमाता प्रमाण आणि प्रमेय ) ह्या तीन गोष्टी. "

बुद्धि ६ प्रमाता, प्रमाण आणि प्रमेय या रूपांनीं ७ प्रत्ययास येते. ८ ज्या अर्थीं ९ त्या (बुद्धीचें) कार्य (प्रमात्रादिरूप) १० हा ११ द्वैतप्रपंच १२ भ्रम, स्वप्न व मनोराज्य यांमध्यें १३ मिथ्या (आहे असें) १४ पाहण्यांत येतें, (त्या अर्थीं जागृतींत हि तें मिथ्याच आहे.) ३५१

आत्मसत्तेमुळें बुद्धि नानारूपांनीं प्रत्ययास येते, परंतु तें नानात्व मिथ्या आहे हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. ॥ ३५१ ॥

**ततो विकाराः प्रकृतेरहंमुखा देहावसाना विषयाश्च सर्वे । क्षणेऽन्यथाभावितया ह्यमीषामसत्त्वमात्मा तु कदापि नान्यथा ॥ ३५२ ॥**

ततः[१] । विकाराः[८] । प्रकृतेः[७] । अहंमुखाः[२] । देहावसानाः[३] । विषयाः[५] । च[४] । सर्वे[६] ॥ क्षणे[९] । अन्यथा[१०]भावितया । [११]हि । अमीषां[१२] । असत्त्वं[१३] । आत्मा[१५] । तु[१४] । कदा[१६] । अपि[१७] । न[१९] । अन्यथा[१८] ।३५२।

**अर्थः**—१ त्यामुळें-बुद्धिकार्य असून मिथ्यारूप असल्यामुळें-२ अहंकारापासून ३ देहापर्यंत ४ आणि (शब्दादि) ५ विषय (हे) ६ सर्व (जे साक्षात् किंवा परंपरेनें) ७ प्रकृतीचे-मायेचे-८ विकार-मायाजनित-(आहेत ते) ९ प्रतिक्षणीं १० परिणामाला पावत असल्यामुळें ११ च-त्यांचीं रूपें पालटत असल्यामुळें-१२ ते १३ मिथ्या (आहेत). १४ आणि १५ आत्मा १६ कधीं १७ हि १८ पालटत १९ नाहीं. (म्हणून एकरस असल्यामुळें तो सत्य आहे.) ॥ ३५२ ॥

द्वैत मिथ्या आहे हेंच प्रकारांतरानें सांगितलें. ॥ ३५२ ॥

**नित्याद्वयाखण्डचिदेकरूपो बुद्ध्यादिसाक्षी सदसद्विलक्षणः । अहंपदप्रत्ययलक्षितार्थः प्रत्यक्सदानन्दघनः परात्मा ॥ ३५३ ॥**

नित्याद्वयाखण्डचिदेकरूपः[१] । बुद्ध्यादिसाक्षी[२] । सदसद्विल[३]-

क्षणः ॥ अहंपदप्रत्ययलक्षितार्थः । प्रत्यक् । सदानन्दघनः । परात्मा ॥ ३५३ ॥

अर्थः–१ उत्पत्तिविनाशरहित, अद्वैत आणि केवल असें चैतन्यच आहे एकरूप ज्याचें असा, २ बुद्धि, प्राण, मन ( ह्यांच्या असण्या नसण्याचा ) प्रकाशक, ३ स्थूलसूक्ष्मांहून वेगळा, ४ अहं-मी या पदानें व प्रत्ययानें जाणिला जाणारा व परमार्थरूप ५ सर्वांच्या आंत, ( आणि ) ६ अबाधितानंदैकरस ( असा ) ७ परमात्मा ( हकारार्थ-द्रष्टा-साक्षी ) आहे. ३५३

दृश्य अनात्म्याचें मिथ्यारूपानें वर्णन करून द्रष्टा जो आत्मा त्याचें स्वरूप सांगितलें. । ३५३ ॥

इत्थं विपश्चित्सदसद्विभज्य निश्चित्य तत्त्वं निजबोधदृष्ट्या । ज्ञात्वा स्वमात्मानमखण्डबोधं तेभ्यो विमुक्तः स्वयमेव शाम्यति ॥ ३५४ ॥

इत्थं । विपश्चित् । सदसद् । विभज्य । निश्चित्य । तत्त्वं । निजबोधदृष्ट्या ॥ ज्ञात्वा । स्वं । आत्मानं । अखण्डबोधं । तेभ्यः । विमुक्तः । स्वयं । एव । शाम्यति ॥ ३५४ ॥

अर्थः–१ पूर्वोक्त रीतीनें २ विद्वान् ३ आत्मा व अनात्मा यांचा ४ विवेक करून ५ आपल्या ज्ञानस्वरूपांत जी अंतर्मुख बुद्धिवृत्ति आहे तिच्या योगानें ६ परमार्थरूप ( तत्पद ब्रह्माचा ) ७ निश्चय करून ८ स्वतांला ९ अखंड ज्ञानस्वरूप १० ब्रह्म-ब्रह्माहून आपण भिन्न नाहीं असें-११ जाणून १२ त्या ( पूर्वीं सांगितलेल्या प्रमाता, प्रमाण, प्रमेय व आवरण, मिथ्याज्ञान, विक्षेप ह्यां पासून ) १३ विरहित ( होऊन ) १४ स्वतः १५ च-इतर साधनांवांचून आपो आपच-१६ शांतिसुखाचा अनुभव घेतो. ॥ ३५४ ॥

आत्मानात्मविवेकानें व ब्रह्मात्मैकत्वबोधानें आपोआप शांति प्राप्त होते ३५४ ॥

अज्ञानहृदयग्रन्थेर्निःशेषविलयस्तदा । समाधिनाऽविकल्पेन यदाऽद्वैतात्मदर्शनम् ॥ ३५५ ॥

अज्ञानहृदयग्रन्थेः । निःशेषविलयः । तदा ॥ समाधिना । अविकल्पेन । यदा । अद्वैतात्मदर्शनम् ॥ ३५५ ॥

**अर्थः**–१ जेव्हां २ निर्विकल्प ३ समाधि ( करून हातांतील आवळ्याप्रमाणें ) ४ अद्वैत आत्म्याचा साक्षात्कार ( होतो ), ५ तेव्हां ६ अज्ञानजन्य चिज्जडग्रंथीचा-चैतन्य आणि चित्त ह्यांच्या अभेदाध्यासाचा ७ समूल नाश ( होतो ). ॥ ३५५ ॥

चिज्जडग्रंथीचा भेद केव्हां होतो तें सांगितलें । ३५५ ॥

**त्वमहमिदमितीयं कल्पना बुद्धिदोषात्प्रभवति**
**परमात्मन्यद्वये निर्विशेषे । प्रविलसति**
**समाधावस्य सर्वो विकल्पो विलयन-**
**मुपगच्छेद्वस्तुतत्त्वावधृत्या ॥ ३५६ ॥**

त्वं । अहं । इदं । इति । इयं । कल्पना । बुद्धिदोषात् । प्रभवति । * परमात्मनि । अद्वये । निर्विशेषे ॥ प्रविलसति । समाधौ । अस्य । सर्वः । विकल्पः । विलयनं । उपगच्छेत । वस्तुतत्त्वावधृत्या ॥ ३५६ ॥

**अर्थः**–( ज्या चेतनाला उद्देशून मी बोलत आहें तो ) १ तूं, ( अंतरात्मा ) २ मी, ३ हा ( जडप्रपंच ) ४ अशी ५ ही ६ भ्रांति ७ बुद्धीच्या ( अविवेकविक्षेपरूप ) दोषामुळें ८ उत्पन्न होते; ( आणि ) ९ समाधिकाळीं १० निर्विशेष ११ अद्वैत १२ परमात्मा १३ स्फुरत असून १४ ब्रह्माच्या वास्तविक स्वरूपाचा निश्चय होऊन १५ ह्या ( समाधिकरणाराचा " तूं मी " इत्यादिरूप ) १६ सर्व १७ विकल्प १८ नाश १९ पावेल. ॥ ३५६ ॥

---

* " परमात्मनि " ह्या पदाचा संबंध " कल्पना प्रभवति " ह्या पदांकडे लावून " परमात्मस्वरूपांत कल्पना उत्पन्न होते " असा अर्थ करून " प्रविलसति " ह्याचा संबंध " समाधौ " या पदाकडे लाविलेलाहि कोठें आढळतो.

निर्विकल्पस्वरूपसाक्षात्कारानें मी, तूं इत्यादिकल्पना व आविवेकविक्षेप हे न होऊन निर्विकल्पसमाधीची सिद्धि होते. ॥ ३५६ ॥

**शान्तो दान्तः परमुपरतः क्षान्तियुक्तः समाधिं**
**कुर्वन्नित्यं कलयति यतिः स्वस्य सर्वात्मभावम् ।**
**तेनाविद्यातिमिरजनितान्साधु दग्ध्वा विकल्पान्**
**ब्रह्माकृत्या निवसति सुखं निष्क्रियो निर्विकल्पः ३५७**

शान्तः । दान्तः । परं । उपरतः । क्षान्तियुक्तः । समाधिं । कुर्वन् । नित्यं । कलयति । यतिः । स्वस्य । सर्वात्मभावम् ॥ तेन । अविद्यातिमिरजनितान् । साधु । दग्ध्वा । विकल्पान् । ब्रह्माकृत्या । निवसति । सुखं । निष्क्रियः । निर्विकल्पः ॥ ३५७॥

अर्थः—१ शमयुक्त, २ जितेंद्रिय, ( बाह्य विषयांपासून ) ३ अत्यंत ४ उपरम पावलेला, ( शीतोष्णादि द्वंद्वें ) * ५ सहनकरणारा ६ मुमुक्षु ७ समाधि ८ करीत असतां ९ आपल्या १० सर्वात्मतेचें-परिच्छेदरहित सर्व आपलेंच स्वरूप आहे असें-११ निरंतर १२ चिंतन करीत असतो-मोक्षेच्छु साधकानें असेंच चिंतन करून समाधि करावा-१३ त्या ( सर्वात्मत्वाचिंतनानें ) १४ अविद्यारूप अंधकारापासून उत्पन्न झालेल्या ( तूं, मी, इत्यादि ) १५ विकल्पांस ( आयासावांचून ) १६ साफ १७ जाळून १८ ब्रह्माकार, १९ क्रियाशून्य व २० कल्पनारहित ( होत्साता तो )२१ सुखपूर्वक ( निश्चल होऊन ) २२ राहतो. ॥ ३५७ ॥

शमादिसाधनसंपन्न होऊन व सर्वत्र आपणच व्यापकरूपानें आहों असें चिंतन करून समाधि केला असतां, सर्व विकल्प नष्ट होऊन ब्रह्मनिष्ठा प्राप्त होते. ॥ ३५७ ॥

**समाहिता ये प्रविलाप्य बाह्यं श्रोत्रादि चेतः**
**स्वमहं चिदात्मनि । त एव मुक्ता भवपाशबन्धै-**
**र्नान्ये तु पारोक्ष्यकथाभिधायिनः ॥ ३५८ ॥**

---

* " क्षान्तियुक्तः " याचा अर्थ " क्षमाशील " असा हि होतो.

समाहिताः । ये । प्रविलाप्य । बाह्यं । श्रोत्रादि । चेतः । स्वं । अहं । चिदात्मनि ॥ ते । एव । मुक्ताः । भवपाशबन्धैः । न । अन्ये । तु । पारोक्ष्यकथाभिधायिनः ॥ ३५८ ॥

अर्थः—१ जे ( साधक ) २ आपल्या ३ श्रोत्रादि ४ बाह्य ( इंद्रियांचा ), ५ चित्ताचा ( आणि ) ६ अहंकाराचा ७ चेतनात्म्याच्या ठायीं ( हीं कल्पित आहेत असें जाणून ) ८ निषेध करितात, ( व ) ९ समाधिनिष्ठ होऊन राहतात, १० ते ११ च १२ संसारपाशाच्या बंधनांतून १३ सुटले. १४ आणि ( ब्रह्म सर्वांचा आत्मा आहे इत्यादि शास्त्रांतील ) १५ गोष्टी ( स्वतःअनुभव नसून व गृहपुत्रादिकांच्या ठायीं निमग्न असून केवल ) परोक्षरीतीनें सांगणारे १६ इतर ( लौकिक पंडित मुक्त होत ) १७ नाहींत. ॥ ३५८ ॥

समाधी वांचून जीवन्मुक्तीची प्राप्ति होणें दुर्लभ आहे. ॥ ३५८ ॥

**उपाधिभेदात्स्वयमेव भिद्यते चोपाध्यपोहे स्वयमेव केवलः । तस्मादुपाधेर्विलयाय विद्वान् वसेत्सदाऽ* कल्पसमाधिनिष्ठया ॥ ३५९ ॥**

उपाधिभेदात् । स्वयं । एव । भिद्यते । च । उपाध्यपोहे । स्वयं । एव । केवलः ॥ तस्मात् । उपाधेः । विलयाय । विद्वान् । वसेत् । सदा । अकल्पसमाधिनिष्ठया ॥ ३५९ ॥

अर्थः-( बुध्यादि ) १ उपाधि भेदाचें भान झालें असतां ( १३ आत्मज्ञ ) २ स्वतःला ३ च ( दुसऱ्यापासून ) ४ भिन्न मानतो; ५ आणि ६ उपाधि नसतां ( ज्याप्रमाणें लाल फूल वर नसलें म्हणजे स्फटिक लाल न दिसतां आपल्या शुद्ध रूपानें च असतो तद्वत् ) ७ भेदरहित ८ आपण ९ च ( होतो ). १० यास्तव-उपाधि भेददृष्टीला हेतु असल्यामुळें-

---

* " कल्पसमाधिनिष्ठया " असें पद घेऊन " प्रलयापर्यंत समाधिस्थितीनें " असा एका प्रतींत अर्थ केला आहे; परंतु तो बरोबर दिसत नाहीं. " प्रारब्धांतपर्यंत समाधिस्थितीनें " असा दुसऱ्या एका प्रतींत अर्थ आहे.

११ उपाधीच्या १२ नाशार्थ १३ आत्मज्ञ पुरुषानें १४ निर्विकल्पसमाधि-स्थितीनें १५ सर्वकाल १६ राहावें. ॥ ३५९ ॥

ज्ञानाचें फल जो कैवल्यमोक्ष तो समाधीनेंच अनुभवास येतो. ॥ ३५९ ॥

**सति सक्तो नरो याति सद्भावं ह्येकनिष्ठया ।**
**कीटको भ्रमरं ध्यायन् भ्रमरत्वाय कल्पते ॥३६०॥**

सति[6] । सक्तः[8] । नरः[9] । याति[12] । सद्भावं[10] । हि[11] । एकनिष्ठया[7] ।
कीटकः[1] । भ्रमरं[2] । ध्यायन्[3] । भ्रमरत्वाय[4] । कल्पते[5] ॥ ३६० ॥

अर्थः--( जसा भ्रमारानें आणून घरट्यांत ठेविलेला ) १ किडा ( भ्रमराच्या भीतीनें ) २ भ्रमराचें ३ ध्यानकरून ४ भ्रमर होण्याला ५ समर्थ होतो-स्वतः भ्रमरच बनतो-( तद्वत् ) ६ सद्रूप ब्रह्माच्या ठायीं ७ अनन्य भावानें ८ समाधि करून राहणारा ९ पुरुष १० ब्रह्मभावाप्रत ११ च १२ प्राप्त होतो. ॥ ३६० ॥

समाधीनें मोक्ष कसा होतो हें भ्रमरकीटकांच्या दृष्टांतानें सांगितलें. भ्रमराहून भिन्न असलेला कीटक भीतीनें हि त्याचें चिंतन करून भ्रमररूप होतो, तर मग मूळचाच ब्रह्मस्वरूप जो जीव तो निर्भयपणानें ब्रह्माचें ध्यान करीत असतां ब्रह्मरूप होईल हें काय सांगावयास पाहिजे? ॥ ३६० ॥

**क्रियान्तरासक्तिमपास्य कीटको ध्यायन्नलित्वं**
**ह्यलिभावमृच्छति । तथैव योगी परमात्मतत्त्वं**
**ध्यात्वा समायाति तदेकनिष्ठया ॥ ३६१ ॥**

क्रियान्तरासक्तिं[2] । अपास्य[3] । कीटकः[1] । ध्यायन्[6] । अलित्वं[4] ।
हि[5] । अलिभावं[7] । ऋच्छति[8] ॥ तथा[9] । एवं[10] । योगी[11] । परमा-
त्मतत्त्वं[13] । ध्यात्वा[14] । समायाति[15] । तद्[13] । एकनिष्ठया[12] ॥ ३६१ ॥

अर्थः-१ ( ज्याप्रमाणें ) १ किडा ( गमनागमनादि ) २ इतर क्रियांविषयीं तत्परता ३ टाकून देऊन ४ भ्रमराच्या रूपाचें ५ च ६ ध्यान करीत असतां ७ भ्रमरत्वाला ८ प्राप्त होतो; ९ त्याप्रमाणें

१० च ११ ब्रह्माभ्यासी ( पुरुष ) १२ अनन्यभावानें १३ परमात्मतत्त्वाचें १४ ध्यान करून-ब्रह्मात्मचिंतनमात्र स्थितीनें राहून -१५ त्या ( परमात्मतत्त्वाप्रत ) १६ पावतो-शुद्धब्रह्मस्वरूपाचा आपल्या ठायीं स्पष्ट अनुभव घेतो. ॥ ३६१ ॥

पूर्वोक्त श्लोकांतील दृष्टांतदार्ष्टांतांचें खुलासेवार विवरण केलें आहे. ॥ ३६१ ॥

**अतीव सूक्ष्मं परमात्मतत्त्वं न स्थूलदृष्ट्या
प्रतिपत्तुमर्हति । समाधिनात्यन्तसुसूक्ष्मवृत्त्या
ज्ञातव्यमार्यैरतिशुद्धबुद्धिभिः ॥ ३६२ ॥**

अतीव । सूक्ष्मं । परमात्मतत्त्वं । न । स्थूलदृष्ट्या । प्रतिपत्तुं । अर्हति ॥ समाधिना । अत्यन्तसुसूक्ष्मवृत्त्या । ज्ञातव्यं । आर्यैः । अतिशुद्धबुद्धिभिः ॥ ३६२ ॥

**अर्थः**—१ परमात्म्याचें निर्विशेष स्वरूप ( देहादिकांहून सूक्ष्म जीं बुध्यादिकतत्त्वें आहेत त्यांहून हि ) २ अतिशय ३ सूक्ष्म ( आहे; त्याचा ) ४ बाह्य विषयांपासून निवृत्त न केलेल्या बुद्धीनें ५ साक्षात्कार करण्यास ( पुरुष ) ६ समर्थ होत ७ नाहीं. ( म्हणून चित्ताचा ) ८ समाधि करून ( प्राप्त झालेल्या सर्वथा बाह्यांतर विषयस्मरण न करणाऱ्या ) ९ अतिसूक्ष्म बुद्धिवृत्तीच्या योगानें १० अत्यंत निर्मलबुद्धीच्या ११ महानुभाव पुरुषांनीं ( त्याचा ) १२ साक्षात्कार करून घ्यावा. ॥ ३६२ ॥

समाधी वांचून नुसत्या शाब्दिक ब्रह्मज्ञानानें स्वरूपसाक्षात्कार होणार नाहीं. ।३६२।

**यथा सुवर्णं पटुपाकशोधितं त्यक्त्वा मलं स्वात्मगुणं समृच्छति । तथा मनः सत्त्वरजस्तमोमलं
ध्यानेन सन्त्यज्य समेति तत्त्वम् ॥ ३६३ ॥**

यथा । सुवर्णं । पटुपाकशोधितं । त्यक्त्वा । मलं । स्वात्मगुणं । समृच्छति । तथा । मनः । सत्त्वरजस्तमोमलं । ध्यानेन । सन्त्यज्य । समेति । तत्त्वम् ॥ ३६३ ॥

अर्थः—१ ज्याप्रमाणें २ क्षार व अग्नि यांच्या उत्तम संयोगानें शुद्ध झालेलें ३ सोनें ४ मळ ५ टाकून ६ आपल्या स्वाभाविक ( तेजोरूप ) ७ धर्माप्रत ७ प्राप्त होतें, ८ तद्वत् ९ ध्यानाच्या योगानें १० सत्त्वगुण, रजोगुण आणि तमोगुण यांच्या ( वृत्तिप्रवाहरूप ) मलाचा त्याग करून १२ चित्त १३ निर्विशेष आणि अबाध्य अशा ब्रह्मात्मत्वाप्रत १४ प्राप्त होतें-त्याचा स्पष्ट अनुभव घेतें ॥ ३६३ ॥

समाधीच्या योगानें चित्त शुद्ध होऊन आपल्या स्वरूपाचा स्पष्ट अनुभव घेतें हें दृष्टांतपूर्वक सांगितलें ॥ ३६३ ॥

**निरन्तराभ्यासवशात्तदित्थं पक्वं मनो ब्रह्मणि लीयते यदा । तदा समाधिः सविकल्पवर्जितः स्वतोऽद्वयानन्दरसानुभावकः ॥ ३६४ ॥**

निरन्तराभ्यासवशात्[2] । तद्[4] । इत्थं[1] । पक्वं[3] । मनः[5] । ब्रह्मणि[7] । लीयते[8] । यदा[6] ॥ तदा[9] । समाधिः[12] । * सविकल्पवर्जितः[10] । स्वतः[13] । अद्वयानन्दरसानुभावकः[11] ॥ ३६४ ॥

अर्थः—१ अशा रीतीनें वर सांगितल्याप्रमाणें-२ सर्वकाळ ( एकनिष्ठेनें ब्रह्मचिंतनरूप ) अभ्यासाच्या योगानें ३ पक्व झालेलें-बाह्य वासनांनीं न ओढलेलें-तें ४ ( ध्यान करणारें ) ५ मन ६ ज्यावेळीं ( ध्येयभूत प्रत्यगभिन्न ) ७ परमात्म्याच्या ठायीं ८ लीन होतें-ध्येयरूपच बनतें-९ तेव्हां सविकल्प ध्यानाच्या अभ्यासानंतर-१० भेदकरणाऱ्या ज्ञानांनीं विरहित ( आणि ) ११ अद्वैत आनंदैकरस ( अशा ) ब्रह्मानंदानुभवाचा हेतु ( जो निर्विकल्प ) १२ समाधि ( तो ) १३ अनायासें ( होतो ).३६४

सविकल्प समाधि केल्यानें निर्विकल्प समाधि क्रमानेंच होतो हें सांगितलें ।३६४।

**समाधिनाऽनेन समस्तवासनाग्रन्थेर्विनाशोऽखिलकर्मनाशः । अन्तर्बहिः सर्वत एव सर्वदा स्वरूपविस्फूर्तिरयत्नतः स्यात् ॥ ३६५ ॥**

---

* " सः । विकल्पवर्जितः " अशीं दोन पदेंहि पडतात. अर्थांत विशेष फरक नाहीं.

समाधिना । अनेन । समस्तवासनाग्रन्थेः । विनाशः । अखिलकर्मनाशः ॥ अन्तः । बहिः । सर्वतः । एव । सर्वदा । स्वरूपविस्फूर्तिः । अयत्नतः । स्यात् ॥ ३६५ ॥

**अर्थः**–१ ह्या ( निर्विकल्प ) २ समाधीच्या योगानें ३ सर्व बाह्य संस्कारां संबंधी ( काम संशयादिरूप ) ग्रंथीचा ४ नाश ( होतो त्या प्रमाणेंच प्रारब्ध खेरीजकरून इतर ) ५ सर्व ( शुभाशुभ ) कर्मांचा नाश ( होतो ). ६ आंत, ७ बाहेर ८ सर्वत्र ९ च १० सर्वकाळ ११ स्वरूपाचें भान १२ यत्नावांचून १३ होतें ॥ ३६५ ॥

निर्विकल्प समाधि सर्व संपत्तीचा हेतु आहे म्हणून तो अवश्य करावा. ॥३६५॥

**श्रुतेः शतगुणं विद्यान्मननं मननादपि ।**
**निदिध्यासं लक्षगुणमनन्तं निर्विकल्पकम् ॥ ३६६ ॥**

श्रुतेः । शतगुणं । विद्यात् । मननं । मननात् । अपि ॥ निदिध्यासं । लक्षगुणं । अनन्तं । निर्विकल्पकम् ॥ ३६६ ॥

**अर्थः**–( ब्रह्मविद्येच्या ) १ श्रवणापेक्षां ( वेदानुकूल तर्कांच्या योगानें ब्रह्माचें संभावनारूप ) २ मनन ३ शंभरपट-पुष्कळ अधिक-( फळ देणारें आहे असें ) ४ समजावें. ५ मननापेक्षां ६ देखील ( विजातीय प्रत्यय टाकून केवळ स्वरूपप्रकाशाच्या योगानें अत्यन्त स्थिरता देणारें ) ७ निदिध्यासन-आत्मानुसंधान-८ लक्षपट-पुष्कळच अधिक-( फळ देणारें आहे; आणि ) ९ निर्विकल्प समाधि ( तर ) १० अनंत ( फल देणारा आहे ). ।३६६।

श्रवणादि समाध्यन्त कर्तव्याची परंपरा फलासहित कथन करून निर्विकल्प समाधि अनंत मोक्षरूप फल देणारा असल्यामुळें कर्तव्याचा अवधि आहे हें सांगितलें ॥३६६॥

**निर्विकल्पकसमाधिना स्फुटं ब्रह्मतत्त्वमवगम्यते**
**ध्रुवम् । नान्यथा चलतया मनोगतेः**
**प्रत्ययान्तरविमिश्रितं भवेत् ॥ ३६७ ॥**

निर्विकल्पकसमाधिना । स्फुटं । ब्रह्मतत्त्वं । अवगम्यते । ध्रुवम् ॥ न । अन्यथा । चलतया । मनोगतेः । प्रत्ययान्तर-विमिश्रितं । भवेत् ॥ ३६७ ॥

अर्थः—१ निर्विकल्प समाधीच्या योगानें २ संशय रहित ३ ब्रह्म-तत्त्वाचा ४ खात्रीनें ५ साक्षात्कार होतो. ६ नाहींतर-निर्विकल्प समा-धीच्या अभावीं-७ मनाचा स्वभाव ८ अतिचंचल असल्यामुळें ( ब्रह्मसा-क्षात्कार होणार ) ९ नाहीं. ( कदाचित् ) १० इतर-अनात्म-प्रत्ययानें मिश्र ( असा आत्मप्रत्यय होण्याचा ) ११ संभव आहे, ( आणि समा-धींत मन निश्चल असल्यामुळें अनात्मप्रत्यय न होतां केवळ अद्वैत आत्म-साक्षात्कारच होतो ). ॥ ३६७ ॥

निर्विकल्प समाधिच सर्व संशयनिवारक आहे, ह्मणून त्याचेंच उत्कृष्टत्व स्पष्ट-पणें सांगितलें आहे. ॥ ३६७ ॥

**अतः समाधत्स्व यतेन्द्रियः सन् निरन्तरं शान्त-मनाः प्रतीचि । विध्वंसय ध्वांतमनाद्यविद्यया कृतं सदेकत्वविलोकनेन ॥ ३६८ ॥**

अतः । समाधत्स्व । यतेन्द्रियः । सन् । निरन्तरं । शान्त-मनाः । प्रतीचि ॥ विध्वंसय । ध्वांतं । अनाद्यविद्यया । कृतं । सदेकत्वविलोकनेन ॥ ३६८ ॥

अर्थः—( निर्विकल्प समाधि महाफल देणारा आहे ) १ ह्मणून २ जितेंद्रिय ( आणि ) ३ निश्चलचित्त ४ होऊन ५ प्रत्यगात्म्याच्या ठायीं ६ सतत ७ समाधिनिष्ठ हो ( व त्या समाधींत ) ८ ब्रह्मात्मैक्य साक्षा-त्कार पावून ९ अनादि अविद्येनें १० केलेल्या ११ अज्ञानावरणाचा १२ नाश कर. ॥ ३६८ ॥

पूर्वोक्त महाफलसाधनभूत समाधि आपल्या प्रिय शिष्यानें करावा ह्मणून दयाळु गुरूंनीं त्यास उपदेश केला आहे. ॥ ३६८ ॥

**योगस्य प्रथमं * द्वारं वाङ्निरोधोऽपरिग्रहः ।**
**निराशा च निरीहा च नित्यमेकान्तशीलता ॥ ३६९ ॥**

योगस्य[1] । प्रथमं[2] । द्वारं[3] । वाङ्निरोधः[4] । अपरिग्रहः[5] ॥ निराशा[7] । च[6] । निरीहा[8] । च[9] । नित्यं[10] । एकान्तशीलता[11] ३६९

**अर्थः**–१ मनाच्या समाधीचें २ पहिलें ३ साधन ( ह्मटलें ह्मणजे ) ४ वाणीचा निरोध-मौन,-५ परिवारचिंता. लोभ व द्रव्यादिकांचा संग्रह यांचा त्याग, ६ तसेंच ७ आशेचा त्याग ८ क्रिया-त्याग ९ आणि १० सर्वदा ११ एकांतांत राहण्याचा स्वभाव ( हे उपाय होत ). ३६९

समाधीचे उपाय सांगितले. ॥ ३६९ ॥

**एकान्तस्थितिरिन्द्रियोपरमणे हेतुर्दमश्चेतसः संरोधे करणं शमेन विलयं यायादहंवासना । तेनानन्दरसानुभूतिरचला ब्राह्मी सदा योगिनस्तस्माच्चित्तनिरोध एव सततं कार्यः *प्रयत्नान्मुनेः ॥ ३७० ॥**

एकान्तस्थितिः[1] । इन्द्रियोपरमणे[2] । हेतुः[3] । दमः[4] । चेतसः[5] । संरोधे[6] । करणं[7] । शमेन[8] । विलयं[10] । यायात्[11] । अहंवासना[9] ॥ तेन[12] । आनन्दरसानुभूतिः[17] । अचला[16] । ब्राह्मी[15] । सदा[14] । योगिनः[13] । तस्मात्[18] । चित्तनिरोधः[22] । एव[23] । सततं[20] । कार्यः[24] । प्रयत्नात्[21] । मुनेः[19] ॥ ३७० ॥

**अर्थः**–१ एकांतवास २ इंद्रियांना आपआपल्या विषयांपासून पराङ्मुख करण्याला ३ हेतु ( आहे ) ( इंद्रियोपरमरूप ) ४ दम ५ चित्ता-

---

* " प्रथमद्वारं " असाहि पाठ आहे. अर्थ तोच आहे.

* " प्रयत्नो मुनेः " ह्या पाठांत " चित्तनिरोध एव " ह्या पदांचा " चित्तनिरोधे एव " असापदच्छेद करून " चित्तनिरोधे प्रयत्नः कार्यः " ह्मणजे " चित्तनिरोधाविषयीं प्रयत्न करावा " असा संबंध घ्यावा.

चा ६ निरोध करण्याला ७ कारण ( होतो. चित्तनिरोधरूप ) ८ शमाच्या योगानें ९ अहंकाराची वासना १० नाश ११ पावते. १२ त्या ( वासनेच्या नाशानें ) १३ योग्याला १४ सर्वकाळ १५ ब्रह्मसंबंधीं १६ निश्चल १७ आनंदरसाचा अनुभव ( होतो ) १८ यास्तव १९ मननशील पुरुषानें २० निरंतर २१ प्रयत्न करून २२ चित्तनिरोध २३ च २४ करावा. ॥ ३७० ॥

समाधीच्या उपायांचा विशेष कामीं उपयोग कसा होतो हें सांगण्यासाठीं प्रथम एकांत वासाचा उपयोग सांगितला. ॥ ३७० ॥

**वाचं नियच्छात्मनि तं नियच्छ बुद्धौ धियं यच्छ च बुद्धिसाक्षिणि । तं चापि पूर्णात्मनि निर्विकल्पे विलाप्य शान्तिं परमां भजस्व ॥ ३७१ ॥**

**वाचं । नियच्छ । आत्मनि । तं । नियच्छ । बुद्धौ । धियं । यच्छ । च । बुद्धिसाक्षिणि ॥ तं । च । अपि । पूर्णात्मनि । निर्विकल्पे । विलाप्य । शान्तिं । परमां । भजस्व ॥ ३७१ ॥**

**अर्थः**—१ वाणीचें २ मनांत ३ नियमन कर-बाह्य वाग्व्यापार सोडून मनोमात्र व्यापारकर,-४ त्या ( मनाला निश्चयरूप ) ५ बुद्धींत अर्पण ६ कर-मनाचा व्यापार टाकून बुद्धिमात्र व्यापारकर,-७ आणि ८ बुद्धीचा ९ बुद्धीच्या साक्षींत १० लय कर-बुद्धिव्यापार सोडून साक्षिमात्र होऊन रहा-११ आणि १२ त्या ( बुद्धिसाक्षी प्रत्यगात्म्याला ) १३ हि १४ निर्विकल्प १५ पूर्ण ब्रह्माच्या ठायीं १६ लीन करून-आपण ब्रह्मरूप आहों असा निश्चय करून-१७ अनुपम १८ आनंदरसाच्या अनुभवाप्रत १९ प्राप्त हो. ॥ ३७१ ॥

समाधि संपादन करण्याचा क्रम दाखविण्याकरितां वाणीनिरोधापासून कसा आरंभ करावा हें सांगितलें. ॥ ३७१ ॥

**देहप्राणेन्द्रियमनोबुद्ध्यादिभिरुपाधिभिः । यैर्यैर्वृत्तेः समायोगस्तत्तद्भावोऽस्य योगिनः ॥ ३७२ ॥**

देहप्राणेन्द्रियमनोबुद्ध्यादिभिः । उपाधिभिः ॥ यैः । यैः । वृत्तेः । समायोगः । तत्तद्भावः । अस्य । योगिनः ॥ ३७२ ॥

**अर्थः**--१ देह, प्राण, इंद्रियें, मन, बुद्धि इत्यादि ( आत्म्याच्या ठायीं अनात्मधर्मांच्या आरोपाला निमित्तरूप अशा ) २ ज्या ३ ज्या ४ उपाधींशीं ( चैतन्याच्या प्रतिबिंबानें युक्त अशा ८ ह्या चैतन्यरूप ९ योग्याच्या ) ५ वृत्तीचा ६ संबंध ( होतो ) ७ त्या त्या ( उपाधींच्या आकाराची प्राप्ति ) ८ ह्या ९ योग्याला होते-समाधि न केल्यानें वृत्ति बाह्य विषयाकार होऊन महानर्थ प्राप्ति होते. ॥ ३७२ ॥

समाधीच्या अभावीं अनर्थ कसे होतात हें सांगितलें. ॥ ३७२ ॥

**तन्निवृत्त्या मुनेः सम्यक् सर्वोपरमणं सुखम् ।**
**संदृश्यते सदानन्दरसानुभवविप्लवः ॥ ३७३ ॥**

तन्निवृत्त्या । मुनेः । सम्यक् । सर्वोपरमणं । सुखम् ॥ संदृश्यते । सदा । आनन्दरसानुभवविप्लवः ॥ ३७३ ॥

**अर्थः**--१ त्या ( देहादिउपाधीं बरोबर झालेल्या तदाकारतेच्या ) निवृत्तीनें २ मुनीला ३ सर्वथा ४ बाह्योपरति ५ यत्नावांचून ६ अनुभवाला येते, ( व ) ७ सर्वकाळ ८ आत्मानंदाच्या अनुभवाची प्राप्ति ( होते ). ॥ ३७३ ॥

समाधीच्या योगानें अनर्थ निवृत्ति व परमार्थ प्राप्ति होते हें सांगितलें. ॥ ३७३ ॥

**अन्तस्त्यागो बहिस्त्यागो विरक्तस्यैव युज्यते ।**
**त्यजत्यन्तर्बहिः सङ्गं विरक्तस्तु मुमुक्षया ॥ ३७४ ॥**

अन्तस्त्यागः । बहिस्त्यागः । विरक्तस्य । एव । युज्यते ॥ त्यजति । अन्तः । बहिः । संङ्गं । विरक्तः । तु । मुमुक्षया ३७४

**अर्थः**-१ वैराग्यसंपन्न पुरुषाला २ च ३ अंतःस्थ ( वासनारूप विषयांचा ) त्याग-समाधीच्या योगानें निवृत्ति-( व स्त्रीगृहादि आणि शब्दादि )

४ बाह्य ( स्थूल विषयांचा ) त्याग ५ घडतो. ६ कारण ७ विरक्त पुरुष ८ मोक्षाच्या इच्छेनें ९ आंतील ( व ) १० बाहेरील ११ संग १२ सोडितो-सर्वसंगपरित्याग करून समाधिनिष्ठ होतो. ॥ ३७४ ॥

तीव्र वैराग्यानेंच समाधि सिद्ध होतो हें सांगण्याकरितां पूर्वोक्त अपरिग्रहाचें वर्णन केलें. ॥ ३७४ ॥

**बहिस्तु विषयैः सङ्गं तथान्तरहमादिभिः । विरक्त एव शक्नोति त्यक्तुं ब्रह्मणि निष्ठितः ॥ ३७५ ॥**

**बहिः । तु । विषयैः । सङ्गं । तथा । अन्तः । अहमादिभिः । विरक्तः । एव । शक्नोति । त्यक्तुं । ब्रह्मणि । निष्ठितः॥ ३७५॥**

**अर्थः**–१ तसेंच २ ब्रह्माच्या ठायीं ३ निश्चितबुद्धि करणारा४ विरक्त ५ पुरुषच ६ बाहेरील ( शब्दादि ) ७ विषयांचा ८ आणि ९ आंतील १० अहंकारादि ( मनोधर्मांचा ११ संबंध १२ सोडून देण्यास १३ समर्थ होतो. ॥ ३७५ ॥

पूर्वोक्त अर्थाचेंच विवरण केलें आहे. ॥ ३७५ ॥

**वैराग्यबोधौ पुरुषस्य पक्षिवत् पक्षौ विजानीहि विचक्षण त्वम् । विमुक्तिसौधाग्रलताधिरोहणं ताभ्यां विना नान्यतरेण सिध्यति ॥ ३७६ ॥**

**वैराग्यबोधौ । पुरुषस्य । पक्षिवत् । पक्षौ । विजानीहि । विचक्षण । त्वम् ॥ विमुक्तिसौधाग्रलताधिरोहणं । ताभ्यां । विना । न । अन्यतरेण । सिध्यति ॥ ३७६ ॥**

**अर्थः**–( हे ) १ विचारचतुर ( शिष्य ) २ पुरुषाला ३ बाह्याभ्यंतर-विषयत्यागेच्छा ( आणि ) ब्रह्मज्ञान ( हीं दोन ) ४ पक्ष्याच्या ( पंखां-प्रमाणें ) ५ पंख ( आहेत )-ज्याप्रमाणें आकाशांत उडण्याची इच्छा कर-णाऱ्या पक्ष्याला पंखांवांचून तसें करितां येणार नाहीं तद्वत् ज्ञान वैराग्या-

बांचून पुरुषाला मोक्षप्राप्ति दुर्लभ आहे-( असें ) ६ तूं ७ समज. मोक्षरूप ८ राजवाड्याच्या उंच शिखारवर असलेल्या ( दुर्लभफलयुक्तलतेवर एका पंखानें ज्याप्रमाणें पक्ष्यास उडून जातां येत नाहीं त्याप्रमाणें ) मोक्षरूप लतेवर चढणें ( वैराग्य व ज्ञान ) ९ ह्या १० दोहोंवांचून ११ एकट्या ( वैराग्यानें किंवा ज्ञानानें ) १२ सिद्ध होत १३ नाहीं. ॥ ३७६ ॥

ज्ञान व वैराग्य हीं दोन्ही असतील तरच मोक्ष होईल हें दृष्टांतपूर्वक सांगितलें ।३७६।

अत्यन्तवैराग्यवतः समाधिः समाहितस्यैव
दृढप्रबोधः । प्रबुद्धतत्त्वस्य हि बन्धमुक्ति-
र्मुक्तात्मनो नित्यसुखानुभूतिः ॥ ३७७ ॥

अत्यन्तवैराग्यवतः । समाधिः । समाहितस्य । एव । दृढप्रबोधः ॥ प्रबुद्धतत्त्वस्य । हि । बन्धमुक्तिः । मुक्तात्मनः । नित्यसुखानुभूतिः ॥ ३७७ ॥

अर्थः-१ तीव्र वैराग्यवान् पुरुषाला २ समाधि ( सिद्ध होतो ), ३ समाधिकरणाराला ४ च ५ संशयादि रहित आत्मसाक्षात्कार ( होतो ) ६ ब्रह्मात्मैक्यसाक्षात्कारवानाच्या ७ च ८ अविद्याविक्षेपाचा नाश ( होतो आणि ज्याचें ) ९ अविद्याबंधन नष्ट झालें आहे ( त्यालाच ) आत्मानंदाचा अनुभव प्राप्त होतो. ॥ ३७७ ॥

वैराग्यानें नित्यसुखप्राप्ति कशी होते हें दाखविलें. ॥ ३७७ ॥

वैराग्यान्न परं सुखस्य जनकं पश्यामि वश्यात्मन-
स्तच्चेच्छुद्धतरात्मबोधसहितं स्वाराज्यसाम्राज्यधुक् ।
एतद्द्वारमजस्रमुक्तियुवतेर्यस्मात्त्वमस्मात्परं
सर्वत्रास्पृहया सदात्मनि सदा प्रज्ञां कुरु श्रेयसे ३७८

वैराग्यात् । न । परं । सुखस्य । जनकं । पश्यामि । वश्यात्मनः । तत् । चेत् । शुद्धतरात्मबोधसहितं । स्वाराज्यसाम्रा-

ज्यधुक् ॥ एतद् । द्वारं । अजस्रमुक्तियुवतेः । यस्मात् । त्वं । अस्मात् । परं । सर्वत्र । अस्पृहया । सदात्मनि । सदा । प्रज्ञां । कुरु । श्रेयसे ॥ ३७८ ॥

**अर्थः**—ज्यानें १ चित्त वश केलें आहे अशा पुरुषाला २ वैराग्याहून ३ दुसरें ( कोणतेंहि ) ४ सुखाचें ५ साधन ( मला ) ६ दिसत ७ नाहीं. ८ जर ९ तें वैराग्य १० अत्यंत निर्मलात्मज्ञानरूप ( संपत्तीनें ) युक्त ( असेल, तर तेंच ) ११ ब्रह्मानंदरूप साम्राज्य देणारें ( होईल ). १२ ज्या अर्थी १३ हें ( बोधसहित वैराग्य ) १४ नित्यकैवल्यमुक्तिरूप तरूण स्त्रीच्या ( प्राप्तीचें ) १५ महा १६ द्वार-उत्तमसाधन-( आहे ), १७ त्या अर्थी १८ तूं १९ सर्वत्र बाह्याभ्यंतर विषयसमूहाच्या ठायीं-२० इच्छा न ठेवितां २१ सद्रूप आत्म्याच्या ठायीं २२ कैवल्यमोक्षा-साठीं २३ सर्वकाळ २४ बुद्धीला ( स्थिर ) २५ कर-समाधि संपादन कर. ३७८

वैराग्य सर्व सुखाचें साधन आहे, ह्मणून तें अवश्य संपादन करावें. ॥ ३७८ ॥

**आशां छिन्धि विषोपमेषु विषयेष्वेषैव मृत्योः कृति-**
**स्त्यक्त्वा जातिकुलाश्रमेष्वभिमतिं मुञ्चातिदूरात्क्रियाः ।**
**देहादावसति त्यजात्मधिषणां प्रज्ञां कुरुष्वात्मनि**
**त्वं द्रष्टास्यमनोऽसि निर्द्वयपरं ब्रह्मासि यद्वस्तुतः ३७९**

आशां । छिन्धि । विषोपमेषु । विषयेषु । एषा । एव । मृत्योः । कृतिः । त्यक्त्वा । जातिकुलाश्रमेषु । अभिमतिं । मुञ्च । अतिदूरात् । क्रियाः ॥ देहादौ । असति । त्यज । आत्मधिषणां । प्रज्ञां । कुरुष्व । आत्मनि । त्वं । द्रष्टा । असि । अमनः । असि । निर्द्वयपरं । ब्रह्म । असि । यद् । वस्तुतः ॥ ३७९ ॥

**अर्थः**—१ विषाप्रमाणें मारक ( अशा २ विषयां विषयीं ( स्वभावतः उत्पन्न होणारी ) ३ आशा ४ तोडून टाक-विषयांची आशा करूं नको-

५ ही विषयाशा-६ च ७ मृत्यूची ८ आकृति ( आहे )-मृत्यूरूपानें शरीरांत वास करीत आहे-९ जाति, कुल, आश्रम ह्यांविषयींचा १० अभिमान ११ टाकून ( तज्जन्य सकाम ) १२ कर्मांना १३ फार लांबूनच १४ सोडून दे-मनानें सुद्धा त्यांचें चिंतन करूं नको;- १५ मिथ्याभूत १६ देहादिकांवरील १७ आत्मबुद्धीचा १८ त्याग कर, ( आणि ) १९ आत्मस्वरूपीं २० बुद्धि ( स्थिर ) २१ कर. २२ तूं २३ साक्षी २४ आहेस, २५ सर्वमनोविकाररहित २६ आहेस. २७ कारण ( तूं ) २८ वास्तविक निरुपाधिस्वरूपानें २९ अद्वैत ( व सर्वांहून ) पर ( असें जें ) ३० ब्रह्म ( तेंच ) ३१ आहेस ॥ ३७९ ॥

३६९ व्या श्लोकांत सांगितलेल्या निराशेचें वर्णन केलें. ॥ ३७९ ॥

**लक्ष्ये ब्रह्मणि मानसं दृढतरं संस्थाप्य बाह्येन्द्रियं स्वस्थाने विनिवेश्य निश्चलतनुश्चोपेक्ष्य देहस्थितिम् । ब्रह्मात्मैक्यमुपेत्य तन्मयतया चाखण्डवृत्त्याऽनिशं ब्रह्मानन्दरसं पिबात्मनि मुदा शून्यैः किमन्यैर्भृशम् ॥ ३८० ॥**

लक्ष्ये । ब्रह्मणि । मानसं । दृढतरं । संस्थाप्य । बाह्येन्द्रियं । स्वस्थाने । विनिवेश्य । निश्चलतनुः । च । उपेक्ष्य । देहस्थितिम् ॥ ब्रह्मात्मैक्यं । उपेत्य । तन्मयतया । च । अखण्डवृत्त्या । अनिशं । ब्रह्मानन्दरसं । पिब । आत्मनि । मुदा । शून्यैः । किं । अन्यैः । भृशम् ॥ ३८० ॥

अर्थः—१ निरुपाधिक २ परमात्मस्वरूपीं ३ मनाला ४ निश्चल ५ करून, ( मनाहून भिन्न अशा ) ६ इतर सर्व इंद्रियांना ७ आप आपल्या गोळकांत ८ ठेवून ९ आणि १० स्थिरसुखादि आसन घालून ११ देहस्थिति ( कशी चालेल ही चिंता ) १२ न करितां १३ ब्रह्मात्मैक्याला १४ पावून-मी ब्रह्म आहें असा निश्चय करून-१५ आणि १६ ब्रह्मात्मरूपानें ( व ) १७ चिन्मात्रविषय बुद्धिवृत्तीनें १८ सर्वकाळ १९ ब्रह्मानंदरस २० स्वतांच्या ठायीं २१ आनंदानें २२ प्राशन कर-त्या रसाचा

अनुभव घे-२३ इतर २४ निष्फल ( साधनांनीं ) २५ मोठेंसें २६ काय ( फळ होणार आहे ? ) ॥ ३८० ॥

बाह्याभ्यंतर निरीहेचें ह्मणजे क्रियात्यागाचें वर्णन केलें ॥ ३८० ॥

**अनात्मचिन्तनं त्यक्त्वा कश्मलं दुःखकारणम् ।**
**चिन्तयात्मानमानन्दरूपं यन्मुक्तिकारणम् ॥३८१॥**

अनात्मचिन्तनं[3] । त्यक्त्वा[4] । कश्मलं[1] । दुःखकारणम्[2] ॥ चिन्तय[9] । आत्मानं[8] । आनन्दरूपं[7] । यद्[5] । मुक्तिकारणम्[6] ।३८१।

**अर्थः**—१ पापरूप ( व त्रिविध ) २ दुःखाला हेतु ( असें जें देहादि ) ३ अनात्म पदार्थांचें चिंतन ( तें ) ४ सोडून ५ जें मुक्तीचें ६ साधन ( आहे तें ) ७ आनंदरूप ८ आत्म्याचें ९ चिंतन कर. ॥ ३८१ ॥

पूर्वोक्त अर्थाचेंच संक्षेपानें विवरण केलें आहे. ॥ ३८१ ॥

**एष स्वयंज्योतिरशेषसाक्षी विज्ञानकोशे ***
**विलसत्यजस्रम् । लक्ष्यं विधायैनमसद्विलक्षण-**
**मखण्डवृत्त्यात्मतयानुभावय ॥ ३८२ ॥**

एषः[1] । स्वयंज्योतिः[2] । अशेषसाक्षी[3] । विज्ञानकोशे[4] । विलसति[6] । अजस्रम्[5] । लक्ष्यं[9] । विधाय[10] । एनं[8] । असद्विलक्षणं[7] । अखण्डवृत्त्या[11] । आत्मतया[12] । अनुभावय[13] ॥ ३८२ ॥

**अर्थः**—१ हा-आत्मा-२ स्वप्रकाश ( आणि ह्मणूनच ) ३ सर्वांचा साक्षी ( असून ) ४ बुद्धिरूप कोशांत ५ निरंतर ६ प्रकाशमान आहे. ७ असत्पदार्थांहून भिन्न-सद्रूप-( अशा ) ८ ह्या ( आत्म्याला ) ९ लक्ष्य १० करून-बाणाच्या निशाणाप्रमाणें एकाग्र चित्तानें त्याचें चिंतन करून-केवल चैतन्याला विषय करणाऱ्या वृत्तीनें ( तो ) ११ आपलें स्वरूप आहे-स्वतांहून भिन्न नाहीं-अशी १३ भावना कर. ॥ ३८२ ॥

---

* " विज्ञानकोशो " असा पाठ तीन प्रतींत आढळतो. " विज्ञान ह्मणजे बुद्धि आहे कोश ह्मणजे उपलब्धिस्थान ज्याचें तो विज्ञानकोशः " असा बहुव्रीहि समास करून त्याचा " एषः " या पदाशीं अन्वय करावा.

आत्मचिंतनाचा प्रकार सांगितला. ॥ ३८२ ॥

**एतमच्छिन्नया वृत्त्या प्रत्ययान्तरशून्यया ।**
**उल्लेखयन् विजानीयात् स्वस्वरूपतया स्फुटम् ३८३**

एतं । अच्छिन्नया । वृत्त्या । प्रत्ययान्तरशून्यया ॥ उल्लेखयन् । विजानीयात् । स्वस्वरूपतया । स्फुटम् ॥ ३८३ ॥

**अर्थः**–१ विजातीय प्रत्ययरहित २ अखंड ३ वृत्तीनें ४ ह्या ( आत्म्याची ) ५ भावना करून ( तो ) ६ आपलेंच रूप आहे असें ७ निःसंशय ८ जाणावें. ॥ ३८३ ॥

आत्मचिंतनाचाच प्रकार सांगितला. ॥ ३८३ ॥

**अत्रात्मत्वं दृढीकुर्वन्नहमादिषु संत्यजन् ।**
**उदासीनतया तेषु तिष्ठेत् स्फुटघटादिवत् ॥३८४॥**

अत्र । आत्मत्वं । दृढीकुर्वन् । अहमादिषु । संत्यजन् ॥ उदासीनतया । तेषु । तिष्ठेत् । स्फुटघटादिवत ॥ ३८४ ॥

**अर्थः**—१ ह्या ( साक्षी आत्म्याच्या ठायीं ) २ आत्मभावनेला ३ स्थिर करून ( व ) ४ अहंकारादि ( अनात्म पदार्थांवरील अहंता ममता ) ५ टाकून ६ ज्याप्रमाणें ( मलानें भरलेले व टाकून दिलेले ) घट वगैरे फुटले असतां ( त्यांबद्दल कोणीहि शहाणा मनुष्य शोक किंवा ते सांधण्याचा यत्न करीत नाहीं, तर केवळ उदासीन वृत्तीनें राहतो, ) तद्वत् ७ त्या ( अहंकारादि अनात्म पदार्थांची कांहीं हि स्थिति झाली तरी ) ८ उदासीनपणानें-हर्षविषाद न मानितां-९ रहावें. ॥ ३८४ ॥

स्वरूपाच्या ठायीं स्थिर होऊन अनात्म पदार्थांच्या सर्व अवस्थांत उदासीन असावें. ॥ ३८४ ॥

**विशुद्धमन्तःकरणं स्वरूपे निवेश्य साक्षिण्यव**
**बोधमात्रे । शनैः शनैर्निश्चलतामुपानयन्**
**पूर्णं स्वमेवानुविलोकयेत्ततः ॥ ३८५ ॥**

विशुद्धं । अन्तःकरणं । स्वरूपे । निवेश्य । साक्षिणि । अवबोधमात्रे ॥ शनैः । शनैः । निश्चलतां । उपानयन् । पूर्णं । स्वं । एव । अनु । विलोकयेत् । ततः ॥ ३८५ ॥

अर्थः–( ज्यापासून रजोगुण व तमोगुण निवृत्त झाले आहेत अशा ) १ शुद्ध २ मनाला ३ साक्षी ४ ज्ञानमात्र ५ चेतनात्म्याच्या ठिकाणीं ६ प्रविष्ट करून ७ हळु ८ हळु मोठ्या धैर्यानें-९ स्थिरतेला १० नेऊन-स्थिर करून-११ त्या १२ नंतर-चित्त स्थिर झाल्यावर-१३ अपरिच्छिन्न ( अशा ) आपल्या १४ आत्म्याचा १५ च १६ साक्षात्कार करावा. ३८५

आत्मावलोकनप्रकार सांगितला. ॥ ३८५ ॥

**देहेन्द्रियप्राणमनोहमादिभिः स्वाज्ञानकॢप्तैरखिलै-**
**रुपाधिभिः । विमुक्तमात्मानमखण्डरूपं**
**पूर्णं महाकाशमिवावलोकयेत् ॥ ३८६ ॥**

देहेन्द्रियप्राणमनोहमादिभिः । स्वाज्ञानकॢप्तैः । अखिलैः । उपाधिभिः ॥ विमुक्तं । आत्मानं । अखण्डरूपं । पूर्णं । महाकाशं । इव । अवलोकयेत् ॥ ३८६ ॥

अर्थः–१ आपल्याच अज्ञानानें कल्पिलेल्या २ देह, इंद्रियें, प्राण, मन, अहंकार इत्यादि ३ सर्व ४ उपाधींहून ५ वेगळ्या ६ आत्मस्वरूपाला केवळ ७ अखंडरूप ८ महाकाशा * ९ प्रमाणें ( अपरिच्छिन्न ) १० पूर्णरूप ११ अवलोकन करावें. ॥ ३८६ ॥

पूर्ण आत्मस्वरूप कसें अवलोकन करावें तें महाकाशाच्या दृष्टांतानें सांगितलें ३८६

**घटकलशकुसूलसूचिमुख्यैर्गगनमुपाधिशतै**

* आकाश ह्मणजे पोकळी, ती सर्वत्र परिच्छेदरहित आहे; ह्मणूनच तिला महाकाश ह्मणतात. परंतु घट, मठ, इत्यादि उपाधींत सांपडलेल्या परिच्छिन्न नसून परिच्छिन्न झाल्या सारखें भासणाऱ्या आकाशाला उपाधिभेदानें घटाकाश मठाकाश इत्यादि नांवे प्राप्त झालीं.

विमुक्तमेकम् । भवति न विविधं तथैव शुद्धं
परमहमादिविमुक्तमेकमेव ॥ ३८७ ॥

घटकलशकुसूलसूचिमुख्यैः । गगनं । उपाधिशतैः । विमुक्तं । एकम् । भवति । न । विविधं । तथा । एव । शुद्धं । परं । अहमादिविमुक्तं । एकं । एव ॥ ३८७ ॥

अर्थः–( ज्याप्रमाणे ) १ आकाश २ घट, कळस, कोठार, शंकु इत्यादि ३ शेंकडों उपाधींमुळें ( अनेकनामरूपानीं व्यवहारांत वापरलें जात असूनहि त्या उपाधीं पासून ) ४ वेगळें झालें असतां ५ नानाप्रकारचें ६ नसून ७ एक ८ आहे. ९ त्याप्रमाणें १० च ( अहंकारदेहादि उपाधींच्या योगानें नानाविध भासत असून हि त्या ) ११ अहंकारादिकांहून वेगळें केलें असतां १२ शुद्ध १३ परब्रह्म ( नानाविध नसून ) १४ एक १५ च ( आहे. ) ॥ ३८७ ॥

महाकाशाच्या दृष्टांताचें व त्यांतील दार्ष्टांताचें स्पष्टीकरण केलें आहे. ॥३८८॥

ब्रह्मादिस्तम्बपर्यन्ता मृषामात्रा उपाधयः ।
ततः पूर्णं स्वमात्मानं पश्येदेकात्मना स्थितम् ३८८

ब्रह्मादिस्तम्बपर्यन्ताः । मृषामात्राः । उपाधयः ॥ ततः । पूर्णं । स्वं । आत्मानं । पश्येत् । एकात्मना । स्थितम् ॥ ३८८॥

अर्थः–१ ब्रह्मदेवाच्या ( देहा ) पासून तों ( अति सूक्ष्म ) स्तंब नांवाच्या जीवाच्या ( अगर गवताच्या देहा ) पर्यंत २ उपाधि ३ केवळ मिथ्या आहेत, ४ ह्मणून ५ परिच्छेदरहित ( अशा ) ६ आपल्या ७ आत्म्याला ८ अद्वैतरूपानें ९ असलेला १० पहावें. ॥ ३८८ ॥

उपाधि मिथ्या आहेत व आत्मा अद्वैत आहे. ॥ ३८८ ॥

यत्र भ्रान्त्या कल्पितं तद्विवेके तत्तन्मात्रं नैव
तस्माद्विभिन्नम् । भ्रान्तेर्नाशे भाति दृष्टाहितत्वं
रज्जुस्तद्वद्विश्वमात्मस्वरूपम् ॥ ३८९ ॥

यत्र । भ्रान्त्या । कल्पितं । तद्विवेके । तत् । तन्मात्रं । न । एव । तस्मात् । विभिन्नम् ॥ भ्रान्तेः । नाशे । भाति । दृष्टाहितत्वं । रज्जुः । तद्वत् । विश्वं । आत्मस्वरूपम् ॥ ३८९॥

**अर्थः**–(जी गोष्ट) १ ज्या (अधिष्ठानावर अधिष्ठानाच्या) २ अज्ञानानें ३ आरोपित केलेली असते, ४ ती (गोष्ट) ५ त्या (अधिष्ठानाचा अध्यस्ताहून) पृथक् साक्षात्कार झाला असतां ६ त्या (अधिष्ठानाहून) ७ वेगळी ८ नसते ९ च (तर) १० त्या (अधिष्ठानरूपच असते. ज्याप्रमाणें रज्जूवर भासलेल्या सर्पाच्या) ११ भ्रांतीची (अधिष्ठानभूत रज्जूच्या साक्षात्कारानें) १२ निवृत्ति झाली असतां (भ्रमानें) १३ दृष्टीस पडलेलें सर्पस्वरूप (अधिष्ठानभूत) १४ रज्जुस्वरूपच १५ भासतें-अधिष्ठानाहून वेगळें दिसत नाहीं-१६ त्याप्रमाणें (आत्मस्वरूपीं कल्पित केलेलें) १७ विश्व (अधिष्ठानब्रह्म एकच आहे असा साक्षात्कार होऊन भ्रम निवृत्त झाला असतां) १८ आत्मस्वरूपच (आहे)-विश्वभान अविद्याकार्य आहे आणि आत्मैकत्वभान वास्तविक आहे. ॥ ३८९ ॥

विश्वभान आत्मस्वरूपाहून पृथक् नसून आत्मस्वरूपच आहे, व भासलेला भास मिथ्या आहे हें रज्जुसर्पाच्या दृष्टांतानें सांगितलें ॥ ३८९ ॥

**स्वयं ब्रह्मा स्वयं विष्णुः स्वयमिन्द्रः स्वयं शिवः ।**
**स्वयं विश्वमिदं सर्वं स्वस्मादन्यन्न किञ्चन ।३९०।**

स्वयं । ब्रह्मा । स्वयं । विष्णुः । स्वयं । इन्द्रः । स्वयं । शिवः ॥ स्वयं । विश्वं । इदं । सर्वं । स्वस्मात् । अन्यत् । न । किंचन ॥ ३९० ॥

**अर्थः**–१ आत्माच २ ब्रह्मदेव, ३ आत्माच ४ विष्णु, ५ आत्माच ६ इंद्र, ७ आत्माच ८ शिव, (आणि) ९ आत्माच १० हें ११ सर्व (स्थावरजंगमात्मक) १२ विश्व (आहे). १३ आत्म्याहून १४ दुसरें १५ कांहींहि (अणुमात्र देखील भिन्न) १६ नाहीं. ॥ ३९० ॥

ब्रह्मादि देव व सर्व विश्व एक आत्माच नटला आहे. आत्म्याहून भिन्न कांहीं नाहीं. ३९०

अन्तः स्वयं चापि बहिः स्वयं च स्वयं पुरस्तात् स्वयमेव पश्चात् । स्वयं ह्यवाच्यां स्वयमप्युदीच्यां तथोपरिष्टात्स्वयमप्यधस्तात् ॥ ३९१ ॥

अन्तः । स्वयं । च । अपि । बहिः । स्वयं । च । स्वयं । पुरस्तात् । स्वयं । एव । पश्चात् ॥ स्वयं । हि । अवाच्यां । स्वयं । अपि । उदीच्यां । तथा । उपरिष्टात् । स्वयं । अपि । अधस्तात् ॥ ३९१ ॥

**अर्थः**—( स्वप्नमनोराज्यादिकांत भासणारें ) १ आंतील-मानासिक किंवा आविद्यक जग-२ आत्माच ( आहे ), ३ आणि ४ बाहेरील-जागृतींत दिसणारें स्थूल जग-५ देखील ६ आत्मा ७ च ( आहे ). ८ आत्माच ९ पुढें-पूर्व दिशेस, १० आत्मा ११ च १२ मागें-पश्चिम दिशेस, १३ आत्मा १४ च १५ दक्षिणेस ( आणि ) १६ आत्मा १७ च १८ उत्तरेस ( आहे ). १९ तसेंच २० आत्मा २१ च २२ वर- आकाशस्वर्गादिकांत-( व ) २३ खालीं-पातालादिकांत-( आहे ).

सर्वत्र आत्माच ओतप्रोत भरलेला आहे. ॥ ३९१ ॥

तरङ्गफेनभ्रमबुद्बुदादि सर्वं स्वरूपेण जलं यथा तथा । चिदेवदेहाद्यहमन्तमेतत् । सर्वं चिदेवैकरसं विशुद्धम् ॥ ३९२ ॥

तरङ्गफेनभ्रमबुद्बुदादि । सर्वं । स्वरूपेण । जलं । यथा । तथा ॥ चित् । एव । देहाद्यहमन्तम् । एतत् । सर्वं । चित् । एव । एकरसं । विशुद्धम् ॥ ३९२ ॥

**अर्थः**—१ ज्याप्रमाणें २ लाटा, फेंस, भोंवरे, बुडबुडे इत्यादि ३ सर्व ४ स्वरूपानें ५ जलच ( आहे ), ६ त्याप्रमाणें ७ देहापासून अहंकारापर्यंत ८ चैतन्य ९ च ( आहे ). १० हा-शब्दादि विषयसमूह-११

सर्व १२ एकरस १३ निर्मल १४ चैतन्य १५ च ( आहे. चैतन्याहून निराळें जग ह्मणून कांहीं नाहीं ).

सर्व चैतन्यच आहे, त्यावांचून अन्य कांहीं नाहीं हें जलाच्या दृष्टांतानें स्पष्ट केलें आहे. ॥ ३९२ ॥

**सदेवेदं सर्वं जगदवगतं वाङ्मनसयोः**
**सतोऽन्यन्नास्त्येव प्रकृतिपरसीम्नि स्थितवतः ।**
**पृथक् किं मृत्स्नायाः कलशघटकुम्भाद्यवगतं**
**नदत्येष भ्रान्तस्त्वमहमिति मायामदिरया ॥३९३॥**

सत्[6] । एव[7] । इदं[3] । सर्वं[4] । जगत्[5] । अवगतं[2] । वाङ्मनसयोः[1] । सतः[10] । अन्यत्[11] । न[14] । अस्ति[12] । एव[13] । प्रकृतिपरसीम्नि[8] । स्थितवतः[9] ॥ पृथक्[19] । किं[18] । मृत्स्नायाः[17] । कलशघटकुम्भादि[15] । अवगतं[16] । वदति[26] । । एषः[20] । भ्रान्तः[21] । त्वं[22] । अहं[23] । इति[24] । मायामदिरया[25] ३९३

अर्थः—१ वाणी आणि मन यांना कळणारें ३ हें ४ सर्व ( अनात्मरूप ) ५ जग ६ ब्रह्म ७ च ( आहे ). ८ मायेहून पलीकडे ( आपल्या महिम्यांतच ) ९ असणाऱ्या १० ब्रह्माहून ( तें ) ११ भिन्न १२ होत १३ च १४ नाहीं. १५ कलश, घट, कुंभ इत्यादि ( नांवांनीं जो मातीचा पदार्थ ) १६ समजण्यांत येतो, ( तो ) १७ मातीहून १८ काय १९ वेगळा ( असतो ? अर्थात् नसतो ). २० हा ( ब्रह्माहून जग वेगळें आहे असें ह्मणणारा जीव ) २१ भ्रमिष्ट ( होऊन ) २२ तूं २३ मीं २४ असें २५ मायारूप मदिरेच्या निशेंत २६ बोलत असतो. ॥३९३॥

जग ब्रह्माहून भिन्न नसून ब्रह्मच आहे हें मातीच्या दृष्टांतानें सांगितलें. ॥ ३९३ ॥

**क्रियासमभिहारेण यत्र नान्यदिति श्रुतिः ।**
**ब्रवीति द्वैतराहित्यं मिथ्याध्यासनिवृत्तये ॥३९४॥**

क्रियासमभिहारेण । यत्र । न[3] । अन्यत्[2] । इति । श्रुतिः । ब्रवीति । द्वैतराहित्यं । मिथ्याध्यासनिवृत्तये ॥ ३९४ ॥

**अर्थः**—१ ज्या ( ब्रह्मांत ) २ दुसरें कांहीं ३ नाहीं ४ अशी-" यत्र नान्यत् " या आरंभाची-५ श्रुति ६ पुनःपुनः कथन करून ( जीवाला झालेल्या दृश्यद्रष्ट्रादि ) ७ मिथ्या भेदभ्रमाची निवृत्ति व्हावी ह्मणून ८ अद्वैत तत्त्वच ९ सांगत आहे. ॥ ३९४ ॥

श्रुतीनें हि अद्वैत तत्त्वच प्रतिपादन केलें आहे. ॥ ३९४ ॥

**आकाशवन्निर्मलनिर्विकल्पं * निःसीम निष्पन्दन-**
**निर्विकारम् । अन्तर्बहिः शून्यमनन्यमद्वयं**
**स्वयं परं ब्रह्म किमस्ति बोध्यम् ॥ ३९५ ॥**

**आकाशवत् । निर्मलनिर्विकल्पं । निःसीम । निष्पन्दननिर्विकारम् ॥ अन्तर्बहिःशून्यं । अनन्यं । अद्वयं । स्वयं । परं । ब्रह्म । किं । अस्ति । बोध्यम् ॥ ३९५ ॥**

**अर्थः**—१ आकाशाप्रमाणें २ शुद्ध व भेदकल्पनारहित, ३ निरवधि-अपार-,४ निष्क्रिय व कूटस्थ, ५ बाह्यांतरकल्पनाविरहित, ६ वस्तुपरिच्छेदशून्य (आणि) ७ द्वैतवर्जित ( असें जें ) ८ पर ९ ब्रह्म ( तेंच ) १० मी स्वतां ( आहें; तर मग बोध्यस्वरूपच जो मी बोद्धा-ज्ञाता-त्या मला ) ११ जाणावयाचें १२ काय १३ आहे ? ॥ ३९५ ॥

ज्ञेयरूपानें ज्ञाता च असल्यामुळें ज्ञाता व ज्ञेय असा भेदच नाहीं. ॥ ३९५ ॥

**वक्तव्यं किमु विद्यतेऽत्र बहुधा ब्रह्मैव जीवः स्वयं**
**ब्रह्मैतज्जगदाततं नु सकलं ब्रह्माद्वितीयं श्रुतिः ।**
**ब्रह्मैवाहमिति प्रबुद्धमतयः संत्यक्तबाह्याः स्फुटं**
**ब्रह्मीभूय वसन्ति सन्ततचिदानन्दात्मनैतद्ध्रुवम् ३९६**

---

* " आकाशवन्निर्मलनिर्विकल्पनिःसीमनिष्पन्दननिर्विकारम् " असा पाठच बहुतेक प्रतींत आहे. " आकाशवत् " हें निराळें पद काढून बाकी राहिलेलें सर्व एक सामासिक पद आहे. अर्थात फरक नाहीं.

वक्तव्यं । किमु । विद्यते । अत्र । बहुधा । ब्रह्म । एव । जीवः । स्वयं । ब्रह्म । एतत् । जगत् । आततं । नु । सकलं । ब्रह्म । अद्वितीयं । श्रुतिः ॥ ब्रह्म । एव । अहं । इति । प्रबुद्धमतयः । संत्यक्तबाह्याः । स्फुटं । ब्रह्मीभूय । वसन्ति । सन्ततचिदात्मना । एतद् । ध्रुवम् ॥ ३९६ ॥

**अर्थः**—१ या ( जीवब्रह्मांच्या भेदसंबंधांत ) २ फार ३ काय ४ बोलावयाचें ५ आहे ? ६ जीव ७ स्वतः ८ ब्रह्म ९ च ( आहे ), १० हें ११ विस्तीर्ण १२ संपूर्ण १३ जग १४ हि १५ ब्रह्मच ( आहे ), १६ ब्रह्म १७ अद्वितीय ( आहे असें ) १८ श्रुति ( ह्मणते व ) १९ मी २० ब्रह्म २१ च ( आहे जीव नाहीं ) २२ अशी २३ निश्चितबोधयुक्त ( ज्यांची ) मति ( आहे ते गृहदारादि ) २४ बाह्य विषयांचा त्याग करून ( व ) २५ ब्रह्मस्वरूप होऊन २६ नित्यानंदचिदात्मस्वरूपानें २७ निःसंशय २८ वास करितात. २९ हें ३० खरें ( आहे ) ॥३९६॥

जीवब्रह्मांचा अभेद श्रुतीनें प्रतिपादित केला आहे व विद्वानांचा हि तसाच अनुभव आहे. ॥ ३९६ ॥

**जहि मलमयकोशेऽहंधियोत्थापिताशां प्रसभमनिलकल्पे लिङ्गदेहेऽपिपश्चात् । निगमगदितकीर्तिं नित्यमानन्दमूर्तिं स्वयमिति परिचीय ब्रह्मरूपेण तिष्ठ ॥ ३९७ ॥**

जहि । मलमयकोशे । अहंधिया । उत्थापिताशां । प्रसभं । अनिलकल्पे । लिङ्गदेहे । अपि । पश्चात् । निगमगदितकीर्तिं । नित्यं । आनन्दमूर्तिं । स्वयं । इति । परिचीय । ब्रह्मरूपेण । तिष्ठ ॥ ३९७ ॥

**अर्थः**—१ मलानें भरलेल्या स्थूल शरीरावरील २ अहंबुद्धीनें ३ उत्पन्न केलेल्या आत्मत्वाभिमानाला ४ नष्ट कर. ५ नंतर ६ वायुसारख्या

( अतिचपल-क्षणभंगुर- ) ७ लिंगदेहावरील ८ मुद्दा ( आशा ) ९ बलात्कारानें ( नष्ट कर; आणि ) १० वेदांनीं ज्याचा महिमा वर्णन केला आहे तो ११ अविनाशी १२ आनंदस्वरूप ( परमात्मा ) १३ मीच ( आहे ) १४ असा १५ निश्चय करून १६ ब्रह्मरूपानें १७ रहा. ॥ ३९७ ॥

स्थूल व लिंग देहांवरील आत्मत्वाभिमान नाहींसा करून स्वरूप निश्चयाच्या योगानें निश्चलनिर्विकारस्थितीनें राहण्याविषयीं शिष्यास उपदेश केला आहे. ॥ ३९७ ॥

**शवाकारं यावद्भजति मनुजस्तावदशुचिः**
**परेभ्यः स्यात्क्लेशो जननमरणव्याधिनिलयः ।**
**यदात्मानं शुद्धं कलयति शिवाकारमचलं**
**तदा तेभ्यो मुक्तो भवति हि तदाह श्रुतिरपि ३९८**

शवाकारं । यावद् । भजति । मनुजः । तावद् । अशुचिः । परेभ्यः । स्यात् । क्लेशः । जननमरणव्याधिनिलयः ॥ यदा । आत्मानं । शुद्धं । कलयति । शिवाकारं । अचलं । तदा । तेभ्यः । मुक्तः । भवति । हि । तद् । आह । श्रुतिः । अपि ॥ ३९८॥

**अर्थः**–१ मनुष्य २ जोंपर्यंत ३ प्रेतरूप ( देहावर अहंबुद्धीनें ) ४ आसक्ति ठेवीत आहे, ५ तोंपर्यंत ( तो ) ६ अपवित्र-निष्पाप न झालेलाच- ( आणि ), ७ जन्म, जरा, मृत्यु, रोग यांचें बिन्हाड ( आहे, व त्याला शत्रु, पुत्र, मित्र इत्यादि जे ) ८ पर त्यांपासून सुद्धां ९ दुःख १० होतें. ११ जेव्हां ( तो ) १२ स्वतांला १३ पापरहित, १४ परमानंदरूप ( व ) १५ निर्विकार ( असें ) १६ जाणतो, १७ तेव्हां १८ च ( तो ) १९ त्या ( जन्मादिक्लेशांपासून ) २० मुक्त २१ होतो. २२ श्रुति २३ देखील २४ तेंच-देहाभिमान्याला मृत्यु व देहाभिमानरहित पुरुषाला अमृतत्व-२५ सांगते. ॥ ३९८ ॥

देहाभिमानी पुरुषाला जन्मजरादि दुःख प्राप्त होतें, व देहाभिमानरहित पुरुषाला अमृतत्व प्राप्त होतें, ह्याला श्रुतिप्रमाण आहे हें सांगितलें. ॥ ३९८ ॥

**स्वात्मन्यारोपिताशेषाभासवस्तुनिरासतः ।**
**स्वयमेव परं ब्रह्म पूर्णमद्वयमक्रियम् ॥ ३९९ ॥**

स्वात्मनि । आरोपिताशेषाभासवस्तुनिरासतः । स्वयं । एव । परं । ब्रह्म । पूर्णं । अद्वयं । अक्रियम् ॥ ३९९ ॥

**अर्थः**—( साक्षीरूप ) १ आत्मस्वरूपाच्या ठायीं २ कल्पिलेल्या ( अहंकारादि ) संपूर्ण प्रातिभासिक पदार्थांच्या निषेधानें ३ पूर्ण, ४ अद्वैत ( आणि ) ५ अक्रिय ( असें ) ६ पर ७ ब्रह्म ८ आत्मस्वरूपानें ९ च ( प्रतीत होतें ). ॥ ३९९ ॥

आरोपिताच्या निवृत्तीनें आपलें ब्रह्मरूप प्रत्ययास येतें. ॥ ३९९ ॥

**समाहितायां सति चित्तवृत्तौ परात्मनि ब्रह्मणि निर्विकल्पे । न दृश्यते कश्चिदयं विकल्पः प्रजल्पमात्रः परिशिष्यते * ततः ॥ ४०० ॥**

समाहितायां । सति । चित्तवृत्तौ । परात्मनि । ब्रह्मणि । निर्विकल्पे ॥ न । दृश्यते । कश्चित् । अयं । विकल्पः । प्रजल्पमात्रः । परिशिष्यते । ततः ॥ ४०० ॥

**अर्थः**—१ निर्विकल्प, २ परमात्मस्वरूप, ३ सद्रूप ४ ब्रह्माच्या ठायीं ५ चित्तवृत्ति लीन ६ झाली असतां-निर्विकल्प समाधि सिद्ध झाला असतां-७ हा ( नामरूप ) ८ विकल्प ९ कांहीं हि १० दिसत ११ नाहीं, १२ तर १३ केवळ बोलणेंच १४ शिल्लक राहतें-स्वरूपप्राप्तीनंतर विकल्प वाचारंभणमात्र आहे. ॥ ४०० ॥

निर्विकल्प समाधींत नामरूपात्मक प्रपंचाचें भान होत नाहीं. ॥ ४०० ॥

**असत्कल्पो विकल्पोऽयं विश्वमित्येकवस्तुनि ।**
**निर्विकारे निराकारे निर्विशेषे भिदा कुतः ॥४०१॥**

---

* एका प्रतींत " यतः " असा पाठ आहे.

असत्कल्पः । विकल्पः । अयं । विश्वं । इति । एकवस्तुनि ॥ निर्विकारे । निराकारे । निर्विशेषे । भिदा । कुतः ॥ ४०१ ॥

**अर्थः**–( ९ अद्वितीय ब्रह्मांत ) १ विश्व ( आहे ) २ असा ३ हा ४ विकल्प ५ मिथ्या ( आहे ). ६ अपरिणामी ७ कार्यकारणशून्य ( आणि ) ८ नामजातिगुणक्रियारहित ( अशा ) ९ अद्वितीय ब्रह्मस्वरूपांत १० भेद ११ कोठून ( येणार )? ॥ ४०१ ॥

ब्रह्मांत भेदकल्पना कशी नाहीं हें सांगितलें. ॥ ४०१ ॥

**द्रष्टृदर्शनदृश्यादिभावशून्यैकवस्तुनि ।**
**निर्विकारे निराकारे निर्विशेषे भिदा कुतः ॥ ४०२ ॥**

द्रष्टृदर्शनदृश्यादिभावशून्यैकवस्तुनि । निर्विकारे । निराकारे । निर्विशेषे । भिदा । कुतः ॥ ४०२ ॥

**अर्थः**–१ निर्विकार, २ निराकार, ३ निर्विशेष ( आणि ) ४ द्रष्टा, दर्शन, दृश्य इत्यादिकांच्या ( द्रष्टृत्व, दर्शनत्व, दृश्यत्व इत्यादि ) विशेष धर्मरहित अद्वितीय वस्तुभूत ब्रह्माच्या ठायीं ५ भेद ६ कोठून ( येणार )?- द्रष्टा, दर्शन दृश्य इत्यादि एकमेकांपासून भिन्न असतात ह्मणूनच त्यांच्यांत द्रष्टृत्वादि विशेष धर्म असतात. परंतु जो सर्वात्मा आहे त्या परमात्म्याच्या ठिकाणीं एकाव्यक्तीचे विशेष धर्म कसे येतील?-॥ ४०२ ॥

ब्रह्मस्वरूपांत भेद नाहीं हेंच ह्या व पुढील तीन श्लोकांनीं सांगितलें आहे. द्रष्टृत्वादिधर्मरहित ब्रह्मांत भेद नाहीं हें या श्लोकांत सांगितलें. ॥ ४०२ ॥

**कल्पार्णव इवात्यन्तपरिपूर्णैकवस्तुनि ।**
**निर्विकारे निराकारे निर्विशेषे भिदा कुतः ॥ ४०३ ॥**

कल्पार्णवे । इव । अत्यन्तपरिपूर्णैकवस्तुनि ॥ निर्विकारे । निराकारे । निर्विशेषे । भिदा । कुतः ॥ ४०३ ॥

**अर्थः**–१ निर्विकार, २ निराकार, ३ निर्विशेष ( आणि ) ४ प्रलयकालच्या समुद्रा ५ प्रमाणें सर्वत्र ६ पसरलेल्या अपरिच्छिन्न अद्वितीय

ब्रह्मांत ७ भेद ८ कोठून ( येणार )? ॥ ४०३ ॥

सर्वत्र ओतप्रोत भरून असलेल्या ब्रह्मांत भेद नाहीं. ॥ ४०३ ॥

**तेजसीव तमो यत्र प्रलीनं भ्रान्तिकारणम् ।**
**अद्वितीये परे तत्त्वे निर्विशेषे भिदा कुतः ॥४०४॥**

तेजसि । इव । तमः । यत्र । प्रलीनं । भ्रान्तिकारणम् ॥ अद्वितीये । परे । तत्त्वे । निर्विशेषे । भिदा । कुतः ॥ ४०४ ॥

**अर्थः**—( सूर्यादिकांच्या ) १ प्रकाशांत २ ज्याप्रमाणें ३ अंधकार ( ६ अत्यंताभावरूप आहे, तद्वत् ) ४ ज्या ( ब्रह्मस्वरूपांत ) ५ भ्रांतीचें कारण ( अज्ञान ) ६ अत्यंत निरासरूप-स्वरूपानेंच नाहीं असें-( आहे त्या ) ७ द्वैतवर्जित, ८ भेदरहित ( मायेहून ) ९ पर ( अशा ) १० यथार्थ ( ब्रह्मस्वरूपांत ) ११ भेद १२ कोठून ( येईल )? ॥ ४०४ ॥

ब्रह्मस्वरूपांत भेदाचा असंभव आहे हें प्रकाश व तम ह्याच्या दृष्टांतानें सांगितलें. ४०४

**एकात्मके परे तत्त्वे भेदवार्ता कथं वसेत् ।**
**सुषुप्तौ सुखमात्रायां भेदः केनावलोकितः ॥४०५॥**

एकात्मके । परे । तत्त्वे । भेदवार्ता । कथं । वसेत् ॥ सुषुप्तौ । सुखमात्रायां । भेदः । केन । अवलोकितः ॥ ४०५ ॥

**अर्थः**-१ अद्वितीयस्वरूप, २ मायेहून पर ( अशा ) ३ वस्तुस्वरूप ( ब्रह्मांत ) ४ भेदाची गोष्ट ५ कशी ६ राहील-संभवेल-? ७ केवल आनंदरूप ( अशा ) ८ सुषुप्ति ( अवस्थेंत तूं किंवा दुसऱ्या ) ९ कोणीं १० भेद ११ पाहिला ( आहे काय )? ॥ ४०५ ॥

सुखमात्र अशा सुषुप्ति अवस्थेंत सुद्धा भेददर्शन नाहीं. ॥ ४०५ ॥

**नह्यस्ति विश्वं परतत्त्वबोधात्सदात्मनि ब्रह्मणि निर्विकल्पे । कालत्रये नाप्यहिरीक्षितो गुणे**

*** नह्यम्बुबिन्दुर्मृगतृष्णिकायाम् ॥ ४०६ ॥**

न । हि । अस्ति । विश्वं । परतत्त्वबोधात् । सदात्मनि । ब्रह्मणि । निर्विकल्पे ॥ कालत्रये । न । अपि । अहिः । ईक्षितः । गुणे । न । हि । अम्बुबिन्दुः । मृगतृष्णिकायाम् ॥ ४०६ ॥

**अर्थः**–१ परब्रह्माचा साक्षात्कार * होण्यापूर्वी हि २ सद्रूप ( आणि ) ३ निर्विकल्प ४ ब्रह्माच्या ठायीं ५ जग ६ आहे ( असें मुळीं ) ७ च ८ नाहीं. ९ रज्जूवर १० दिसलेला ११ सर्प १२ कालत्रयीं १३ हि १४ नसतोच. ( तसेंच ) १५ मृगजळांत १६ पाण्याचा थेंब १७ देखील १८ नसतो ॥ ४०६ ॥

परब्रह्माच्या ठायीं कालत्रयीं हि जग झालें नाही हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. ४०६

**मायामात्रमिदं द्वैतमद्वैतं परमार्थतः ।**
**इति ब्रूते श्रुतिः साक्षात् सुषुप्तावनुभूयते ॥३०७॥**

मायामात्रं । इदं । द्वैतं । अद्वैतं । परमार्थतः ॥ इति । ब्रूते । श्रुतिः । साक्षात् । सुषुप्तौ । अनुभूयते ॥ ४०७ ॥

**अर्थः**–१ हें २ द्वैत-भेद-३ केवळ अनिर्वचनीय ( व मिथ्या आहे, आणि ) ४ भेदरहित ( ब्रह्म ) ५ परमार्थ ( व अबाध्य आहे ); ६ असें ७ श्रुति ८ सांगत आहे. ९ सुषुप्तींत ( ह्या द्वैताच्या अभावाचा व अद्वैताच्या सद्भावाचा ) १० प्रत्यक्ष ११ अनुभव येतो. ॥ ४०७ ॥

अद्वैत ब्रह्मांत द्वैत झालेंच नाहीं हें श्रुतीनें हि सांगितलें आहे, व सुषुप्तींतील अनुभवावरून हि तसेंच ठरतें. ॥ ४०७ ॥

**अनन्यत्वमधिष्ठानादारोप्यस्य निरीक्षितम् ।**
**पण्डितै रज्जुसर्पादौ विकल्पो भ्रान्तिजीवनः ४०८**

---

* "नद्यम्बुबिन्दुः" ह्मणजे "नदीच्या पाण्याचा थेंब असा पाठ चार प्रतींत आहे.

* "परतत्त्वबोधात्" ह्या पदापुढें "प्रागपि" ह्याचा अध्याहार समजून हा अर्थ केला आहे. "परतत्त्वबोधानंतर" असाच अर्थ बहुतेक प्रतींत केलेला आहे.

अनन्यत्वं । अधिष्ठानात् । आरोप्यस्य । निरीक्षितम् ॥ पण्डितैः । रज्जुसर्पादौ । विकल्पः । भ्रान्तिजीवनः ॥ ४०८ ॥

अर्थः—१ आरोपित पदार्थ २ अधिष्ठानाहून ३ वेगळा नसतो ही गोष्ट ४ रज्जुसर्पादिकांच्या ठिकाणीं ५ विवेकी पुरुषांच्या ६ पाहण्यांत येते, ( आणि अज्ञान्यांच्या अनुभवास येणारा ) ७ भेद ८ केवळ भ्रांतीनें प्रतीत होतो. ॥ ४०८ ॥

प्रतीतीस येणारा भेद भ्रांतिजन्य आहे हें रज्जुसर्पादि दृष्टांतांत पाहण्यास येतें. ४०८

**चित्तमूलो विकल्पोऽयं चित्ताभावे न कश्चन ।**
**अतश्चित्तं समाधेहि प्रत्यग्रूपे परात्मनि ॥ ४०९ ॥**

चित्तमूलः । विकल्पः । अयं । चित्ताभावे । न । कश्चन ॥ अतः । चित्तं । समाधेहि । प्रत्यग्रूपे । परात्मनि ॥ ४०९ ॥

अर्थः—१ ह्या २ भेदभ्रमाचें ३ मूलकारण चित्त ( आहे ). ४ चित्ताचा लय झाला असतां ५ कांहीं हि ( विकल्प ) ६ नसतो. ७ यास्तव ८ साक्षीरूप ९ परमात्मस्वरूपीं १० चित्ताला ११ समाहित कर. ४०९

चित्तामुळें भेदभ्रम होतो, ह्मणून चित्तलय करावा. ॥ ४०९ ॥

**किमपि सततबोधं केवलानन्दरूपं**
**निरुपममतिवेलं नित्यमुक्तं निरीहम् ।**
**निरवधि गगनाभं निष्कलं निर्विकल्पं**
**हृदि कलयति विद्वान् ब्रह्मपूर्णं समाधौ ॥ ४१० ॥**

किं । अपि । सततबोधं । केवलानन्दरूपं । निरुपमं । अतिवेलं । नित्यमुक्तं । निरीहम् । निरवधि । गगनाभं । निष्कलं । निर्विकल्पं । हृदि । कलयति । विद्वान् । ब्रह्म । पूर्णं । समाधौ ॥ ४१० ॥

अर्थः-१ सर्वकाळ चिद्घनैकरस, ( सुखदुःखरहित ) २ केवलसुखरूप, ३ उपमारहित, ४ पारावाररहित, ५ कालत्रयीं हि बंधन न पावलेलें, ६ निःष्क्रिय, ७ निःसीम, ८ आकाशासारखें, ९ निरवयव, १० भेदशून्य ( आणि ) ११ पूर्ण ( असें जें ) १२ कोणी १३ एक-वाणीनें सांगतां न येणारें-१४ ब्रह्म ( त्याचा ) १५ ब्रह्मनिष्ठ पुरुष १६ समाधिकाळीं १७ चित्तांत १८ साक्षात्कार करितो. ॥ ४१० ॥

समाधिकाळीं साक्षात्कार होणाऱ्या ब्रह्माचें स्वरूप सांगितलें. ॥ ४१० ॥

**प्रकृतिविकृतिशून्यं भावनातीतभावं समरसमसमानं मानसम्बन्धदूरम् । निगमवचनसिद्धं नित्यमस्मत्प्रसिद्धं हृदि कलयति विद्वान् ब्रह्म पूर्णं समाधौ ४११**

प्रकृतिविकृतिशून्यं । भावनातीतभावं । समरसं । असमानं । मानसम्बन्धदूरम् * ॥ निगमवचनसिद्धं । नित्यं । अस्मत्प्रसिद्धं । हृदि । कलयति । विद्वान् । ब्रह्म । पूर्णं । समाधौ ॥ ४११ ॥

अर्थः—१ कार्यकारणभावविरहित, २ कल्पनारहितस्वभावाचें, ३ एकरस-निर्विकार-,४ अप्रतिम, ५ प्रमाणांच्या ( विषयविषयिभाव ) संबंधाला न शिवलेलें, ६ वेदांतवाक्यांनीं समजणारें ( आणि ) ७ सर्वकाळ ८ अहंप्रत्ययानें सिद्ध असलेल्या ९ पूर्ण १० ब्रह्माचा ११ ब्रह्मनिष्ठ पुरुष १२ समाधिकाळीं १३ चित्तांत १४ साक्षात्कार करितो. ४११

समाधिगम्य ब्रह्माचेंच स्वरूप सांगितलें. ॥ ४११ ॥

**अजरममरमस्ताभाववस्तुस्वरूपं स्तिमितसलिलराशिप्रख्यमाख्याविहीनम् । * समितगुणविकारं**

---

* " मानसं " ह्मणजे " शुद्ध मनाचा विषय " आणि " बन्धदूरं " ह्मणजे " कर्तृत्वादिबंधरहित " अशीं दोन पदें घेऊनहि अर्थ केलेला आहे.

* " शमितगुणविकारं " असाहि पाठ आढळतो. " शमित " ह्मणजे " शांत झालेले "

**शाश्वतं शान्तमेकं हृदि कलयति विद्वान्**
**ब्रह्म पूर्णं समाधौ ॥ ४१२ ॥**

अजरं । अमरं । अस्ताभाववस्तुस्वरूपं । स्तिमितसलिलराशिप्रख्यं । आख्याविहीनम् ॥ समितगुणविकारं । शाश्वतं । शान्तं । एकं । हृदि । कलयति । विद्वान् । ब्रह्म । पूर्णं । समाधौ ॥ ४१२ ॥

**अर्थः**–१ वार्द्धक्यविरहित, २ मृत्युवर्जित, ( प्रागभावादिसर्व ) ३ अभाव ज्यांत लय पावतात अशा प्रकारचें वस्तुस्वरूप; ४ निश्चल महासागराप्रमाणें अचल, ( अपार व एकरस. ), ५ शब्दाच्या सामर्थ्याचा अविषय, ६ ज्यामध्यें गुणदोष अस्त पावले आहेत असें, ७ अनादि, ८ रागद्वेषशून्य, ९ अद्वैत ( आणि ) १० पूर्ण ( अशा ) ११ ब्रह्माचा १२ ब्रह्मनिष्ठ पुरुष १३ समाधिकाळीं १४ चित्तांत १५ साक्षात्कार करितो. ॥ ४१२ ॥

समाधिगम्य ब्रह्मस्वरूपाच्या वर्णनाचा उपसंहार केला. ॥ ४१२ ॥

**समाहितान्तःकरणः स्वरूपे विलोकयात्मानमखण्डवैभवम् । विच्छिन्द्धि बन्धं भवगन्धगन्धितं यत्नेन पुंस्त्वं सफलीकुरुष्व ॥ ४१३ ॥**

समाहितान्तःकरणः । स्वरूपे । विलोकय । आत्मानं । अखण्डवैभवम् ॥ विच्छिन्द्धि । बन्धं । भवगन्धगन्धितं । यत्नेन । पुंस्त्वं । सफलीकुरुष्व ॥ ४१३ ॥

**अर्थः**–१ चित्त समाधिनिष्ठ करून २ आपल्या साक्षिरूपांत ३ अविनाशी आनंदरूप ऐश्वर्यवान् ४ परमात्मस्वरूपाचा ५ साक्षात्कार करत्यापासून आपणास भिन्न मानूं नको--६ जन्मांतरांतील वासनांनीं वेष्टित ( अशा ) ७ अहंकारादि संबंधाचा ८ नाश कर, ( आणि ) ९ समा-

धीच्या अभ्यासानें ( समाधिसुखानुभवरूप फल मिळवून ) १० पुरुषजन्माचें ११ सार्थक कर. ॥ ४१३ ॥

समाधीनें स्वरूपसाक्षात्कार करून जन्माचें सार्थक करण्याविषयीं शिष्यास प्रोत्साहन दिलें आहे. ॥ ४१३ ॥

**सर्वोपाधिविनिर्मुक्तं सच्चिदानन्दमद्वयम् ।**
**भावयात्मानमात्मस्थं न भूयः कल्पसेऽध्वने ।४१४।**

सर्वोपाधिविनिर्मुक्तं । सच्चिदानन्दं । अद्वयम् ॥ भावय । आत्मानं । आत्मस्थं । न । भूयः । कल्पसे । अध्वने ॥ ४१४ ॥

**अर्थः**–( स्थूल, सूक्ष्म व कारण ह्या ) १ सर्वउपाधींनीं वर्जित, २ सच्चिदानंदरूप, ३ अद्वैत ( व आपल्या ) ४ हृदयांत असलेल्या ५ आत्म्याचें ६ चिंतन कर. ( अशा चिंतनानें आत्मसाक्षात्कार झाला ह्मणजे ) ७ पुनः ( संसाराच्या ) ८ मार्गाला ९ योग्य होणार १० नाहींस-तुला पुनः संसार प्राप्त होणार नाहीं. ॥ ४१४ ॥

मनुष्य जन्म सफल कसा करावा तें सांगितलें. ॥ ४१४ ॥

**छायेव पुंसः परिदृश्यमानमाभासरूपेण**
**फलानुभूत्या । * शरीरमाराच्छववन्निरस्तं**
**पुनर्न संधत्त इदं महात्मा ॥ ४१५ ॥**

छाया । इव । पुंसः । परिदृश्यमानं । आभासरूपेण । फलानुभूत्या ॥ शरीरं । आरात् । शववत् । निरस्तं । पुनः । न । संधत्ते । इदं । महात्मा ॥ ४१५ ॥

**अर्थः**–( सुखदुःखरूप प्रारब्ध कर्माच्या ) १ फलभोगामुळें २ आभासरूपानें ३ पुरुषाच्या ४ छाये ५ सारखें ६ दिसणारें-केवळ प्रारब्ध कर्मामुळेंच ज्याचें आभासमात्र हि भान होत आहे, व प्रारब्ध कर्म नसेल तर

---

* " शरीर भारात् " असाहि एका प्रतींत पाठ आहे.

ज्याचें मुळींच भान होणार नाहीं तें-( आणि ह्मणूनच ) ७ प्रेताप्रमाणें ८ दूर ९ टाकिलेलें-देहात्मदृष्टित्यागानें निषिद्ध केलेलें-( जें ) १० हें ११ शरीर ( त्याचें ) १२ ब्रह्मनिष्ठ पुरुष १३ पुनः-समाधींतून उठल्या-वरहि-१४ चिंतन करीत १५ नाहीं. ॥ ४१५ ॥

शरीराध्यासनिवृत्तीनें जीवन्मुक्तिरूपहि फल प्राप्त होतें ॥ ४१५ ॥

**सततविमलबोधानन्दरूपं समेत्य त्यज जडमलरूपोपाधिमेतं सुदूरे । अथ पुनरपि नैष स्मर्यतां वान्तवस्तु स्मरणविषयभूतं कल्पते कुत्सनाय ४१६**

सततविमलबोधानन्दरूपं । समेत्य । त्यज । जडमलरूपोपाधिं । एतं । सुदूरे ॥ अथ । पुनः । अपि । न । एषः । स्मर्यतां । वान्तवस्तु । स्मरणविषयभूतं । कल्पते । कुत्सनाय ॥ ४१६ ॥

**अर्थः**—१ निरंतर शुद्धज्ञानरूप आणि आनंदरूप ( अशाआत्मस्वरूपाला ) २ प्राप्त होऊन-समाधिद्वारा स्वरूपानुभव घेऊन-३ ह्या ४ जड आणि मलरूप उपाधीला-देहाला-५अतिदूर ६ सोडून दे. ७ नंतर-समाधींतून उत्थान पावल्यावर-( समाधिकाळीं सोडून दिलेल्या ) ८ ह्या ( देहाचें ) ९ पुनः १० देखील ११ स्मरण करूं १२ नको. ( कारण ) १३ ओकून टाकलेला पदार्थ १४ स्मरणाचा विषय झालातर ( तो ) निंदेला ग्लानि उत्पन्न करण्याला-हेतू होतो. ( त्याप्रमाणेंच समाधिकाळीं, सोडून दिलेल्या विषयसुखाचें उत्थानकालीं स्मरण होणें लज्जास्पद आहे ). ॥ ४१६ ॥

समाधी काळीं ज्याप्रमाणें देहभान नसतें तद्वत् तें उत्थान काळीं हि नसावें. ।४१६।

**समूलमेतत्परिदह्य * वह्नौ सदात्मनि ब्रह्मणि निर्विकल्पे । ततः स्वयं नित्यविशुद्धबोधानन्दात्मना तिष्ठति विद्वरिष्ठः ॥ ४१७ ॥**

---

* "परिदाह्य" असा प्रयोजकरूपीं हि पाठ आहे. अर्थ तोच आहे.

समूलं । एतत् । परिदह्य । वह्नौ । सदात्मनि । ब्रह्मणि । निर्विकल्पे ॥ ततः । स्वयं । नित्यविशुद्धबोधानन्दात्मना । तिष्ठति । विद्वरिष्ठः ॥ ४१७ ॥

अर्थः–१ सद्रूप ( आणि ) २ निर्विकल्प ( अशा ब्रह्माभिन्न ) ३ आत्मसाक्षात्काररूप ४ अग्नींत ( अविद्यारूप ) ५ कारणासह ६ हा ( जडप्रपंच ) ७ निःशेष जाळून ८ त्या ( बोधाच्या ) योगानें ९ तत्त्ववेत्ता १० स्वतः ११ नित्यशुद्धबोधरूप व आनंदरूप होऊन १२ राहतो. ४१७

तत्त्ववेत्त्याच्याठायीं उत्कृष्ट समाधिनिष्ठा पाहण्यांत येते. ॥ ४१७ ॥

**प्रारब्धसूत्रग्रथितं शरीरं प्रयातु वा तिष्ठतु गोरिव * स्रक् । न तत्पुनः पश्यति तत्त्ववेत्तानन्दात्मनि ब्रह्मणि लीनवृत्तिः ॥ ४१८ ॥**

प्रारब्धसूत्रग्रथितं । शरीरं । प्रयातु । वा । तिष्ठतु । गोः । इव । स्रक् ॥ न । तत् । पुनः । पश्यति । तत्त्ववेत्ता । आनन्दात्मनि । ब्रह्मणि । लीनवृत्तिः ॥ ४१८ ॥

अर्थः–१ प्रारब्धरूप सूत्रांत गुंतवलेलें ( हें ) २ शरीर ३ गाईच्या ( गळ्यांतील ) ४ माळे ५ प्रमाणें ६ पडो ७ किंवा ८ राहो, ( पण ) ९ आनंदरूप १० ब्रह्माच्या ठायीं ( ज्याचें ) ११ चित्त निमग्न ( झालें आहे असा ) १२ ब्रह्मात्मज्ञाता १३ त्या ( शरीराकडे ) १४ पुनः १५ पहात १६ नाहीं-मृत्यूला भीत नाहीं किंवा जगण्याची इच्छा करीत नाहीं, तर प्रारब्धानुसार त्याची व्यवस्था होईल असें जाणून समाधिव्युत्थानकालीं हि ब्रह्मानंदांत निमग्न असतो. ॥ ४१८ ॥

समाधींतून उत्थान पावलेल्या ब्रह्मनिष्ठाच्या स्थितीचें वर्णन केलें आहे. ॥ ४१८ ॥

---

* " गोरिवासृक् " असा तीन प्रतींत पाठ आहे. " असृक् " म्हणजे " रक्त " " गाईच्या रक्ताकडे ज्याप्रमाणें कोणी पाहत नाहीं तद्वत् " असा अर्थ करून " पुनः न पश्यति " ह्या पदांबरोबर त्यांचा अन्वय करावा.

**अखण्डानन्दमात्मानं विज्ञाय स्वस्वरूपतः ।**
**किमिच्छन कस्य वा हेतोर्देहं पुष्णाति तत्त्ववित् ४१९**

अखण्डानन्दं । आत्मानं । विज्ञाय । स्वस्वरूपतः । [६]किं । इच्छन् । कस्य । वा । [१०]हेतोः । देहं[११] । [१२]पुष्णाति । तत्त्ववित् ४१९

**अर्थः**–१ ब्रह्मवेत्ता २ अखंडानंदरूप ३ परमात्मा ४ आपलें स्वरूप आहे ( असें ) साक्षात् ५ जाणून ६ कोणत्या ( भोगाची ) ७ इच्छा करून ८ अथवा ९ कोणत्या १० हेतूनें ११ देहाच्या १२ पोषणाचा यत्न करील? ॥ ४१९ ॥

बाह्यक्रियांच्या ठिकाणीं ब्रह्मवेत्त्याची प्रवृत्ति नसते. ॥ ४१९ ॥

**संसिद्धस्य फलं त्वेतज्जीवन्मुक्तस्य योगिनः ।**
**बहिरन्तः सदानन्दरसास्वादनमात्मनि ॥ ४२० ॥**

संसिद्धस्य । फलं । तु । एतत् । जीवन्मुक्तस्य । योगिनः ॥ बहिः । अन्तः । सदा । आनन्दरसास्वादनं । आत्मनि ।४२०।

**अर्थः**––१ आत्मज्ञाननिष्ठ, २ जीवन्मुक्त ( व ) ३ समाधिनिष्ठ ( अशा पुरुषाला ) ४ सर्वकाळ ५ आत्मस्वरूपीं ६ बाहेर ७ आंत ८ आनंदरसाचा ( साक्षात्काररूप ) स्वाद मिळणें ९ हें १० च ११ फळ ( आहे; आणि समाधि न करणाराला विक्षेपबाहुल्यामुळें कदाचित्च आनंदरसाचा अनुभव होतो ). ॥ ४२० ॥

समाधिनिष्ठ तत्त्ववेत्त्याला प्राप्त होणारें विशेष फळ सांगितलें. ॥ ४२० ॥

**वैराग्यस्य फलं बोधो बोधस्योपरतिः फलम् ।**
**स्वानन्दानुभवाच्छान्तिरेषैवोपरतेः फलम् ॥४२१॥**

वैराग्यस्य । फलं । बोधः । बोधस्य । उपरतिः । फलम् ॥ स्वानन्दानुभवात् । शान्तिः । एषा । एव । उपरतेः । फलम् । ४२१ ।

**अर्थः**-( विषयदोषदर्शनानें उदयास आलेल्या ) १ त्यागेच्छेचें २ फळ ३ आत्मसाक्षात्कार ( हें आहे ), ४ आत्मसाक्षात्काराचें ५ फल ६ बाह्य-प्रवृत्तिनिरोध ( हें आहे, आणि ) ७ बाह्यप्रवृत्तिनिषेधाचें ८ फळ ९ आत्मानंदानुभवानें ( प्राप्त होणारी जी ) १० सर्वाभिलाषनिवृत्ति ११ ही १२ च ( होय ). ॥ ४२१ ॥

समाधीच्या योगानेंच सर्व दैवी संपत्ति सफल होते. ॥ ४२१ ॥

**यद्युत्तरोत्तराभावः पूर्वपूर्वं तु निष्फलम् ।**
**निवृत्तिः परमा तृप्तिरानन्दोऽनुपमः स्वतः । ४२२ ।**
**दृष्टदुःखेष्वनुद्वेगो विद्यायाः प्रस्तुतं फलम् ॥**

यदि । उत्तरोत्तराभावः । पूर्वपूर्वं । तु । निष्फलम् ॥ निवृत्तिः । परमा । तृप्तिः । आनन्दः । अनुपमः । स्वतः ॥ ४२२ ॥ दृष्टदुःखेषु । अनुद्वेगः । विद्यायाः । प्रस्तुतं । फलम् ॥

**अर्थः**-१ जर पहिल्याच्या २ पुढील ( जें फलरूप दुसरें त्याचा ) अभाव असेल, ३ तर ( तें ) ४ पूर्वींचें ( कारणरूप ) पहिलें ५ निष्फल ( आहे )-शांति नाहीं तर उपरति निष्फल आहे, उपरति नाहीं तर बोध निष्फल आहे आणि बोध नाहीं, तर वैराग्य निष्फल आहे-, ६ बाह्य विक्षेपांपासून उपरम, ७ निरंकुश ८ समाधान, ९ स्वरूपभूत १० अप्रतिम ११ आनंद ( आणि शीतोष्णादिकांपासून किंवा मानापमानांमुळें ) १२ अनुभवास येणाऱ्या दुःखांबद्दल १३ भय किंवा चिंता न वाटणें ( हें सर्व ) १४ ब्रह्मविद्येचें १५ प्रसिद्ध १६ फळ ( होय ). ॥ ४२२ ॥

समाधीवांचून सर्व साधनांची निष्फलता व ब्रह्मविद्येचें फळ हीं सांगितलीं. । ४२२ ।

**यत्कृतं भ्रान्तिवेलायां नाना कर्म जुगुप्सितम् ।**
**पश्चान्नरो विवेकेन तत्कथं कर्तुमर्हति ॥ ४२३ ॥**

यत् । कृतं । भ्रान्तिवेलायां । नाना । कर्म । जुगुप्सितम् ॥ पश्चात् । नरः । विवेकेन । तत् । कथं । कर्तुं । अर्हति । ४२३ ।

**अर्थः**–( अहंकारादिकांच्या ठायीं आत्मत्वबुद्धि होते अशा ) १भ्रांतीच्या वेळीं २ जें ३ अनेकप्रकारचें ( लौकिक किंवा वैदिक सकाम बाह्य-प्रवृत्तिरूप ) ф ४ श्रममात्र देणारें ५ कर्म ( अविवेकामुळें ) ६ केलें असेल, ७ तें ८ विवेकानें ( भ्रांतीचा नाश झाल्या ) ९ नंतर १० करण्यास ११ पुरुष १२ कसा १३ समर्थ होईल ? ॥ ४२३ ॥

ज्ञानोत्तर बाह्यप्रवृत्तिरूप कर्म ज्ञान्याकडून होत नाहीं. ॥ ४२३ ॥

**विद्याफलं स्यादसतो निवृत्तिः प्रवृत्ति रज्ञानफलं तदीक्षितम् । * तज्ज्ञाज्ञयोर्यन्मृगतृष्णिकादौ नो चेद्विदां दृष्टफलं किमस्मात् ॥ ४२४ ॥**

**विद्याफलं[3] । स्यात्[4] । असतः[1] । निवृत्तिः[2] । प्रवृत्तिः[5] । अज्ञानफलं[6] । तत्[10] । ईक्षितम्[11] । तज्ज्ञाज्ञयोः[9] । यत्[7] । मृगतृष्णिकादौ[8] । नो[13] । चेत्[12] । विदां[14] । दृष्टफलं[16] । किं[17] । अस्मात्[15] ॥ ४२४ ॥**

**अर्थः**–१ मिथ्याभूत ( बाह्य जगाकडे ) २ प्रवृत्ति न होणें ( हें ) ३ ब्रह्मविद्येचें फळ ४ होय, ( व बाह्यजगाकडे ) ५ प्रवृत्ति ( हें ) ६ अज्ञानाचें फळ ( होय ). ७ कारण ८ मृगजलादिकांच्या ठायीं ९ अधिष्ठानाचें ज्ञान असणाऱ्या व तें नसणाऱ्या ( अशा दोन प्राण्यांसंबंधानें ) १० तें ११ पाहण्यांत येतें-मृगजलाचें ज्ञान असणारा पुरुष त्यापासून निवृत्त होतो, व तें नसणारा मृगादि प्राणी त्याकडे प्रवृत्त होतो. १२ जर ( असें ) १३ न ( मानिलें तर ) १४ ब्रह्मवेत्त्यांना १५ ह्या ( ब्रह्मज्ञानापासून दुसरें ) १६ दृष्टफल १७ कोणतें. ( आहे. ) ? ॥ ४२४ ॥

---

ф " जुगुप्सितं " ह्याचा " निंद्य. " " कंटाळ वाणें " असा अर्थ होतो. एथें दुसरा अर्थच सयुक्तिक दिसतो. ज्ञानी निंद्य कर्मतर करणार नाहींच, पण बाह्य प्रवृत्तिहि वाढविणार नाहीं.

* " तज्ज्ञानयोः " असाहि पाठ आहे. " तज्ज्ञानयोः " ह्मणजे त्या दोन ज्ञानांचें-विद्येचें व अविद्येचें-ह्या पदाचा संबंध " दृष्टफलं " ह्या पदाकडे लावून " विद्येचें व अविद्येचें अनुक्रमे ह्या-निवृत्ति व प्रवृत्ती शिवाय दुसरें कोणतें फळ विद्वानांच्या पाहण्यांत येतें ? " असा अर्थ करावा.

ज्ञानी बाह्य जगापासून निवृत्त असतो हें व दृष्टांतानें स्पष्ट केलें आहे. ॥ ४२४ ॥

**अज्ञानहृदयग्रन्थेर्विनाशो यद्यशेषतः ।**
**अनिच्छोर्विषयः किंनु प्रवृत्तेः कारणं स्वतः ।४२५।**

अज्ञानहृदयग्रन्थेः । विनाशः । यदि । अशेषतः ॥ अनिच्छोः । विषयः । किं । नु । प्रवृत्तेः । कारणं । स्वतः ॥ ४२५ ॥

अर्थः–१ जर २ अज्ञानजन्य चित्तवृत्तिरूप ( कामादि ) बंधनाचा ३ सर्वथा ४ नाश ( होईल, तर ) ५ विषय ६ आपण होऊनच ( आपली ) ७ इच्छा न करणाऱ्या ( पुरुषाची आपणाकडे ) ८ प्रवृत्ति करण्यास ९ कारण ( होईल ) १० काय ११ ? ॥ ४२५ ॥

इच्छा नसल्यास विषयांकडे प्रवृत्ति होणार नाहीं. ॥ ४२५ ॥

**वासनानुदयो भोग्ये वैराग्यस्य ✤ तदावधिः ।**
**अहंभावोदयाभावो बोधस्य ❋ परमावधिः ।४२६।**
**लीनवृत्तेरनुत्पत्तिर्मर्यादोपरतेस्तु सा ।**

वासनानुदयः । भोग्ये । वैराग्यस्य तदा । अवधिः ॥ अहंभावोदयाभावः । बोधस्य । परमावधिः ॥ ४२६ ॥ लीनवृत्तेः । अनुत्पत्तिः । मर्यादा । उपरतेः । तु । सा ॥

अर्थः–( पुष्पमालाचंदन वनितादि बाह्य ) १ भोग्य पदार्थांच्या ठायीं ( जेव्हां संकल्पमात्रानेंहि ) २ संस्कार उगवणार नाहीं, ३ तेव्हां ४ वैराग्याची ५ सीमा ( झाली असें समजावें, आणि देहादि अनात्म वस्तूंच्या ठायीं आत्मबुद्धिरूप ) ६ अहंकाराचा उदय होणार नाहीं, ( तेव्हां ) ७ ज्ञानाची ८ उत्कृष्ट मर्यादा ( झाली ह्मणून समजावें ). ९ तसेंच ( ब्रह्माच्या ठिकाणीं ) १० लीन झालेल्या चित्तवृत्तिची ( पुनः ) ११

---

✤ " परोऽवधिः " असाहि पाठ आहे " परः " ह्मणजे " पराकाष्ठेचा. "

❋ " परमोऽवधिः " ह्या पाठांत समास केला नाहीं. इतकेंच.

उत्पत्ति न होणें-देहादि नामरूपात्मक अनात्म जगाच्या ठिकाणीं सत्यत्वाची बुद्धि न होणें-१२ ती १३ उपरतीची १४ मर्यादा (जाणावी). ४२६

वैराग्य, ज्ञान व उपरति यांच्या मर्यादा सांगितल्या ॥ ४२६ ॥

**ब्रह्माकारतया सदा स्थिततया निर्मुक्तबाह्यार्थधी-रन्यावेदितभोग्यभोगकलनो निद्रालुवद्बालवत्। स्वप्नालोकितलोकवज्जगदिदं पश्यन् क्वचिल्लब्धधीरास्ते कश्चिदनन्तपुण्यफलभुग्धन्यः स मान्यो भुवि। ४२७।**

ब्रह्माकारतया। सदा। स्थिततया। निर्मुक्तबाह्यार्थधीः। अन्यावेदितभोग्यभोगकलनः। निद्रालुवत्। बालवत्॥ स्वप्नालोकितलोकवत्। जगत्। इदं। पश्यन्। क्वचित्। लब्धधीः। आस्ते। कश्चित्। अनन्तपुण्यफलभुक्। धन्यः। सः।। मान्यः। भुवि ॥ ४२७ ॥

**अर्थः**–१ ब्रह्मरूपानें २ सर्वकाळ ३ राहिल्यानें (शब्दादि) ४ बाह्य विषयांपासून ज्याची बुद्धि निवृत्त झाली आहे असा, ५ झोंपेंत असलेल्या मनुष्याप्रमाणें (किंवा) ६ मुलाप्रमाणें (शिष्यादि) ७ इतरांनीं अर्पण केलेल्या (भक्ष्यभोज्यादि) भोग्य पदार्थांच्या ठिकाणीं ज्याची प्रवृत्ति होते असा, ८ स्वप्नांत पाहिलेल्या पदार्थांप्रमाणें ९ ह्या १० जगाला ११ पहात असून (स्वप्नांतील एखाद्या पदार्थाविषयीं जागृतींत जशी स्मृति होते तद्वत्) १२ एखाद्या विषयासंबंधानें * ज्याची १३ बुद्धिउदय पावते असा, (आणि) १४ अनंत पुण्यांचें फल जें (बोधसुख) त्याचा भोक्ता (शास्त्रार्थ जाणणाऱ्या हजारों पुरुषांमध्यें) कोणी १५ एखादाच १६ असतो. १७ तोच १८ पृथ्वीवर १९ धन्य (व) २० मान्य (आहे). ॥ ४२७ ॥

---

* "लब्धधीः" ह्याचा "ब्रह्माकारवृत्ति झालेला" असा एका प्रतींत अर्थ केलेला असून "क्वचित्" या पदाचा अन्वय "भुवि आस्ते" या पदांबरोबर केला आहे. "क्वचित्" ह्मणजे "विरळा."

समाधींतून उत्थान न पावलेल्या जीवन्मुक्ताच्या स्थितीचें वर्णन केलें आहे ॥ ४२७॥

**स्थितप्रज्ञो यतिरयं यः सदानन्दमश्नुते ।**
**ब्रह्मण्येव विलीनात्मा निर्विकारो विनिष्क्रियः ४२८**

स्थितप्रज्ञः[12] । यतिः[11] । अयं[10] । यः[1] । सदा[7] । आनन्दं[8] । अश्नुते[9] ॥
ब्रह्मणि[2] । एव[3] । विलीनात्मा[4] । निर्विकारः[5] । विनिष्क्रियः[6] ।४२८।

**अर्थः**–१ जो २ ब्रह्माच्याठायीं ३ च ४ चित्त लीन ( करितो ), ( कामादि ) ५ मनोविकाररहित ( असतो, शरीररक्षणासाठीं हि विशेष ) ६ उद्योग करीत नाहीं ( व ) ७ सर्वकाळ ८ ब्रह्मानंदाचा ९ अनुभव घेतो, १० तो ११ यति १२ स्थितप्रज्ञ ( समजावा ). ॥ ४२८ ॥

स्थितप्रज्ञाचें लक्षण सांगितलें. ॥ ४२८ ॥

**ब्रह्मात्मनोः शोधितयोरेकभावावगाहिनी ।**
**निर्विकल्पा च चिन्मात्रा वृत्तिः प्रज्ञेति कथ्यते ॥**
**सुस्थितासौ भवेद्यस्य स्थितप्रज्ञः स उच्यते।४२९।**

ब्रह्मात्मनोः[2] । शोधितयोः[1] । एकभावावगाहिनी[3] ॥ निर्विकल्पा[4] । च[5] । चिन्मात्रा[6] । वृत्तिः[7] । प्रज्ञा[8] । इति[9] । कथ्यते[10] ॥ सुस्थिता[13] । असौ[11] । भवेत्[14] । यस्य[12] । स्थितप्रज्ञः[16] । सः[15] । उच्यते[17] ॥ ४२९ ॥

**अर्थः**—( तत्पदत्वंपदांचा ) १ शोध करून वळलेल्याउपाधिरहित शुद्ध अशा २ ब्रह्म आणि आत्मा ह्यांच्या ( भेदाला टाकून ) ऐक्याला-ग्रहण करणारी, ४ संशयादिविरहित ५ आणि ६ केवळ चैतन्यासविषय करणारी ( जी ) ७ वृत्ति ( तिला ) ८ प्रज्ञा ९ असें १० ह्मणतात. ११ ती प्रज्ञा वृत्ति-१२ ज्याची ( ब्रह्माच्या ठायीं ) १३ सहज स्थिर १४ होईल १५ त्याला १६ स्थितप्रज्ञ १७ ह्मणतात. ॥ ४२९ ॥

स्थितप्रज्ञ या समासांतील प्रज्ञा शब्दाचा अर्थ सांगितला. ॥ ४२९ ॥

**यस्य स्थिता भवेत्प्रज्ञा यस्यानन्दो निरन्तरः ।**
**प्रपञ्चो विस्मृतप्रायः स जीवन्मुक्त इष्यते ॥४३०॥**

यस्य[1] । स्थिता[3] । भवेत्[4] । प्रज्ञा[2] । यस्य[5] । आनन्दः[6] । निरन्तरः[7] ॥ प्रपञ्चः[8] । विस्मृतप्रायः[9] । सः[10] । जीवन्मुक्तः[11] । इष्यते[12] ॥ ४३० ॥

**अर्थः**–१ ज्या ( विद्वानाची पूर्वोक्त ) २ प्रज्ञा ३ स्थिर ४ असेल, ५ ज्याचा ६ आत्मानंद ७ व्यवधानरहित ( असेल, व भोक्तृभोग्यादिरूप ) ८ प्रपंच ९ विसरल्यासारखाच ( असेल, ) १० त्याला ११ जीवन्मुक्त-जीवंतपणींच मुक्त-मानिलें आहे-तो जीवन्मुक्त समजावा. ॥ ४३० ॥

ह्या व ह्याच्या पुढील तेरा श्लोकांत जीवन्मुक्ताचें वर्णन केलें आहे. ह्या श्लोकांत जीवन्मुक्ताचीं स्थितप्रज्ञत्वादि तीन लक्षणें सांगितलीं आहेत. ॥ ४३० ॥

**लीनधीरपि जागर्ति यो * जाग्रद्धर्मवर्जितः ।**
**बोधो निर्वासनो यस्य स जीवन्मुक्त इष्यते ।४३१।**

लीनधीः[2] । अपि[3] । जागर्ति[4] । यः[1] । जाग्रद्धर्मवर्जितः[5] ॥ बोधः[8] । निर्वासनः[7] । यस्य[6] । सः[9] । जीवन्मुक्तः[10] । इष्यते[11] ॥ ४३१ ॥

**अर्थः**–जो ( ब्रह्माच्या ठायीं ) २ बुद्धिवृत्ति शांत झाली असून ३ हि ४ जागतो-सावध असतो-,( जागत असून हि विषय आणि इंद्रियें यांच्या संसर्गानें अर्थप्राप्तिरूप जे ) ५ जागृतीचे धर्म ( त्यांचा अभिमान ) धरीत नाहीं, ( आणि ) ६ ज्याला ७ विषयवासनारहित ८ ब्रह्मसाक्षात्कार ( झाला आहे ) ९ तो १० जीवन्मुक्त ११ समजावा. ॥ ४३१ ॥

स्वरूपजागृत्यादि तीन लक्षणें सांगितलीं. ॥ ४३१ ॥

**शान्तसंसारकलनः । कलावानपि निष्कलः । यस्य**
**चित्तं विनिश्चिन्तं स जीवन्मुक्त इष्यते ॥ ४३२ ॥**

शान्तसंसारकलनः[1] । कलावान्[2] । अपि[3] । निष्कलः[4] ॥ यस्य[5] । चित्तं[6] । विनिश्चिन्तं[7] । सः[8] । जीवन्मुक्तः[9] । इष्यते[10] ॥ ४३२ ॥

---

* " यो जागृद्धर्मवर्जितः " याबद्दल " जाग्रद्धर्मविवर्जितः " असा पाठ एका प्रतींत आहे. अर्थांत अंतर नाहीं. " यः " पदाचा अध्याहार केला आहे इतकेंच.

**अर्थः**–( आपला संसार कसा चालेल इत्यादि ) संसारसंबंधी कल्पना ज्याच्या साफ नाहींतशा झाल्या आहेत, ( इतरांच्या दृष्टीनें जो करचरणादि ) २ अवयववान् + ( दिसत असून ) ३ हि ( स्वतः निरवयव ब्रह्मरूप असल्यामुळें ) ४ * निरवयव ( आहे, आणि ) ५ ज्याचें ६ चित्त ( जीवनमरणादि ) ७ चिंतनरहित ( असतें ) ८ तो ९ जीवन्मुक्त १० समजावा. ॥ ४३२ ॥

संसारचिंताराहित्यादि तीन लक्षणें सांगितलीं. ॥ ४३२ ॥

**वर्तमानेऽपि देहेऽस्मिंश्छायावदनुवर्तिनि ।**
**अहन्ताममताभावो जीवन्मुक्तस्य लक्षणम् ।४३३।**

वर्तमाने । अपि । देहे । अस्मिन् । छायावत् । अनुवर्तिनि ।
अहन्ताममताभावः । जीवन्मुक्तस्य । लक्षणम् ॥ ४३३ ॥

**अर्थः**–( मिथ्याभूत-आभासमात्र-असल्यामुळें ) १ छायेप्रमाणें ✝२ बरोबर असणारें (जें) ३ हें ( प्रारब्धामुळें राहिलेलें ) ४ प्रत्यक्ष ५ हि ( दिसणारें ) ६ शरीर ( त्यावर मी स्थूल आहे, गोरा आहें इत्यादिरूप ) ७ अहंता ( व हें माझें शरीर उत्तम आहे इत्यादिरूप ) ममता उदयास न येणें ( हें ) ८ जीवन्मुक्ताचें लक्षण ( आहे ). ॥ ४३३ ॥

देहाच्या ठिकाणीं अहंता व ममता नसणें हें एक जीवन्मुक्तीचें लक्षण आहे. ।४३३।

**अतीताननुसन्धानं भविष्यदविचारणम् ।**
**औदासीन्यमपि प्राप्तं जीवन्मुक्तस्य लक्षणम् ।४३४।**

---

+ " कलावान् " याचे " प्राणादि षोडश कला असलेला, " " अणिमादि ऐश्वर्यांनें युक्त " असेहि अर्थ केलेले आहेत.

* " निष्कलः " याचे " प्राणादि षोडशकलारहित " " अणिमादिकांच्याठायीं अनासक्त " असेहि अर्थ आहेत.

✝ " ( निरोगी असल्यामुळें ) छायेप्रमाणें अनुकूल, " " छायेप्रमाणें मिथ्या " " ज्ञानोत्तर आभासरूपानें असणारें " असेहि अर्थ सयुक्तिक आहेत.

अतीताननुसंधानं । भविष्यदविचारणम् ॥ औदासीन्यं । अपि । प्राप्तं । जीवन्मुक्तस्य । लक्षणम् ॥ ४३४ ॥

**अर्थः**-( पूर्वी मला मोठें दुःख झालें किंवा सुख झालें अशा प्रकारचें ) १ होऊन गेलेल्या गोष्टींचें स्मरण न होणें, ( मला सुख कसें होईल इत्यादि ) २ भावी गोष्टींचा विचार न करणें, ( आणि वर्तमानकालीं ) ३ प्राप्त झालेलें ( सुखदुःख ) ४ हि ५ उदासीनपणानें-हर्षशोकांवांचून-( भोगणें हें ) ६ जीवन्मुक्ताचें ७ लक्षण ( आहे ). ॥ ४३४ ॥

भूत, भविष्य, वर्तमान ह्या तीन हि कालांतील सुखदुःखांविषयीं उदासीनता-असणें हें एक लक्षण सांगितलें. ॥ ४३४ ॥

**गुणदोषविशिष्टेऽस्मिन् स्वभावेन विलक्षणे ।**
**सर्वत्र समदर्शित्वं जीवन्मुक्तस्य लक्षणम् ॥४३५॥**

गुणदोषविशिष्टे । अस्मिन् । स्वभावेन । विलक्षणे ॥ सर्वत्र । समदर्शित्वं । जीवन्मुक्तस्य । लक्षणम् ॥ ४३५ ॥

**अर्थः**-१ ह्या ( दैव ) २ गुणयुक्त ( व आसुरी ) दोषयुक्त ( आणि ) ३ प्रकृतीनें ( सात्विक, राजस, तामस अशा ) ४ भिन्न भिन्न ( संसारी जीवसमूहांत, सगुण, सदोष, शुद्धस्वभाव, मलिनस्वभाव अशा ) ५ सर्वांच्या ठायीं ( गुणदोष चिंतन न करितां ) एकरस ६ ब्रह्मदृष्टि असणें-हें सर्व ब्रह्म आहे व मी हि ब्रह्म आहे असें पाहणें-( हें ) ७ जीवन्मुक्ताचें ८ लक्षण ( आहे ). ॥ ४३५ ॥

सर्वत्र समदृष्टिरूप लक्षण सांगितलें. ॥ ४३५ ॥

**इष्टानिष्टार्थसंप्राप्तौ समदर्शितयात्मनि ।**
**उभयत्राविकारित्वं जीवन्मुक्तस्य लक्षणम् ॥४३६॥**

इष्टानिष्टार्थसंप्राप्तौ । समदर्शितया । आत्मनि ॥ उभयत्र । अविकारित्वं । जीवन्मुक्तस्य । लक्षणम् ॥ ४३६ ॥

**अर्थः**–( लौकिकदृष्ट्या ) १ सुखसाधन अगर दुःखसाधन प्राप्त झालें असतां हि २ सर्वत्र ब्रह्मबुद्धि असल्यामुळें ( हें इष्ट आहे किंवा अनिष्ट आहे ही कल्पनाच बुद्धींत न येऊन इष्ट व अनिष्ट ह्या ) ३ दोहोंविषयीं हि ४ मनांत ( हर्षविषादरूप ) ५ विकार न होणें ( हें ) ६ जीवन्मुक्तांचें ७ लक्षण ( आहे ). ॥ ४३६ ॥

इष्टार्थ प्राप्ति होवो किंवा अनिष्टार्थ प्राप्ति होवो. दोन्ही वेळीं मन विकाररहित असणें हें एक लक्षण आहे. ॥ ४३६ ॥

**ब्रह्मानन्दरसास्वादासक्तचित्ततया यतेः ।**
**अन्तर्बहिरविज्ञानं जीवन्मुक्तस्य लक्षणम् ॥४३७॥**

**ब्रह्मानन्दरसास्वादासक्तचित्ततया । यतेः ॥ अन्तः । बहिः । अविज्ञानं । जीवन्मुक्तस्य । लक्षणम् ॥ ४३७ ॥**

**अर्थः**–( चित्ताला समाहित करणाऱ्या ) १ यतीचें मन २ ब्रह्मानंदरूपरसाचा स्वाद घेण्यांत निमग्न झालेलें असल्यामुळें ( संस्काररूपानें ) ३ आंतील ( व स्थूलरूपानें ) ४ बाहेरील ( विकारांचें ) ५ भान न होणें ( हें ) ६ जीवन्मुक्तांचें ७ लक्षण ( आहे ). ॥ ४३७ ॥

बाह्यांतर विकारांचें भान न होणें हें एक लक्षण सांगितलें. ॥ ४३७ ॥

**देहेन्द्रियादौ कर्तव्ये ममाहंभाववर्जितः ।**
**औदासीन्येन यस्तिष्ठेत्स जीवन्मुक्तलक्षणः ॥४३८॥**

**देहेन्द्रियादौ । कर्तव्ये । ममाहंभाववर्जितः ॥ औदासीन्येन । यः । तिष्ठेत् । सः । जीवन्मुक्तलक्षणः ॥ ४३८ ॥**

**अर्थः**–१ जो २ देहेंद्रियादिकांवर-देह, इंद्रियें, मन, बुद्धि, प्राण व त्यांचे विषय यांवर-( आणि गृहधनादि ) ३ संपादनीय वस्तूंवर ( गृहादिक माझें व देहच मी अशी ) ४ ममता व अहंता न ठेवितां ५ रागद्वेषरहित होऊन ६ राहतो, ७ तो ८ जीवन्मुक्तलक्षण ( आहे ) ।४३८।

देहेंद्रियादिकांविषयीं अहंता ममता नसणें हें एक लक्षण आहे. ॥ ४३८ ॥

**विज्ञात आत्मनो यस्य ब्रह्मभावः श्रुतेर्बलात् ।**
**भवबन्धविनिर्मुक्तः स जीवन्मुक्तलक्षणः ॥ ४३९ ॥**

विज्ञातः । आत्मनः । यस्य । ब्रह्मभावः । श्रुतेः । बलात् ॥
भवबन्धविनिर्मुक्तः । सः । जीवन्मुक्तलक्षणः ॥ ४३९ ॥

अर्थः—१ ज्यानें २ श्रुतिवचनांच्या ३ सामर्थ्यानें ४ आपलें ५ ब्रह्मत्व-मी ब्रह्म आहें असें-६ जाणिलें, ( व जो जन्मादि ) ७ संसाररूप बंधनांतून सुटला ८ तो ९ जीवन्मुक्तलक्षण ( आहे ). ॥ ४३९ ॥

ब्रह्मात्मैक्यज्ञान हें एक लक्षण आहे. ॥ ४३९ ॥

**देहेन्द्रियेष्वहंभाव इदंभावस्तदन्यके । यस्य**
**नो भवतः क्वापि स जीवन्मुक्त इष्यते ॥ ४४० ॥**

देहेन्द्रियेषु । अहंभावः । इदंभावः । तदन्यके ॥ यस्य । नो ।
भवतः । क्व । अपि । सः ) जीवन्मुक्तः । इष्यते ॥ ४४० ॥

अर्थः—१ देह आणि इंद्रियें यांच्या ठिकाणीं ( हींच मी आहें असा ) २ मिथ्याभिमान ( व ) ३ त्यांहून भिन्न ( जो घटादि पदार्थ ) त्याच्या ठिकाणीं ४ हा ( घट आहे इत्यादि ) प्रत्यय ( ह्या दोन्ही भावना ) ५ ज्याला ६ कोठें ७ हि ८ होत ९ नाहींत, १० तो ११ जीवन्मुक्त १२ समजावा. ॥ ४४० ॥

देहादिकांवर अहंभाव व घटादिकांवर इदंभाव नसणें हें एक लक्षण आहे.।४४०।

**न प्रत्यग्ब्रह्मणोर्भेदं * कदापि ब्रह्मसर्गयोः ।**
**प्रज्ञया यो विजानाति स जीवन्मुक्तलक्षणः ।४४१।**

न । प्रत्यग्ब्रह्मणोः । भेदं । कदा । अपि । ब्रह्मसर्गयोः ।
प्रज्ञया । यः । विजानाति । सः । जीवन्मुक्तलक्षणः ॥ ४४१ ॥

---

* " प्रत्यग्ब्रह्मणो भेदं " असा पाठ चार प्रतींत आहे. परंतु तो लेखकप्रमाद असावा असें वाटतें.

**अर्थः**–१ जो २ यथार्थदृष्टीच्या योगानें ३ त्वंपदार्थ व तत्पदार्थ यांचा-निरुपाधि चैतन्याचा-कूटस्थब्रह्माचा-( आणि ) ब्रह्म ( व ब्रह्माच्या ठायीं कल्पित जें ) जग यांचा ५ भेद ६ केव्हां ७ हि ८ नाहीं ( असें ) ९ जाणतो १० तो ११ जीवन्मुक्तलक्षण ( होय ). ॥ ४४१ ॥

जीव व ब्रह्म आणि ब्रह्म व सृष्टि यांचा अभेद जाणणें हें एक लक्षण होय. ४४१

**साधुभिः पूज्यमानेऽस्मिन् पीड्यमानेऽपि दुर्जनैः ।**
**समभावो भवेद्यस्य स जीवन्मुक्तलक्षणः ॥ ४४२ ॥**

साधुभिः । पूज्यमाने । अस्मिन् । पीड्यमाने । अपि । दुर्जनैः । समभावः । भवेत् । यस्य । सः । जीवन्मुक्तलक्षणः ४४२

**अर्थः**–१ ह्या ( स्थूल देहाची ) २ सज्जन ३ पूजा करोत् ( किंवा ) ४ दुर्जन ( त्यास ) ५ पीडा देवोत, तरी ६ सुद्धां ७ ज्या ( पुरुषाची पूजा करणारा व पीडा देणारा या उभयतांच्याहि ठिकाणीं ) ८ समदृष्टि-ब्रह्मभावनेनें प्रेम किंवा द्वेष यांचा अभाव-९ असेल, १० तो ११ जीवन्मुक्तलक्षण ( होय. ) ॥ ४४२ ॥

पूजक व पीडक या उभयतांच्या ठिकाणीं समदृष्टि असणें हें एक लक्षण ( होय )४४२

**यत्र प्रविष्टा विषयाः परेरिता नदीप्रवाहा**
**इव वारिराशौ । लीयन्ति सन्मात्रतया न**
**विक्रियामुत्पादयन्त्येष यतिर्विमुक्तः । ४४३ ।**

यत्र । प्रविष्टाः । विषयाः । परेरिताः । नदीप्रवाहाः । इव । वारिराशौ ॥ लीयन्ति । सन्मात्रतया । न । विक्रियां । उत्पादयन्ति । एषः । यतिः । विमुक्तः ॥ ४४३ ॥

**अर्थः**–१ ज्याप्रमाणें २ नद्यांचे प्रवाह ( उतरत्या भूभागांनीं प्रेरित होऊन ) ३ समुद्रामध्यें ( ७ प्रवेशकरितात तद्वत् ) ४ ज्या पुरुष-श्रेष्ठाप्रत प्रारब्धवशात् ) ५ इतरांनीं अर्पण केलेले ( भक्ष्य भोज्यादि )

६ विषय ७ प्राप्त होऊन ( त्यानें भोगिले असतांहि ) ८ ब्रह्मात्मरूपत्वानें ९ लीन होतात-ब्रह्मानंदालाच अभिव्यक्त करितात-, १० विकाराला-*विषयानंदभ्रमाला-११ उत्पन्न करीत १२ नाहींत-विषयप्राप्तीनें मी आतां तृप्त झालों अशी बुद्धि उत्पन्न करीत नाहींत-,( तो )१३ हा १४ विद्वान् १५ जीवन्मुक्त ( होय ). ॥ ४४३ ॥

प्रारब्धानें प्राप्त झालेले भोग हि विकाराला हेतु न होणें हें लक्षण सांगितलें. श्रीमद्भगवद्गीतेच्या दुसऱ्या अध्यायांतील “ प्रजहाति यदाकामान् ” या श्लोकानें आरंभ करून “ आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं ” ह्या श्लोकानें समाप्त केलेल्या विषयाचेंच ह्या जीवन्मुक्तलक्षणांत निरूपण केलें आहे. ॥ ४४३ ॥

**विज्ञातब्रह्मतत्त्वस्य यथापूर्वं न संसृतिः ।**
**अस्ति चेन्न स विज्ञातब्रह्मभावो बहिर्मुखः ।४४४।**

विज्ञातब्रह्मतत्त्वस्य[१]। यथापूर्वं[३]। न[४]। संसृतिः[२] ॥ अस्ति[६]। चेत्[५]। न[९]। सः[७]। विज्ञातब्रह्मभावः[८]। बहिर्मुखः[१०] ॥ ४४४ ॥

**अर्थः**–१ ज्याला ब्रह्मात्मैक्याचा साक्षात्कार झाला आहे, त्याची ( भोगांच्या ठिकाणीं ) २ प्रवृत्ति ३ पूर्वीं प्रमाणें-जशी अज्ञान दशेंत आसक्ति पूर्वक होत असे तशी-४ होत नसते. ५ जर ( ती आसक्तिपूर्वक ) ६ होत असेल, ( तर ) ७ तो ८ ब्रह्मात्मज्ञानी ९ नाहीं, ( परंतु ) १० बाह्यदृष्टि आहे. ॥ ४४४ ॥

ज्ञान्याची प्रवृत्ति आसक्तिपूर्वक नसते. ॥ ४४४ ॥

**प्राचीनवासनावेगादसौ संसरतीति चेत् ।**
**न सदेकत्वविज्ञानान्मन्दीभवति वासना ॥ ४४५ ॥**

प्राचीनवासनावेगात्[२]। असौ[१]। संसरति[३]। इति[४]। चेत्[५] ॥ न[६]। सदेकत्वविज्ञानात्[७]। मन्दीभवति[९]। वासना[८] ॥ ४४५ ॥

---

* “ विक्रियां ” ह्मणजे ‘ कर्तृत्वादि विकाराला ” असाहि अर्थ एके ठिकाणीं केलेला आहे.

**अर्थः**–१ हा-ब्रह्मनिष्ठ-२ पूर्वी केलेल्या × कर्माच्या वासनाबलानें ( विषयासक्तिपूर्वक ) ३ व्यवहार * करितो, ४ अशी ५ शंका होईल, तर ६ तसें नाहीं. ( कारण ) ७ सद्रूप व अद्वितीय ब्रह्माच्या ज्ञानानें ८ वासनाच ९ मंद होते-आसक्ति उत्पन्न करण्यास समर्थ नसते. । ४४५ ।

यथार्थ ब्रह्मज्ञानानें वासना मंद होते, ह्मणून ब्रह्मनिष्ठाची पूर्वकर्मवासनेनें आसक्तिपूर्वकच प्रवृत्ति होते असें ह्मणतां येणार नाहीं. ॥ ४४५ ॥

**अत्यन्तकामुकस्यापि वृत्तिःकुण्ठति मातरि ।**
**तथैव ब्रह्मणि ज्ञाते पूर्णानन्दे मनीषिणः ॥४४६॥**

**अत्यन्तकामुकस्य । अपि । वृत्तिः । कुण्ठति । मातरि । तथा । एव । ब्रह्मणि । ज्ञाते । पूर्णानन्दे । मनीषिणः ॥ ४४६ ॥**

**अर्थः**–१ निरंतर कामलंपट असणाऱ्या पुरुषाची २ हि ३ भोगेच्छा ( आपल्या ) ४ मातेच्या ठिकाणीं ५ कुंठित ( होते ). ६ त्याप्रमाणें ७ च ८ पूर्ण आनंदरूप ९ ब्रह्माचा १० साक्षात्कार झाला असतां, ( विषयानंदभ्रांति नष्ट होऊन ) ११ ब्रह्मवेत्त्या पुरुषाची ( संसारहेतुवासना मंद होऊन कार्य करण्याला समर्थ होत नाहीं ). ॥ ४४६ ॥

ब्रह्मवेत्त्यांची प्रवृत्तिविषयक वासना मंद होते हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. ॥४४६॥

**निदिध्यासनशीलस्य बाह्यप्रत्यय ईक्ष्यते ।**
**ब्रवीति श्रुतिरेतस्य प्रारब्धं फलदर्शनात् ॥४४७॥**

**निदिध्यासनशीलस्य । बाह्यप्रत्ययः । ईक्ष्यते ॥ ब्रवीति ॥ श्रुतिः । एतस्य । प्रारब्धं । फलदर्शनात् ॥ ४४७ ॥**

---

+ " प्राचीनवासनावेगात् " ह्याचा " अनादिवासनांच्या प्रवाहानें " असा हि अर्थ केलेला आहे.

* " असौ संसरति " ह्याचे " अज्ञान कर्तृत्वादिरूप " किंवा " जन्ममरणरूप " संसार विद्वानाला पुनःप्राप्त होईल असे हि अर्थ केलेले आढळतात.

अर्थः–१ स्वाभाविक समाधीचा अभ्यास करणाऱ्या विद्वानाच्या ठायीं ( उपदेशभोजनपानादि ) २ बाह्य व्यवहार ३ पाहण्यांत येतो. ( परंतु समाधींतून उत्थान पावलेल्या ह्या विद्वानाच्या ठायीं जो हा ) ४ भोगरूप व्यवहार पाहण्यांत येतो त्यावरून ( तें ) ५ ह्या ( विद्वानाचें ) ६ प्रारब्ध ( आहे असें ) ७ श्रुति ८ कथन करिते. ॥ ४४७ ॥

श्रुतीनें प्रारब्धरूपानें कथन केलेली विद्वानाची आसक्तिरहित बाह्यप्रवृत्ति अनिष्ट नाहीं. ॥ ४४७ ॥

**सुखाद्यनुभवो यावत्तावत्प्रारब्धमिष्यते । फलोदयः क्रियापूर्वो निष्क्रियो न हि कुत्रचित् ॥ ४४८ ॥**

सुखाद्यनुभवः । यावत् । तावत् । प्रारब्धं । इष्यते ॥ फलोदयः । क्रियापूर्वः । निष्क्रियः । न । हि । कुत्रचित् ।४४८।

अर्थः–१ जोंपर्यंत २ कर्मफलांचे भोग ( घडत आहेत ), ३ तोंपर्यंत ४ प्रारब्ध-ह्या शरीराच्या आरंभाला हेतूभूत कर्म-( आहे असें ) ५ मानावें लागतें. ( कारण ) ६ कार्याचा उदय-सुखदुःखादिकांचा भोग-( पूर्वीं केलेल्या पुण्यरूप किंवा पापरूप ) ७ कर्मापासून उत्पन्न होतो. ( तो आपलें कारण जें कर्म त्या ) ८ कर्मावांचून ९ कोठें हि-लोकांत परलोकांत-( पाहण्यांत येत ) १० नाहीं ११ च. ॥ ४४८ ॥

कारणावांचून कार्य नसतें, ह्मणून सुखदुःखादिकांच्या अनुभवावरून प्रारब्ध कर्माचें अनुमान करितां येतें. ॥ ४४८ ॥

**अहं ब्रह्मेति विज्ञानात्कल्पकोटिशतार्जितम् । सञ्चितं विलयं याति प्रबोधात्स्वप्नकर्मवत् ॥ ४४९ ॥**

अहं । ब्रह्म । इति । विज्ञानात् । कल्पकोटिशतार्जितम् ॥ सञ्चितं । विलयं । याति । प्रबोधात् । स्वप्नकर्मवत् ॥ ४४९ ॥

अर्थः–१ जागृति प्राप्त झाली असतां २ ज्याप्रमाणें स्वप्नांतील कर्में ( ९ लयास १० जातात तद्वत् ) ३ मी ४ ब्रह्म ( आहे ) ५ असें

६ ज्ञान झालें असतां ७ अनेक जन्मांत संपादित केलेलें ( ज्ञान होण्यापूर्वीचें ) ८ संचित कर्म ९ लयास १० जातें. ॥ ४४९ ॥

ज्ञानोत्तर संचित कर्माचा नाश होतो. ॥ ४४९ ॥

**यत्कृतं स्वप्नवेलायां पुण्यं वा पापमुल्बणम् ।**
**सुप्तोत्थितस्य किं तत्स्यात्स्वर्गाय नरकाय वा ४५०**

यत्[२] । कृतं[७] । स्वप्नवेलायां[१] । पुण्यं[३] । वा[४] । पापं[६] । उल्बणम्[५] । सुप्तोत्थितस्य[८] । किं[१४] । तत्[९] । स्यात्[१३] । स्वर्गाय[१०] । नरकाय[१२] । वा[११] ॥ ४५० ॥

**अर्थः**–१ स्वप्नाच्या वेळीं २ जें ( यज्ञादि ) ३ पुण्य ४ अथवा ( ब्रह्महत्यादि ) ५ भयंकर ६ पातक ७ केलेलें असेल, ८ तें ९ झोंपेतून जागा झालेल्या ( पुरुषाला ) १० स्वर्ग ११ किंवा १२ नरक देणारें १३ होईल १४ काय ? ॥ ४५० ॥

संचितकर्मनाशाविषयीं दिलेला स्वप्नदृष्टांत स्पष्ट करून दाखविला आहे. ॥४५०॥

**स्वमसङ्गमुदासीनं परिज्ञाय नभो यथा । न**
**श्लिष्यति च यत्किञ्चित्कदाचिद्भाविकर्मभिः ।४५१।**

स्वं[३] । असङ्गं[४] । उदासीनं[५] । परिज्ञाय[६] । नभः[१] । यथा[२] ॥ न[१३] । श्लिष्यति[१२] । च[८] । यत्[१०] । किञ्चित्[११] । कदाचित्[७] । भाविकर्मभिः[९] । ४५१ ।

**अर्थः**–१ आकाशा २ प्रमाणें ३ आपण ४ निर्लेप ( व ) ५ उदासीन ( आहों असें ) ६ जाणलें असतां ७ केव्हां ८ हि ९ भावी कर्माच्या योगानें १० अल्पमात्र ११ देखील ( आपण ) १२ लिप्त होत १३ नाहीं. ॥ ४५१ ॥

विद्वानाला भाविकर्माचा हि संबंध घडत नाहीं. ॥ ४५१ ॥

**न * नभो घटयोगेन सुरागन्धेन लिप्यते ।**
**तथात्मोपाधियोगेन तद्धर्मैर्नैव लिप्यते ॥ ४५२ ॥**

* “ नभो न ” असाहि पाठ आहे;

न । नभः । घटयोगेन । सुरागन्धेन । लिप्यते ॥ तथा । आत्मा । उपाधियोगेन । तद्धर्मैः । न । एवं । लिप्यते ॥ ४५२ ॥

अर्थः—( ज्याप्रमाणें मद्यानें भरलेल्या ) १ घटाचा संबंध होऊन हि २ आकाश ( त्या घटांतील ) ३ मद्याच्या वासानें ४ लिप्त होत ५ नाहीं, ६ त्याप्रमाणें ( अंतःकरणादि ) ७ उपाधींचा संबंध असून हि ८ त्या ( उपाधींच्या पुण्यपापादि ) धर्मांनीं ९ आत्मा १० लिप्त होत ११ नाहीं १२ च. ॥ ४५२ ॥

पूर्वश्लोकांतील आकाशाचा दृष्टांत स्पष्ट केला आहे. ॥ ४५२ ॥

ज्ञानोदयात्पुरारब्धं कर्म ज्ञानान्न नश्यति ।
अदत्वा स्वफलं लक्ष्यमुद्दिश्योत्सृष्टबाणवत् ॥४५३॥

ज्ञानोदयात् । पुरा । आरब्धं । कर्म । ज्ञानात् । न । नश्यति ॥ अदत्वा । स्वफलं । लक्ष्यं । उद्दिश्य । उत्सृष्टबाणवत् ॥४५३॥

अर्थः—( मृगादि ) १ निशाणाला २ उद्देशून ३ सोडलेला बाण ज्याप्रमाणें ( लक्ष्याचा वेध करणें हें ८ फळ ९ दिल्यावांचून ११ राहत १२ नाहीं तद्वत् ) ४ ज्ञानाचा उदय होण्याच्या ५ पूर्वींचें ( ज्याच्या योगानें हा देह प्राप्त झाला आहे तें ) ६ प्रारब्ध ( नांवाचें ) ७ कर्म ( भोगरूप ) ८ आपलें फल ९ दिल्यावांचून १० आत्मज्ञानानें हि ११ नष्ट होत १२ नाहीं. ॥ ४५३ ॥

प्रारब्धाचा भोगानेंच क्षय होतो हें सदृष्टांत सांगितलें. ॥ ४५३ ॥

व्याघ्रबुद्ध्या विनिर्मुक्तो बाणः पश्चात्तु गोमतौ ।
न तिष्ठति छिनत्त्येव लक्ष्यं वेगेन निर्भरम् ॥४५४॥

व्याघ्रबुद्ध्या । विनिर्मुक्तः । बाणः । पश्चात् । तु । गोमतौ ॥ न । तिष्ठति । छिनत्ति । एव । लक्ष्यं । वेगेन । निर्भरम् ॥४५४॥

अर्थः–( समोर येणाऱ्या प्राण्यावर ) हा १ वाघ आहे असें समजून ( धनुर्धाऱ्यानें ) २ सोडिलेला ३ बाण ४ मागाहून ५ जरी ही ६ गाय आहे असें समजलें ( तरी जावयाचा ) ७ थांबत ८ नाहीं. ( तो ) ९ अतिशय १० वेगानें ११ लक्ष्याला १२ छेदून टाकितो १३ च ॥ ४५४ ॥

पूर्वश्लोकांतील बाणाच्या दृष्टांताचें स्पष्टीकरण केलें आहे. ॥ ४५४ ॥

**प्रारब्धं बलवत्तरं खलु विदां भोगेन तस्य क्षयः**
**सम्यग्ज्ञानहुताशनेन विलयः प्राक्संचितागामिनाम् ।**
**ब्रह्मात्मैक्यमवेक्ष्य तन्मयतया ये सर्वदा संस्थितास्तेषां**
**तत् त्रितयं न हि क्वचिदपि ब्रह्मैव ते निर्गुणम् ४५५**

प्रारब्धं[3] । बलवत्तरं[4] । खलु[2] । विदां[1] । भोगेन[6] । तस्य[5] । क्षयः[7] । सम्यग्ज्ञानहुताशनेन[9] । विलयः[10] । प्राक्संचितागामिनाम्[8] ॥ ब्रह्मात्मैक्यं[11] । अवेक्ष्य[12] । तन्मयतया[13] । ये[14] । सर्वदा[15] । संस्थिताः[16] । तेषां[17] । तत्[18] । त्रितयं[19] । न[22] । [23]हि । क्वचित्[20] । अपि[21] । ब्रह्म[26] । एव[27] । ते[24] । निर्गुणम्[25] ॥ ४५५ ॥

अर्थः–१ विद्वानांचें २ देखील ३ प्रारब्ध ४ अवश्य भोग देणारें ( असतें ). ५ त्याचा ६ भोगानें ७ नाश ( होतो ). ८ पूर्वींचें संचित व पुढील क्रियमाण ह्या कर्मांचा ९ ब्रह्मात्मैक्यज्ञानरूप अग्नीनें १० नाश ( होतो ) ११ ब्रह्मात्मैक्याचा १२ साक्षात्कार करून १३ ब्रह्मात्मतेनें १४ जे ( पुरुष ) १५ सर्वकाळ १६ राहतात, १७ त्यांना १८ तीं ( संचित, प्रारब्ध व क्रियमाण अशीं ) १९ तिन्ही ( कर्में ) २० कधीं २१ हि २२ नसतात २३ च. ( कारण ) २४ ते ( महात्मे ) २५ निर्गुण २६ ब्रह्म २७ च ( होत. ब्रह्माहून भिन्न नाहींत. म्हणून त्यांस कर्मसंबंध नाहीं ). ॥ ४५५ ॥

भोगानें प्रारब्धाचा व ज्ञानानें संचितक्रियमाणांचा क्षय होतो हें इतरांच्या दृष्टीनें

आहे परंतु अपरोक्ष साक्षात्कारवान् पुरुष ब्रह्मच असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं तिहींचाहि संबंध नाहीं. ॥ ४५५ ॥

उपाधितादात्म्यविहीनकेवलब्रह्मात्मनैवात्मनि
तिष्ठतो मुनेः । प्रारब्धसद्भावकथा न युक्ता
स्वप्नार्थसंबन्धकथेव जाग्रतः ॥ ४५६ ॥

उपाधितादात्म्यविहीनकेवलब्रह्मात्मना । एवं । आत्मनि । तिष्ठतः । मुनेः ॥ प्रारब्धसद्भावकथा । न । युक्ता । स्वप्नार्थसंबन्धकथा । इव । जाग्रतः ॥ ४५६ ॥

अर्थः—१ जागा झालेल्या. ( पुरुषाला ) २ ज्याप्रमाणें ३ स्वप्नांत ( पाहिलेल्या ) पदार्थांच्या ( ग्रहणत्यागादि ) संबंधाची गोष्ट ( १० संभवत ११ नसते तद्वत् अहंकारादि ) ४ उपाधींचें तादात्म्य नसून केवळ अद्वितीय ब्रह्मस्वरूपानें ५ च ६ हृदयाच्या * ठायीं ७ निष्ठेला प्राप्त झालेल्या ८ ब्रह्मनिष्ठ ( पुरुषाला ) ९ प्रारब्ध आहे हें ह्मणणें १० युक्त ११ नाहीं. ॥ ४५६ ॥

ब्रह्मात्मतेनें राहणाऱ्या पुरुषाला तिन्ही कर्मांचा संबंध नसतो हेंच दृष्टांतपूर्वक सांगितलें. ॥ ४५६ ॥

न हि प्रबुद्धः प्रतिभासदेहे देहोपयोगिन्यपि
च प्रपञ्चे । करोत्यहन्तां ममतामिदन्तां
किन्तु स्वयं तिष्ठति जागरेण ॥ ४५७ ॥

न । हि । प्रबुद्धः । प्रतिभासदेहे । देहोपयोगिनि । अपि । च । प्रपञ्चे ॥ करोति । अहन्तां । ममता । इदन्तां । किन्तु । स्वयं । तिष्ठति । जागरेण ॥ ४५७ ॥

---

* “ आत्मनि ” ह्याचा अर्थ “ प्रत्यगात्म्याच्या ठायीं ” असाहि केलेला आहे.

अर्थः-( स्वप्नांतून ) १ जागा झालेला ( पुरुष स्वप्नांत ) २ भासलेल्या देहावर ३ आणि ( त्या भासलेल्या ) ४ देहाला सुखसाधनभूत ( पुत्रवित्तगृहादि ) ५ प्रपंचावर ( स्वप्नांत पाहिलेला देह मी आहें अशा प्रकारची ) ७ अहंता, ( स्वप्नांतील पुत्र माझे आहेत अशी ) ८ ममता ( आणि स्वप्नांतील हें द्रव्य हें घर इत्यादि ) ९ इदंता १० करीत ११ नाहीं १२ च. १३ परंतु १४ स्वतां १५ जागेपणानें १६ असतो, ( तद्वत् ब्रह्मनिष्ठ ब्रह्मविद्येच्या ठिकाणीं जागा असतो. ॥ ४५७ ) ॥

जागा झालेल्या पुरुषाची स्वप्नदृष्ट पदार्थांवर मिथ्याबुद्धि कशी असते तें स्पष्ट सांगितलें. ॥ ४५७ ॥

**न तस्य मिथ्यार्थसमर्थनेच्छा न संग्रहस्तज्जगतोऽपि दृष्टः । तत्रानुवृत्तिर्यदि चेन्मृषार्थे न निद्रया मुक्त इतीष्यते ध्रुवम् ॥ ४५८ ॥**

न । तस्य । मिथ्यार्थसमर्थनेच्छा । न । संग्रहः । तज्जगतः । अपि । दृष्टः ॥ तत्र । अनुवृत्तिः । यदि । चेत् । मृषार्थे । न । निद्रया । मुक्तः । इति । इष्यते । ध्रुवम् ॥ ४५८ ॥

अर्थः-१ त्या ( जागा झालेल्या पुरुषाला स्वप्नांतील वित्तादि ) २ मिथ्याभूत पदार्थ गोळा करण्याची इच्छा ३ नसते, ( व ) ४ त्या ( स्वप्नांत पाहिलेल्या ) सृष्टीचें ५ संरक्षणादिक ६ हि ७ पाहण्यांत येत ८ नाहीं. ९ जर १० कदाचित् ११ त्या ( स्वप्नांत पाहिलेल्या वित्तादि ) १२ मिथ्याभूत पदार्थांच्या ठायीं ( कोणाची ) १३ प्रवृत्ति ( असेल, तर त्याला ) १४ झोंपेनें १५ खरोखर १६ सोडिलें १७ नाहीं १८ असें १९ निश्चयानें समजावें-तो जागा झालाच नाहीं. ॥ ४५८ ॥

पूर्वोक्त दृष्टांताचें विशेष स्पष्टीकरण केलें आहे. ॥ ४५८ ॥

**तद्वत्परे ब्रह्मणि वर्तमानः सदात्मना तिष्ठति नान्यदीक्षते । स्मृतिर्यथा स्वप्नविलोकितार्थे तथा विदः प्राशनमोचनादौ ॥ ४५९ ॥**

तद्वत् । परे । ब्रह्मणि । वर्तमानः । सदात्मना । तिष्ठति । न । अन्यत् । ईक्षते ॥ स्मृतिः । यथा । स्वप्नविलोकितार्थे । तथा । विदः । प्राशनमोचनादौ ॥ ४५९ ॥

अर्थः—१ त्या ( जागा झालेल्या पुरुषा ) प्रमाणें २ पर ३ ब्रह्माच्या ठायीं ४ असणारा-केवळ ब्रह्माकार वृत्तीनें राहणारा-( पुरुष ) ५ ब्रह्मरूपच होऊन ६ राहतो, ( व ब्रह्माहून ) ७ वेगळें ( कर्म किंवा त्याचें फळ यास ) ८ जाणत ९ नाहीं. १० ज्याप्रमाणें ११ स्वप्नांत पाहिलेल्या पदार्थांविषयीं ( जागा झालेल्या मनुष्याची ) १२ स्मृति ( मिथ्यार्थ विषयक असते ) १३ त्याप्रमाणें १४ ब्रह्मवेत्त्याची भोजन व मलोत्सर्ग इत्यादिकांच्या ठिकाणीं ( प्रवृत्ति असते )-ब्रह्मनिष्ठ पुरुषाच्या सर्व क्रिया स्वप्नदृष्ट पदार्थांच्या स्मृतीसारख्या असतात. ॥ ४५९ ॥

दृष्टांतानें सिद्ध झालेली गोष्ट दार्ष्टांतांत स्पष्ट करून दाखविली आहे. ॥ ४५९ ॥

**कर्मणा निर्मितो देहः प्रारब्धं तस्य कल्प्यताम् ।**
**नानादेरात्मनो युक्तं नैवात्मा कर्मनिर्मितः ॥४६०॥**

कर्मणा । निर्मितः । देहः । प्रारब्धं । तस्य । कल्प्यताम् ॥ न । अनादेः । आत्मनः । युक्तं । न । एव । आत्मा । कर्मनिर्मितः ॥ ४६० ॥

अर्थः—१ देह २ कर्मानें ३ उत्पन्न झाला आहे. ४ त्याला ५ प्रारब्ध ( आहे अशी पाहिजे तर ) ६ कल्पना करावी, ७ शाश्वत ८ आत्म्याच्या ठायीं ( ती कल्पना ) ९ योग्य १० नाहीं. ११ आत्मा कर्मानें १२ उत्पन्न झाला ( आहे असें ) १३ मुळींच १४ नाहीं. ॥ ४६० ॥

शरीराला प्रारब्ध आहे असें पाहिजे तर ह्मणावें, आत्मामात्र असंग आहे, व तेंच ब्रह्मवेत्त्याचें स्वरूप आहे. ॥ ४६० ॥

**अजो नित्यः शाश्वत इति ब्रूते श्रुतिरमोघवाक् ।**
**तदात्मना तिष्ठतोऽस्य कुतः प्रारब्धकल्पना ४६१**

अजः । नित्यः । शाश्वतः । इति । ब्रूते । श्रुतिः । अमोघवाक् ॥
तदात्मना । तिष्ठतः । अस्य । कुतः । प्रारब्धकल्पना ॥ ४६१ ॥

अर्थः–१ निष्फल न बोलणारी २ वेदवाणी ( हा आत्मा ) ३ जन्मरहित, ४ नित्य ( व ) ५ अनादिसत्य ( आहे ) ६ असें ७ सांगत आहे. ८ त्या आत्मरूपानें ९ राहणाऱ्या १० ह्या ( ब्रह्मनिष्ठाला ) ११ प्रारब्ध आहे ही कल्पना १२ कोठून ( संभवेल ) ? ॥ ४६१ ॥

आत्मा अनादि आहे ह्याविषयीं श्रुतीचें प्रमाण सांगितलें ॥ ४६१ ॥

प्रारब्धं सिध्यति तदा यदा देहात्मना स्थितिः ।
देहात्मभावो नैवेष्टः प्रारब्धं त्यज्यतामतः । ४६२ ।

प्रारब्धं । सिध्यति । तदा । यदा । देहात्मना । स्थितिः ।
देहात्मभावः । न । एव । इष्टः । प्रारब्धं । त्यज्यतां । अतः । ४६२ ।

अर्थः–१ जेव्हां ( पुरुषाचें ) २ देहाशीं तादात्म्य करून ३ राहणें ( घडतें )-देहच मी आहें अशी समजूत असत-४ तेव्हां ५ प्रारब्ध ६ सिद्ध होतें, ( आणि ब्रह्मवेत्त्याला तर ) ७ देहाच्या ठिकाणीं आत्मबुद्धि ८ संमत-च १० नाहीं. ११ यास्तव ( विद्वानाच्या ठायीं ) १२ प्रारब्धाविषयीं ( आग्रह ) १३ सोडून द्यावा. ॥ ४६२ ॥

देहात्मबुद्धि नसल्यामुळें विद्वानाच्या ठिकाणीं प्रारब्धाची कल्पनाच नाहीं-।४६२।

शरीरस्यापि प्रारब्धकल्पना भ्रान्तिरेव हि ।
अध्यस्तस्य कुतःसत्त्वमसत्त्यस्य कुतो जनिः।४६३।
अजातस्य कुतो नाशः प्रारब्धमसतः कुतः ।

शरीरस्य । अपि । प्रारब्धकल्पना । भ्रान्तिः । एव । हि ।
अध्यस्तस्य । कुतः । सत्त्वं । असत्यस्य । कुतः । जनिः । ४६३ ।
अजातस्य । कुतः । नाशः । प्रारब्धं । असतः । कुतः ॥

**अर्थः**-( विद्वानाच्या ) १ शरीराची २ प्रारब्धकल्पना ३ देखील-विद्वानाचें शरीर प्रारब्ध कर्माचें फळ आहे ही कल्पना सुद्धा ४ भ्रम ५ च ( आहे ) ६ कारण ( शरीर ) ७ अध्यस्त ( आहे असा निश्चय असतां त्याला ) ८ सत्ता ९ कोठून ( येणार ? त्या ) १० असत्य ( शरीराला ) ११ जन्म १२ कोठून ( होणार ? आणि ) १३ जन्मलेंच नाहीं त्याचा १४ नाश १५ कोठून होणार ? ह्मणून जें १६ नाहींच त्या ( विद्वानाच्या शरीराला ) १७ प्रारब्ध १८ कोठून ( असणार )?-विद्वानाला शरीर आहे किंवा प्रारब्ध आहे ही केवळ अज्ञानी लोकांची कल्पना आहे. ॥ ४६३ ॥

विद्वानाला शरीरच नाहीं ह्मणून त्याच्या ठिकाणीं प्रारब्धकल्पनाच नाहीं. ।४६३।

**ज्ञानेनाज्ञानकार्यस्य समूलस्य लयो यदि ।**
**तिष्ठत्ययं कथं देह इति शङ्कावतो जडान् ।४६४।**
**समाधातुं बाह्यदृष्ट्या प्रारब्धं वदति श्रुतिः ।**
**न तु देहादिसत्यत्वबोधनाय विपश्चिताम् ॥४६५॥**

ज्ञानेन । अज्ञानकार्यस्य । समूलस्य । लयः । यदि ॥ तिष्ठति । अयं । कथं । देहः । इति । शङ्कावतः । जडान् ॥४६४॥ समाधातुं । बाह्यदृष्ट्या । प्रारब्धं । वदति । श्रुतिः ॥ न । तु । देहादिसत्यत्वबोधनाय । विपश्चिताम् ॥ ४६५ ॥

**अर्थः**-१ जर ( अधिष्ठानब्रह्मात्मैक्य ) २ ज्ञानानें ( अज्ञानरूप ) ३ कारणासह ४ अज्ञानकार्याचा-दृश्य प्रपंचाचा-५ लय ( झाला, तर ) ६ हा-प्रत्यक्ष दिसणारा-( ज्ञान्यांचा ) ७ देह ८ कसा ९ राहतो, १० अशी ११ शंका करणाऱ्या १२ अविवेकी जनांचें १३ समाधान करण्याकरितां १४ श्रुति १५ अविवेकी जनांच्या दृष्टीनें ( असलेलें ) १६ प्रारब्ध १७ सांगत आहे; १८ आणि ( आत्मज्ञानसंपन्न ) १९ विद्वानांचा २० देह, प्रारब्ध इत्यादि ( संघात ) सत्य आहे असा बोध करण्याकरितां २१ नाहीं. ॥ ४६४ ॥ ४६५ ॥

अज्ञान्यांची समजूत करण्याकरितां श्रुतीनें बाह्य दृष्टीनें प्रारब्ध आहे असें ह्मटलें आहे. ॥ ४६४ ॥ ५६५ ॥

**परिपूर्णमनाद्यन्तमप्रमेयमविक्रियम् ।**
**एकमेवाद्वयं ब्रह्म नेह नानास्ति किञ्चन ४६६**

परिपूर्णं । अनाद्यन्तं । अप्रमेयं । अविक्रियम् ॥ एकं । एव । अद्वयं । ब्रह्म । न । इह । नाना । अस्ति । किञ्चन ॥४६६॥

**अर्थः**–१ अपरिच्छिन्न, २ उत्पत्ति विनाशरहित, ३ वृत्तिप्रतिबिंबित चैतन्याला अविषय, ४ निष्क्रिय ५ एक ६ च ७ अद्वैत-सजातीयविजातीयस्वगतभेदशून्य ८ परमात्मतत्त्व ( आहे ). ९ ह्या ( परमात्मस्वरूपांत ) १० भेदविशिष्ट ११ कांहीं हि १२ असत १३ नाहीं. ।४६६।

ह्या व पुढील सहा श्लोकांत ज्यांत प्रारब्धाचा अभाव आहे असें जे अंतरदृष्टि विषय, परंतु स्वतां अविषय ब्रह्म त्याचें वर्णन केलें आहे. ॥ ४६६ ॥

**सद्घनं चिद्घनं नित्यमानन्दघनमक्रियम् ।**
**एकमेवाद्वयं ब्रह्म नेह नानास्ति किञ्चन ॥४६७॥**

सद्घनं । चिद्घनं । नित्यं । आनन्दघनं । अक्रियम् ॥ ( उत्तरार्ध पूर्ववत् ). ॥ ४६७ ॥

**अर्थः**–१ सन्मात्र, २ चिन्मात्र, ३ अविनाशी, ४ आनंदमात्र, ५ विकारशून्य ६ एक ७ च ८ अद्वैत ९ परमात्मतत्त्व ( आहे ). ( उत्तरार्ध पूर्ववत् ) ॥ ४६७ ॥

**प्रत्यगेकरसं पूर्णमनन्तं सर्वतोमुखम् ।**
**एकमेवाद्वयं ब्रह्म नेह नानास्ति किञ्चन ॥४६८॥**

प्रत्यक् । एकरसं । पूर्णं । अनन्तं । सर्वतोमुखम् । ( उत्तरार्ध पूर्ववत् ) ॥ ४६८ ॥

अर्थः–१ अंतररूप, २ एकरस, ३ सर्वव्यापक, ( त्रिविध ) ४ अंतरहित ( आणि ) सर्वात्मक ( इ० पूर्ववत् ) ॥ ४६८ ॥

**अहेयमनुपादेयमनादेयमनाश्रयम् । एकमेवाद्वयं ब्रह्म नेह नानास्ति किञ्चन ॥ ४६९ ॥**

अहेयं । अनुपादेयं । अनादेयं । अनाश्रयम् ॥ ( उत्तरार्ध पूर्ववत् ) ॥ ४६९ ॥

अर्थः–( सर्वांचा आत्मा असल्यामुळें ) १ टाकण्याला अयोग्य, निवडून २ ग्रहण करण्याला अयोग्य, ३ दुरून ग्रहण करण्यालाहि अयोग्य ( आणि निजमहिम्यांतच सदा स्थित असल्यामुळें ) ४ आश्रयाची अपेक्षा न करणारें ( इ० पूर्ववत् ) ॥ ४६९ ॥

**निर्गुणं निष्कलं सूक्ष्मं निर्विकल्पं निरञ्जनम् ।
एकमेवाद्वयं ब्रह्म नेह नानास्ति किञ्चन । ४७० ।**

निर्गुणं । निष्कलं । सूक्ष्मं । निर्विकल्पं । निरञ्जनम् ॥ इ० ४७०

अर्थः–१ गुणवार्जित ( व निर्दोष ), २ निरवयव-प्राणादिषोडशकलारहित-३ प्रत्यक्षागोचर, ( भावाभावरूप ) ४ कल्पनारहित ( आणि अविद्यारूप ) ५ आवरणविरहित ( इ० पूर्ववत् ) ॥ ४७० ॥

**अनिरूप्यस्वरूपं यन्मनोवाचामगोचरम् ।
एकमेवाद्वयं ब्रह्म नेह नानास्ति किञ्चन ॥ ४७१ ॥**

अनिरूप्यस्वरूपं । यत् । मनोवाचां । अगोचरम् ॥ इ० ४७१

अर्थः–( इदंतेनें असें आहे अशारीतीनें-ज्याच्या ) १ स्वरूपाचें वर्णन करितां येत नाहीं ( आणि ह्मणूनच ) २ जें मन ३ व वाणी ह्यांचा ४ अविषय आहे ( असें इ० पूर्ववत् ) ॥ ४७१ ॥

**सत्समृद्धं स्वतःसिद्धं शुद्धं बुद्धमनीदृशम् ।**
**एकमेवाद्वयं ब्रह्म नेह नानास्ति किञ्चन ॥ ४७२ ॥**

सत् । समृद्धं । स्वतःसिद्धं । शुद्धं । बुद्धं । अनीदृशम् ॥ इ० ४७२

**अर्थः**–१ सद्रूप, २ सर्वैश्वर्यसंपन्न, ( सर्वांचें स्वामी असल्यामुळें ) ३ आपल्या सिद्धीविषयीं अन्याची अपेक्षा न करणारें, ४ निर्मल, ( निरावरण ) ५ चेतनरूप ( आणि ) ५ उपमारहित ( असें इ० पूर्ववत् ) ४७२

**निरस्तरागा विनिरस्तभोगाः शान्ताः सुदान्ता**
**यतयो महान्तः । विज्ञाय तत्त्वं परमेतदन्ते**
**प्राप्ताः परां निर्वृतिमात्मयोगात् ॥ ४७३ ॥**

निरस्तरागाः । विनिरस्तभोगाः । शान्ताः । सुदान्ताः । यतयः । महान्तः ॥ विज्ञाय । तत्त्वं । परं । एतद् । अन्ते । प्राप्ताः । परां । निर्वृतिं । आत्मयोगात् ॥ ४७३ ॥

**अर्थः**–ज्यांचा १ विषयाभिलाष निवृत्त झाला आहे असे, ज्यांनीं २ स्त्रीसंगादि भोगांचा त्याग केला आहे असे, ३ शमयुक्त, ४ उत्तम प्रकारानें इंद्रियदमन करणारे, ५ महाशय ( व समाधीच्या सिद्धीविषयीं ) ६ यत्न करणारे, ( पुरुष ) ७ ह्या ( यथार्थ स्वरूप ) ८ पर ९ ब्रह्माचा १० साक्षात्कार करून ( अज्ञकल्पित प्रारब्धाच्या ) ११ अंतीं १२ आत्मज्ञानाच्या योगानें १३ अत्यंत १४ आनंदाप्रत १५ प्राप्त झाले आहेत. ॥ ४७३ ॥

स्वरूपस्थितीनें राहणाऱ्या ब्रह्मनिष्ठांना विदेहमुक्ति प्राप्त होते. ॥ ४७३ ॥

**भवानपीदं परतत्त्वमात्मनः स्वरूपमानन्दघनं**
**विचार्य । विधूय मोहं स्वमनःप्रकल्पितं**
**मुक्तः कृतार्थो भवतु प्रबुद्धः ॥ ४७४ ॥**

भवान् । अपि । इदं । परतत्त्वं । आत्मनः । स्वरूपं । आनन्दघनं । विचार्य ॥ विधूय । मोहं । स्वमनःप्रकल्पितं । मुक्तः । कृतार्थः । भवतु । प्रबुद्धः ॥ ४७४ ॥

अर्थः—( हे शिष्य ) १ तूं २ हि ३ प्रत्यगात्म्याचें ४ हें-अपरोक्ष ५ निरवधि व अबाध्य ( आणि ) आनंदमात्र ७ स्वरूप ८ साक्षात् अनुभवून ९ आपल्या मनानें कल्पित केलेल्या ( अनेक प्रकारच्या ) १० भ्रमांचा ११ नाश करून १२ आत्मसाक्षात्कारवान् ( व ) १३ जीवन्मुक्त ( होऊन ) १४ कृतकृत्य १५ हो. ॥ ४७४ ॥

प्राचीन ब्रह्म निष्ठांप्रमाणें तूं हि कृतार्थ हो असा शिष्यास उपदेश केला आहे. ।४७४।

**समाधिना साधुविनिश्चलात्मना पश्यात्मतत्त्वं स्फुटबोधचक्षुषा । निःसंशयं सम्यगवेक्षितश्चेच्छ्रुतः पदार्थो न पुनर्विकल्प्यते ॥ ४७५ ॥**

समाधिना । साधुविनिश्चलात्मना । पश्य । आत्मतत्त्वं । स्फुटबोधचक्षुषा ॥ निःसंशयं । सम्यक् । अवेक्षितः । चेत् । श्रुतः । पदार्थः । न । पुनः । विकल्प्यते ॥ ४७५ ॥

अर्थः—( ज्यांत ) १ उत्तम रीतीनें मन स्थिर होईल-बाह्य कल्पना साफ सुटून मनाची चपलता नष्ट होईल-( अशा निर्विकल्प ) २ समाधीनें ( प्राप्त झालेल्या ) ३ निःसंशय आत्मसाक्षात्काररूप नेत्रानें ४ प्रत्यगभिन्न ब्रह्माचा अपरोक्ष ५ अनुभव घे ६ जर ( ब्रह्मात्म ) ७ पदाचा अर्थ ( शास्त्र व गुरु यांच्या द्वारा ) ८ ऐकिला आहे, ( व ) ९ संशयावांचून १० उत्तम प्रकारं-विपर्ययरहित-( त्याचा ) ११ साक्षात्कार झाला आहे, ( तर तो ) १२ पुनः १३ संशयविपर्ययांचा विषय होत १४ नाहीं. ॥ ४७५ ॥

जीवन्मुक्तीला निर्विकल्प समाधि अवश्य आहे ह्मणून त्याचा अवलंब करण्याविषयीं शिष्यास उपदेश केला आहे. ॥ ४७५ ॥

**स्वस्याविद्याबन्धसम्बन्धमोक्षात् सत्यज्ञानानन्दरू-**

पात्मलब्धौ । शास्त्रं युक्तिर्देशिकोक्तिः प्रमाणं
चान्तः सिद्धा स्वानुभूतिः प्रमाणम् ॥ ४७६ ॥

स्वस्य । अविद्याबन्धसम्बन्धमोक्षात् । सत्यज्ञानानन्दरूपात्मलब्धौ ॥ शास्त्रं । युक्तिः । देशिकोक्तिः । प्रमाणं । च । अन्तः । सिद्धा । स्वानुभूतिः । प्रमाणम् ॥ ४७६ ॥

अर्थः—१ आपणास-जीवाला-२ अविद्यारूप बंधनाच्या संबंधाची निवृत्ति झाल्यामुळें ३ सच्चिदानंदरूप ब्रह्मभावाची प्राप्ति होते या विषयीं ४ वेदशास्त्र, ५ वेदानुकूल तर्क ( आणि उपदेशकरणाऱ्या ) ६ श्रीगुरूंचें वचन ( हीं सर्व ) ७ प्रमाणभूत ( आहेत ). ८ तसेंच ९ अंतरात्म्याच्या ठायीं ( समाधीच्या योगानें ) १० सिद्ध झालेला ११ आपला अनुभव हि १२ प्रमाण ( आहे ). ॥ ४७६ ॥

जीवन्मुक्तिरूप समाधीनेंच विदेहमुक्ति होते याविषयीं प्रमाणें दिलीं आहेत. ४७६

बन्धो मोक्षश्च तृप्तिश्च चिन्तारोग्यक्षुधादयः ।
स्वेनैव वेद्या यज्ज्ञानं परेषामानुमानिकम् ॥४७७॥

बन्धः । मोक्षः । च । तृप्तिः । च । चिन्तारोग्यक्षुधादयः ॥ स्वेन । एव । वेद्याः । यत् । ज्ञानं । परेषां । आनुमानिकम् ।४७७।

अर्थः—१ विषयसंबंध, २ सर्वसंकल्पनिवृत्ति ३ आणि ४ इच्छेचा अभाव, ५ तसेंच ( मला इष्टप्राप्ति कशी होईल अशा प्रकारचा चित्तवृत्तिरूप ) ६ मानस रोग, रोगनिवृत्तीनें होणारी स्वस्थता व क्षुधा इत्यादि ( गोष्टी ) ७ स्वतः ८ च ९ जाणल्या पाहिजेत. १० कारण ११ इतरांचें ( ह्या गोष्टीं विषयींचें ) १२ ज्ञान १३ अनुमानानें झालेलें असतें-बाह्य चिन्हांवरून झाल्यामुळें परोक्ष असतें, व ज्याला ह्या गोष्टींचा अंतरांत अनुभव असतो त्याला तें अपरोक्ष असतें. ॥ ४७७ ॥

ब्रह्मवेत्त्याचा अनुभव ज्याचा त्यालाच खरा माहीत असणार, इतरांस त्याचें अनुमान करितां यावयाचें नाहीं. ॥ ४७७ ॥

**तटस्थिता बोधयन्ति गुरवः श्रुतयो यथा ।**
**प्रज्ञयैव तरेद्विद्वानीश्वरानुगृहीतया ॥ ४७८ ॥**

तटस्थताः[४] । बोधयन्ति[५] । गुरवः[३] । श्रुतयः[१] । यथा[२] ॥ प्रज्ञया[८] । एव[९] । तरेत्[१०] । विद्वान्[६] । ईश्वरानुगृहीतया[७] ॥ ४७८ ॥

**अर्थः**–( तत्त्वमस्यादि ) १ श्रुती २ प्रमाणें ३ गुरु हि ( साक्षीरूप ) ४ तिऱ्हाइत होऊन ( अद्वैत ब्रह्माचा ) ५ बोध करितात. ( घटादि स्थूल पदार्थांप्रमाणें ब्रह्म दाखवीत नाहींत ). ह्मणून ( वेदांत शास्त्राच्या पदांचा अर्थ जाणणाऱ्या ) ६ अधिकाऱ्यानें ७ ईश्वरी कृपेनें प्राप्त झालेल्या ( तत्त्वमस्यादिवाक्यार्थांच्या मननानें उत्पन्न झालेल्या ) ८ ब्रह्मात्मैक्यवृत्तीनें ९ च ( अविद्यारूप महासागराच्या पलीकडील ब्रह्मरूप तीरावर ) १० पोहोंचावें. ॥ ४७८ ॥

श्रीगुरु तटस्थ राहूनच उपदेश करितात. ब्रह्मजिज्ञासूनें मननानेंच स्वरूप प्राप्ति करून घेतली पाहिजे. ॥ ४७८ ॥

**स्वानुभूत्या स्वयं ज्ञात्वा स्वमात्मानमखण्डितम् ।**
**संसिद्धः सम्मुखं तिष्ठेन्निर्विकल्पात्मनात्मनि ।४७९।**

स्वानुभूत्या[१] । स्वयं[५] । ज्ञात्वा[६] । स्वं[३] । आत्मानं[४] । अखण्डितम्[२] ॥ संसिद्धः[७] । सम्मुखं[१०] । तिष्ठेत्[११] । निर्विकल्पात्मना[८] । आत्मनि[९] ४७९

**अर्थः**–१ आपल्या ( अभ्यासानें उत्पन्न झालेल्या "मी ब्रह्म आहें" अशा ) भावनेनें १ नित्य ( जो ) ३ आपण ४ आत्मा ( त्याला ) ५ स्वतांच ६ साक्षात् अनुभवून ( ज्याला ) ७ इष्ट प्राप्ति झाली आहे ( अशा पुरुषानें ) ८ संकल्पादिरहित मन करून ९ स्वरूपाच्या ठायीं ( प्रारब्ध प्रेरित शरीराचे व्यापार चालू असतां हि ); १० स्वमाहिम्यानेंच ११ राहावें-आत्मनिष्ठ व्हावें. ॥ ४७९ ॥

विद्वानाची स्वाभाविक स्थिति कशी असावी तें सांगितलें ॥ ४७९ ॥

**वेदान्तसिद्धान्तनिरुक्तिरेषा ब्रह्मैव जीवः**

**सकलं जगच्च । अखण्डरूपस्थितिरेव मोक्षो**
**ब्रह्माद्वितीये श्रुतयः प्रमाणम् ॥ ४८० ॥**

वेदान्तसिद्धान्तनिरुक्तिः । एषा । ब्रह्म । एव । जीवः । सकलं । जगत् । च ॥ अखण्डरूपस्थितिः । एव । मोक्षः । ब्रह्माद्वितीये । श्रुतयः । प्रमाणम् ॥ ४८० ॥

**अर्थः**–१ उपनिषदांतील वचनांच्या निर्णीत अर्थाचा संग्रहद्वारा उपदेश २ हा ( आहे कीं, ) ३ जीव ४ आणि ५ सर्व ६ जग ७ ब्रह्म ८ च ( आहेत )-ब्रह्माहून अन्य असें जड किंवा चेतन कांहीं नाहीं ( ह्मणून ) ९ निर्द्वैत ब्रह्मस्वरूपीं राहणें ( हा ) १० च ११ मोक्ष ( आहे ). १२ ब्रह्माच्या अद्वितीयत्वाविषयीं १३ श्रुति १४ प्रमाण ( आहेत ) ॥४८०॥

सर्ववेदांतसिद्धांताचा संग्रह करून उपदेश केला आहे. ॥ ४८० ॥

**इति गुरुवचनाच्छ्रुतिप्रमाणात् परमवगम्य सतत्त्व-**
**मात्मयुक्त्या । प्रशमितकरणः समाहितात्मा**
**क्वचिदचलाकृतिरात्मनिष्ठितोऽभूत् ॥ ४८१ ॥**

इति । गुरुवचनात् । श्रुतिप्रमाणात् । परं । अवगम्य । सतत्त्वं । आत्मयुक्त्या ॥ प्रशमितकरणः । समाहितात्मा । क्वचित् । अचलाकृतिः । आत्मनिष्ठितः । अभूत् ॥ ४८१ ॥

**अर्थः**–१ याप्रमाणें ( पूर्वोक्त ) २ गुरूंनीं केलेल्या उपदेशावरून, ३ श्रुतीच्या प्रमाणावरून ( आणि ) ४ आपल्या ( मननरूप ) युक्तीनें ५ यथार्थ-स्वरूप ६ परब्रह्माला ७ जाणून ( ज्यांचीं श्रोत्रादि ) ८ इंद्रियें ( शब्दादिविषयांपासून विशेषें करून ) निवृत्त झालीं आहेत ( असा व ज्याचें ) ९ चित्त एकाग्र झालें आहे ( असा तो शिष्य ) १० कोठें-तरी-वनांत किंवा घरांत-( पर्वताप्रमाणें ) ११ निश्चल ( होऊन ) १२ समाधिनिष्ठ १३ होता झाला. ॥ ४८१ ॥

अधिकारी शिष्यास केलेल्या उपदेशाची सफलता दाखविली आहे. ॥ ४८१ ॥

+कञ्चित्कालं समाधाय परे ब्रह्मणि मानसम् ।
उत्थाय परमानन्दादिदं वचनमब्रवीत् ॥ ४८२ ॥

कंचित । कालं । समाधाय । परे । ब्रह्मणि । मानसम् ।
उत्थाय । परमानन्दात् । इदं । वचनं । अब्रवीत ॥ ४८२ ॥

अर्थः—१ कांहीं २ काळपर्यंत-आपल्या अभ्यासानुसार-३ पर४ ब्रह्माचे ठायीं ५ चित्त ६ स्थिर करून ( नंतर प्रारब्ध भोगामुळें त्या ) * परमानंदरूप ( समाधींतून ) ८ उत्थान पावून ( तो शिष्य ) ९ हें-पुढें लिहिलेलें-१० वचन ११ बोलता झाला. ॥ ४८२ ॥

समाधींतून उत्थान पावून शिष्य आपला अनुभव सांगत आहे. तो पुढें ३९ श्लोकांनीं वर्णन केला आहे. ॥ ४८२ ॥

बुद्धिर्विनष्टा गलिता प्रवृत्तिर्ब्रह्मात्मनोरेकतयाऽ
धिगत्या । इदं न जानेप्यनिदं न जाने
किं वा कियद्वा सुखमस्त्यपारम् ॥ ४८३ ॥

बुद्धिः । विनष्टा । गलिता । प्रवृत्तिः । ब्रह्मात्मनोः । एकतया ।
अधिगत्या ॥ इदं । न । जाने । अपि । अनिदं । न । जाने ।
किं । वा । कियत् । वा । सुखं । अस्ति । अपारम् । ४८३ ।

अर्थः—१ ब्रह्म आणि जीव ह्यांच्या २ ऐक्याचें ३ ज्ञान झाल्यानें ( माझी ) ४ बुद्धि ५ लयास गेली, ( आणि बाह्य व आंतर दोन्ही प्रकारची ) ६ प्रवृत्ति ७ लीन झाली. ( मी ) ८ हें-अपरोक्ष-ऐहिक कर्तव्य-९ जाणत १० नाहीं ( व ) ११ हें नव्हे ( तें )-परोक्ष-पारलौकिक-१२ सुद्धां १३ जाणत १४ नाहीं, १५ किंवा ( निर्विकल्प समाधींत अनुभवास आलेलें ) १६ सुख १७ काय १८ अथवा १९ किती ( आहे हें हि कळत नाहीं. तें सुख ) २० अपार २१ आहे. ॥ ४८३ ॥

---

+ " किञ्चित् " असाहि पाठ आहे.

* ह्याचा " परमानंदाचा अनुभव घेऊन असाहि अर्थ होतो. "

ब्रह्मात्मैक्य ज्ञानाचें अपार सुख आहे. ॥ ४८३ ॥

**वाचा वक्तुमशक्यमेव मनसा मन्तुं न वा शक्यते**
**स्वानन्दामृतपूरपूरितपरब्रह्माम्बुधेर्वैभवम् ।**
**अम्भोराशिविशीर्णवार्षिकशिलाभावं भजन्मे मनो**
**यस्यांशांशलवे विलीनमधुनानन्दात्मना निर्वृतम् ४८४**

वाचा[३] । वक्तुं[४] । अशक्यं[५] । एव[६] । मनसा[८] । मन्तुं[९] । न[११] । वा[७] । शक्यते[१०] । स्वानन्दामृतपूरपूरितपरब्रह्माम्बुधेः[१] । वैभवम्[२] ॥ अम्भोराशिविशीर्णवार्षिकशिलाभावं[१४] । भजत्[१५] । मे[१२] । मनः[१३] । यस्य[१६] । अंशांशलवे[१७] । विलीनं[१८] । अधुना[१९] । आनन्दात्मना[२०] । निर्वृतम्[२१] ४८४

**अर्थ:**—१ स्वरूपानंदरूप अमृताच्या प्रवाहानें भरलेल्या परब्रह्मरूप समुद्राचा २ महिमा ३ वाणीनें ४ बोलून दाखविण्यास ५ अशक्य ६ च ( आहे ); ७ किंवा ८ मनानें ९ मनन करण्यासहि १० शक्य ११ नाहीं ( कारण तो मनोवाणीला अगोचर आहे ). १२ माझें १३ अंतःकरण, १४ सागरांत ( आकाशांतून पडलेल्या पावसाळ्यांतील गारांच्या सादृश्याला १५ प्राप्त होऊन-त्या-गारा जशा समुद्रांत पडून समुद्राशीं अभेद पावतात, तद्वत् माझें मनहि ब्रह्मानंदांत निमग्न झालेलें तद्रूप होऊन-१६ त्या ( ब्रह्मानंद समुद्राच्या अव्याकृतात्मा नांवाच्या ) १७ अंशाचा ( सूत्रात्मा नांवाचा जो ) अंश ( त्याच्या विराट्पुरुषनामक ) लेशमात्रांत ( समाधिकाळीं ) १८ लीन झालें होतें, ( तें समाधींतून उत्थान पावल्यावर ) १९ आतां ( त्याच ) २० आनंदरूपानें २१ सुखी-तृप्त- ( आहे. ) ॥ ४८४ ॥

स्वरूपानंद मनोवाणीला अगोचर आहे. समाधींत मन ब्रह्मानंदरूपच होतें व उत्थान कालीं हि ब्रह्मानंदरूपच असतें हें दृष्टांतानें सांगितलें ॥ ४८४ ॥

**क्व गतं केन वा नीतं कुत्र लीनमिदं जगत् ।**
**अधुनैव मया दृष्टं नास्ति किं महदद्भुतम् ॥४८५॥**

क्व । गतं । केन । वा । नीतं । कुत्र । लीनं । इदं । जगत् ॥ अधुना । एव । मया । दृष्टं । न । अस्ति । किं महत् । अद्भुतम् ॥ ४८५ ॥

अर्थः—१ हें २ जग ३ कोठें ४ गेलें ५ किंवा ६ कोणीं ७ नेलें? (तें) ८ कोठें ९ लीन झालें? १० मीं ✤ ११ आतां १२ च-समाधींतून उत्थान पावल्यावर-(तें नाहीं असें) १३ पाहिलें (हें) १४ मोठें १५ आश्चर्य १६ आहे, १७ नाहीं १८ काय? ॥ ४८५ ॥

जगत् निश्चयानें अभावरूप आहे. ॥ ४८५ ॥

**किं हेयं किमुपादेयं किमन्यत्किं विलक्षणम् ।**
**अखण्डानन्दपीयूषपूर्णे ब्रह्ममहार्णवे ॥ ४८६ ॥**

किं । हेयं । किं । उपादेयं । किं । अन्यत् । किं । विलक्षणम् ॥ अखण्डानन्दपीयूषपूर्णे । ब्रह्ममहार्णवे ॥ ४८६ ॥

अर्थः—१ नित्यानंदरूप अमृतानें भरलेल्या २ ब्रह्मरूप महासागरांत ३ घेण्यासारखें ४ काय (आहे)? ५ टाकण्यासारखें ६ काय (आहे)? (त्याहून) ७ इतर ८ काय (आहे किंवा) ९ विजातीय १० काय (आहे)? ॥ ४८६ ॥

स्वरूपानंदांत ग्रहणत्यागाची हि कल्पना नाहीं. ॥ ४८६ ॥

**न किञ्चिदत्र पश्यामि न शृणोमि न वेद्म्यहम् ।**
**स्वात्मनैव सदानन्दरूपेणास्मि विलक्षणः ॥४८७॥**

न । किञ्चित् । अत्र । पश्यामि । न । शृणोमि । न । वेद्मि । अहम् ॥ स्वात्मना । एव । सदानंदरूपेण × (सत् आनं-

---

✤ "अधुनैव मया दृष्टं" याचा अर्थ "(जगाच्या अभावाचें साधक जें ब्रह्म तें) मीं आतांच-समाधिकालीं-साक्षात् अनुभविलें" असाहि केलेला आहे.

× "सदा । आनन्दरूपेण ।" ह्मणजें "सर्वकाळ आनंदरूप असल्यामुळें" अशीं दोन पदें हि करितां येतात.

द्रूपेण ) ।[14]अस्मि । विलक्षणः ॥ ४८७ ॥

अर्थः—१ मी २ ह्या ( अखंडानंदस्वरूपांत किंवा जगांत ) ( डोळ्यांनीं ) ३ कांहीं ४ पहात ५ नाहीं, ( कानांनीं ) ६ ऐकत ७ नाहीं ( व मनानें सुखदुःखादिक ) ८ जाणत ९ नाहीं. १० स्वरूपानें ११ च १२ सद्रूप आणि आनंदरूप असल्यामुळें ( वर्णाश्रमादि सर्व अनात्मवर्गाहून मी ) १३ वेगळा १४ आहें. ॥ ४८७ ॥

अनात्मवर्गाहून आपलें विलक्षणत्व सांगितलें. ॥ ४८७ ॥

नमो नमस्ते गुरवे महात्मने विमुक्तसङ्गाय
सदुत्तमाय । नित्याद्वयानन्दरसस्वरूपिणे
भूम्ने सदापारदयाम्बुधाम्ने ॥ ४८८ ॥

न[10]मः । न[9]मः । [8]ते । गु[7]रवे । मह[4]ात्मने । वि[5]मुक्तसङ्गाय । स[6]दुत्तमाय ॥ नित्या[3]द्वयानन्दरसस्वरूपिणे । भू[2]म्ने । सदा । अपारदयाम्बुधाम्ने ॥ ४८८ ॥

अर्थः—( हे भगवन् ) १ निरवधि करुणासागर, २ व्यापक, ३ अविनाशी आणि अद्वैत सुखसारच आहे स्वरूप ज्यांचें असे, ( कुसंग घडला असतां हि चंदनाप्रमाणें ) ४ निर्लेप, ५ सत्पुरुषांमध्यें उत्तम ( आणि ) ६ गंभीर चित्ताचे ( जे आपण ) ७ सद्गुरु ( त्या ) ८ आपणांस ९ नमस्कार ( असो ), १० नमस्कार ( असो )-पुनः पुनः नमस्कार असो. ॥ ४८८ ॥

श्रीगुरुमहाराजांचे अत्यंत उपकार स्मरून शिष्यानें त्यांस पुनः पुनः नमस्कार केला आहे. ॥ ४८८ ॥

यत्कटाक्षशशिसान्द्रचन्द्रिकापातधूतभव-
तापजश्रमः । प्राप्तवानहमखण्डवैभवा-
नन्दमात्मपदमक्षयं क्षणात् ॥ ४८९ ॥

यत्कटाक्षशशिसान्द्रचन्द्रिकापातधूतभवतापजश्रमः । प्राप्तवान् । अहं । अखंडवैभवानन्दं । आत्मपदं । अक्षयं । क्षणात् ॥४८९॥

अर्थः–१ ज्या ( आपल्या-श्रीगुरुमहाराजांच्या-करुणार्द्र ) दृष्टिरूप चंद्राचे ( उपदेशरूप ) दाट किरण पडून ज्याचा संसारदुःखजन्य खेद निवृत्त झाला आहे असा २ मी ३ अखंडितैश्वर्यसुखमय ( आणि ) ४ अक्षय ( अशा ) ५ आत्मपदाप्रत ६ सत्वर ७ प्राप्त झालों आहें. ( त्या आपणांस नमस्कार असो असा पूर्व श्लोकाशीं संबंध आहे ). ॥ ४८९ ॥

नमस्कार करण्याचें कारण सांगितलें आहे. ॥ ४८९ ॥

धन्योऽहं कृतकृत्योऽहं विमुक्तोऽहं भवग्रहात् ।
नित्यानन्दस्वरूपोऽहं पूर्णोऽहं * तदनुग्रहात् ४९०

धन्यः । अहं । कृतकृत्यः । अहं । विमुक्तः । अहं । भवग्रहात ॥ नित्यानन्दस्वरूपः । अहं । पूर्णः । अहं । तदनुग्रहात् ४९०

अर्थः–१ त्या ( आपल्या-श्रीगुरुमहाराजांच्या-) कृपेनें २ मी ३ निष्काम ✠ पुण्य करणारा झालों ( आहें ), ४ मी ( ‡ आत्मज्ञानसंपादनरूप ) ५ स्वकर्तव्य केलें ( आहे ), ६ मी ( दुःखमूलक ) ७ संसाररूप ग्रहापासून ८ सुटलों ( आहें ), ९ मी १० त्रैकालाबाध्य निरतिशयानंदस्वरूप ( आहें व ) ११ मी १२ पूर्ण ( आहें. )॥ ४९० ॥

श्रीगुरूंच्या कृपेनें प्राप्त झालेल्या तृप्तीचें वर्णन केलें आहे. ॥ ४९० ॥

असङ्गोऽहमनङ्गोऽहमलिङ्गोऽहमभङ्गुरः ।
प्रशान्तोऽहमनन्तोऽहममलोऽहं चिरन्तनः ॥४९१॥

---

* " त्वदनुग्रहात् " ह्मणजे " तुमच्या कृपेनें " असा एका प्रतींत पाठ आहे.

✠ " धन्यः " ह्याचा अर्थ " जनतेला पूज्य " असाहि केलेला आहे.

‡ " कृतकृत्यः " ह्याचा अर्थ " कर्तव्याभावरूप कृतकृत्यतेला प्राप्त झालेला " असाहि केलेला आहे.

असङ्गः । अहं । अनङ्गः । अहं । अलिङ्गः । अहं । अभङ्गुरः ॥
प्रशान्तः । अहं । अनन्तः । अहं । अमलः । अहं । चिरन्तनः ४९१

अर्थः—१ मी २ संगदोषवर्जित ( आहें ), ३ मी ( स्थूलदेहाभिमान विरहित असल्यामुळें हस्तपादादि ) ४ अवयवरहित ( आहें ), ५ मी ६ लिंगदेहाभिमानशून्य ( आहें ). ७ अविनाशी ( आहें ), ८ मी ९ राग द्वेषादिरहित ( आहें ). १० मी ११ त्रिविधपरिच्छेदरहित ( आहें ), १२ मी १३ अविद्या व अविद्याकार्यरूप मलापासून वेगळा ( आहें, आणि ) १४ सनातन ( आहें ). ॥ ४९१ ॥

स्वतृप्तीला हेतूभूत जो स्वानुभव तो प्रकट केला आहे. ॥ ४९१ ॥

**अकर्ताहमभोक्ताहमविकारोऽहमक्रियः । शुद्धबो-
धस्वरूपोऽहं केवलोऽहं सदाशिवः ॥ ४९२ ॥**

अकर्ता । अहं । अभोक्ता । अहं । अविकारः । अहं ।
अक्रियः ॥ शुद्धबोधस्वरूपः । अहं । केवलः । अहं । सदाशिवः ४९२

अर्थः—१ मी २ कर्तृत्वरहित ( आहें ), ३ मी ४ भोक्तृत्वरहित ( आहें ), ५ मी ६ षड्विकारवर्जित ( आहें ), ७ निष्क्रिय ( आहें ), ८ मी ९ शुद्धज्ञानस्वरूप ( आहें आणि ) १० मी ११ निर्विशेष १२ निरंतर मंगलरूप ( आहें ). ॥ ४९२ ॥

स्वानुभवच सांगितला आहे ॥ ४९२ ॥

**द्रष्टुः श्रोतुर्वक्तुः कर्तुर्भोक्तुर्विभिन्न एवाहम् । नित्य-
निरन्तरनिष्क्रियनिःसीमासङ्गपूर्णबोधात्मा ॥ ४९३ ॥**

द्रष्टुः । श्रोतुः । वक्तुः । कर्तुः । भोक्तुः । विभिन्नः । एव ।
अहम् ॥ नित्यनिरन्तरनिष्क्रियनिःसीमासङ्गपूर्णबोधात्मा ॥ ४९३ ॥

अर्थः—१ मी ( नेत्रजन्य वृत्तीचा आश्रय जो ) २ द्रष्टा त्याहून, ( कर्णजन्य वृत्तीचा आश्रय जो ) ३ श्रोता त्याहून, ४ उच्चारकर्तृत्वाच्या

आश्रयाहून, ५ यत्नाच्या आश्रयाहून ( आणि सुखदुःखांच्या वृत्तींना आश्रयभूत जें साभास ) ६ अंतःकरण त्याहून अगदीं ७ वेगळा ८ च ( आहें ). ९ अंतरहित, भेदरहित, क्रियारहित, सीमारहित, संगवर्जित ( आणि ) अपरिच्छिन्न ( असा जो ) बोध ( तोच ज्या माझें ) स्वरूप ( आहे असा मी आहें ). ॥ ४९३ ॥

आपला अनुभवच कथन केला आहे ॥ ४९३ ॥

**नाहमिदं नाहमदोऽप्युभयोरवभासकं परं शुद्धम् ।**
**बाह्याभ्यंतरशून्यं पूर्णं ब्रह्माद्वितीयमेवाहम् ।४९४।**

न[3] । अहं[1] । इदं[2] । न[7] । अहं[4] । अदः[5] । अपि[6] । उभयोः[8] । अवभासकं[9] । परं[10] । शुद्धम्[11] ॥ भाह्याभ्यंतरशून्यं[12] । पूर्णं[13] । ब्रह्म[15] । अद्वितीयं[14] । एव[16] । अहम्[17] ॥ ४९४ ॥

**अर्थः**—१ मी २ हें-+ अपरोक्षज्ञानाचा विषय-३ नाहीं, ४ मी ५ तें-* परोक्षज्ञानाचा विषय-६ हि ७ नाहीं. ( तर या ) उभयतांचें-अपरोक्षपरोक्ष ज्ञानांच्या विषयांचें-९ प्रकाशक ( जें कार्यकारणांहून ) १० पर, ११ निर्मल, १२ बाह्यांतरकल्पना विरहित, १३ पूर्ण ( व ) १४ अद्वितीय १५ ब्रह्म ( तें ) १६ च १७ मी ( आहें ). ॥ ४९४ ॥

मी ब्रह्म आहे ह्या स्वानुभवाचेंच कथन आहे. ॥ ४९४ ॥

**निरुपममनादितत्त्वं त्वमहमिदमदइति कल्पनादूरम् ।**
**नित्यानन्दैकरसं सत्यं ब्रह्माद्वितीयमेवाहम् ॥४९५॥**

निरुपमं[1] । अनादितत्त्वं[2] । त्वं[3] । अहं[4] । इदं[5] । अदः[6] । इति[7] । कल्पनादूरम्[8] ॥ नित्यानंदैकरसं[9] । सत्यं[10] । ब्रह्म[12] । अद्वितीयं[11] । एव[13] । अहम्[14] ॥ ४९५ ॥

---

+ " इदं " ह्याचे " दृश्य " " स्थूल प्रपंच " असे हि अर्थ केले आहेत त्यांत व ह्या अर्थांत फरक नाहीं. * " अदः " ह्याचे " द्रष्टा " " सूक्ष्म " असे हि अर्थ केले आहेत.

**अर्थः**–१ उपमारहित, २ अनादिस्वरूप, ३ तूं, ४ मी, ५ हें, ६ तें ७ इत्यादि ८ कल्पनावर्जित, ९ नित्यानंदैकरस, १० सत्य ( आणि ) ११ अद्वितीय ( असें जें ) १२ ब्रह्म ( तें ) १३ च १४ मी ( आहें ). ४९५

ब्रह्मात्मैक्याचेंच वर्णन केलें आहे. ॥ ४९५ ॥

**नारायणोऽहं नरकान्तकोऽहं पुरान्तकोऽहं पुरुषोऽहमीशः । अखण्डबोधोऽहमशेषसाक्षी निरीश्वरोऽहं निरहं च निर्ममः ॥ ४९६ ॥**

नारायणः । अहं । नरकान्तकः । अहं । पुरान्तकः । अहं । पुरुषः । अहं । ईशः ॥ अखण्डबोधः । अहं । अशेषसाक्षी । निरीश्वरः । अहं । निरहं । च । निर्ममः ॥ ४९६ ॥

**अर्थः**—( क्षीरसागरांत शेषावर शयन करणारा ) १ नारायण २ मीच ( आहें ), ३ नरकासुराचा ♆ नाश करणारा ( कृष्ण ) ४ मीच, ५ त्रिपुरासुराचा नाश करणारा ( शंकर ) ६ मीच, ७ सर्वैश्वर्यशाली ८ * अव्याकृतात्मा ९ मीच, १० नित्यचिद्रूप ११ मीच, १२ आणि सर्वांचा १३ प्रकाशक, १४ ईश्वरांतर शून्य-ज्या मला अन्य कोणी ईश्वर नियंता नसून मीच ईश्वर आहें असा,- १५ अहंकारवर्जित ( व ) १६ ममतारहित ( असा ) १७ मी ( आहें ) ॥ ४९६ ॥

जगत्पालकनारायणादि सर्व माझेंच स्वरूप आहे. ॥ ४९६ ॥

**सर्वेषु भूतेष्वहमेव संस्थितो ज्ञानात्मनान्तर्बहिराश्रयः ɸ सन् । भोक्ता च भोग्यं स्वयमेव सर्वं यद्यत्पृथग्दृष्टमिदन्तया पुरा ॥ ४९७ ॥**

---

♆ " नरकान्तकः " ह्याचा " आपल्या भक्तांचें नरकवासांतील दुःख निवृत्त करणारा " असा हि अर्थ केलेला आहे.

* " पुरुषः " ह्याचा " चतुर्भुज वैकुंठवासी विष्णु " असाहि अर्थ केलेला आढळतो.

ɸ " बहिराश्रितः असा पाठ एका प्रतींत आहे. अर्थ एकच आहे.

सर्वेषु । भूतेषु । अहं । एव । संस्थितः । ज्ञानात्मना । अन्तः । बहिः । आश्रयः । सन् ॥ भोक्ता । च । भोग्यं । स्वयं । एव । सर्व । यत् । यत् । पृथक् । दृष्टं । इदन्तया । पुरा ॥४९७॥

अर्थः—१ मी २ च ३ आश्रय ४ होऊन ५ ज्ञानस्वरूपानें ६ सर्व ७ भूतांच्या ठायीं ८ आंत ( व ) ९ बाहेर राहिलों १० आहें; ( माझ्याहून कोणींहि भिन्न नाहीं ). ११ मी १२ च १३ भोक्ता १४ आणि १५ भोग्य ( आहे, व ) १६ जें १७ जें १८ अनात्मत्वानें १९ पूर्वी-अज्ञानदशेंत-२० वेगळें २१ पाहिलें होतें-आपल्याहून भिन्न ह्मणून समजलों होतों-( तें ) सर्व २२ हि ( मीच आहें ). ॥ ४९७ ॥

मीच सर्वांना व्यापून राहिलों आहें. माझ्याहून भिन्न कांहीं नाहीं. ॥ ४९७ ॥

**मय्यखण्डसुखाम्भोधौ बहुधा विश्ववीचयः ।**
**उत्पद्यन्ते विलीयन्ते मायामारुतविभ्रमात् ॥४९८॥**

मयि । अखण्डसुखाम्भोधौ । बहुधा । विश्ववीचयः ॥ उत्पद्यन्ते । विलीयन्ते । मायामारुतविभ्रमात् ॥ ४९८ ॥

अर्थः—१ अखंडानंदाचा समुद्र ( जो मी त्या ) २ मजवर ३ मायारूप वायूच्या विलासानें-क्षोभानें-४ अनेक प्रकारांनीं ५ ब्रह्माण्डरूप लाटा ६ उत्पन्न होतात ( व ) ७ लय पावतात. ॥ ४९८ ॥

सर्व चराचराचें अधिष्ठान मीच आहें. ॥ ४९८ ॥

**स्थूलादिभावा मयि कल्पिता भ्रमादारोपिता नु स्फुरणेन लोकैः । काले यथा कल्पकवत्सरायनर्त्वादयो निष्कलनिर्विकल्पे ॥ ४९९ ॥**

स्थूलादिभावाः । मयि । कल्पिताः । भ्रमात् । आरोपिताः । नु । स्फुरणेन । लोकैः ॥ काले । यथा । कल्पकवत्सरायनर्त्वादयः ( कल्पक वत्सर अयन ऋतु आदयः )। निष्कलनिर्विकल्पे ४९९

**अर्थः**–१ ज्याप्रमाणें २ निरवय आणि निर्भेद ३ कालाच्या ठायीं ४ लोकांनीं ( सूर्यादिकांच्या ) ५ चलनाचें भान होत असल्यामुळें ( ब्राह्म ) ६ कल्प, संवत्सर, ( उत्तर व दक्षिण ) अयनें, ( ग्रीष्मादि सहा ) ऋतु, ( मास, पक्ष, मुहूर्त ) इत्यादि ( भेद ) ८ आरोपित केले आहेत, ( तद्वत् २ निरवयव आणि निर्भेद चेतनरूप जो मी त्या ) ९ मजवर १० स्थूल, सूक्ष्म आणि कारण हे उपाधि ( अधिष्ठानाच्या ) ११ अज्ञानामुळें १२ कल्पित आहेत ( सत्य नाहींत, ). ॥ ४९९ ॥

विचार केला असतां स्थूल सूक्ष्मादि कल्पनेला हि मजमध्यें जागा नाहीं. ।४९९।

**आरोपितं नाश्रयदूषकं भवेत् कदापि मूढैरतिदोषदूषितैः । नार्द्रीकरोत्यूषरभूमिभागं मरीचिकावारिमहाप्रवाहः ॥ ५०० ॥**

**आरोपितं । न । आश्रयदूषकं । भवेत् । कदा । अपि । मूढैः । अतिदोषदूषितैः ॥ न । आर्द्रीकरोति । ऊषरभूमिभागं । मरीचिकावारिमहाप्रवाहः ॥ ५०० ॥**

**अर्थः**–( अविद्या, काम, लोभ-इत्यादि ) १ दोषांनीं ज्यांचीं चित्तें दूषित झालीं आहेत अशा २ अविवेकी पुरुषांनीं ( भ्रमानें ) ३ कल्पित केलेले ( स्थूलादिभाव ) ४ अधिष्ठानाला-वस्तुरूप जो त्या मला-अन्यथा करणारे ५ केव्हां ६ हि-भ्रमकालीं किंवा इतरवेळीं-७ होणार ८ नाहींत-९ मृगजलाचा ( नदीसारखा ) मोठा प्रवाह सुद्धां ( सूर्याच्या प्रखर किरणांमुळें जेथें तो मृगजलभास होतो त्या ) १० उखर भूमीच्या ( कोणत्याहि ) भागाला ११ ओला करीत १२ नाहीं. ॥ ५०० ॥

लोककल्पित स्थूलादिभावांच्या योगानें स्वरूप दूषित होत नाहीं हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. ॥ ५०० ॥

**आकाशवल्लेपविदूरगोऽहमादित्यवद्भास्यविलक्षणोऽहम् । अहार्यवन्नित्यविनिश्चलोऽहमम्भोधिवत्पारविवर्जितोऽहम् ॥ ५०१ ॥**

आकाशवत् । लेपविदूरगः । अहं । आदित्यवत् । भास्यविलक्षणः । अहम् ॥ अहार्यवत् । नित्यविनिश्चलः । अहं । अम्भोधिवत् । पारविवर्जितः । अहम् ॥ ५०१ ॥

अर्थः- १ ज्याप्रमाणें आकाश (मेघ, धूळ, धूर इत्यादिकांनीं लिप्त होत नाहीं, तद्वत्) २ मी ३ निर्लेप (आहें). ४ ज्याप्रमाणें सूर्य (पंकादि ६ भास्यपदार्थांहून वेगळा आहे, तद्वत्) ५ मी (अहंकारादि विकारी) ६ भास्य पदार्थांहून वेगळा आहे. ७ मी ८ पर्वताप्रमाणें ९ सर्वदा निश्चल-कूटस्थ-आहें, (आणि) १० मी ११ महासागराप्रमाणें १२ अपार आहें. ॥ ५०१ ॥

आपल्यानिर्लेपत्वादिकांचें सदृष्टांत कथन केलें आहे. ॥ ॥ ५०१ ॥

**न मे देहेन संबन्धो मेघेनेव विहायसः ।**
**अतः कुतो मे ✠ तद्धर्मा जाग्रत्स्वप्नसुषुप्तयः ५०२**

न । मे । देहेन । संबन्धः । मेघेन । इव । विहायसः ॥ अतः । कुतः । मे । तद्धर्माः । जाग्रत्स्वप्नसुषुप्तयः ॥ ५०२॥

अर्थः-१ आकाशाचा २ मेघाशीं ३ जसा (संबंध नसतो तसा) ४ माझा (सूक्ष्मादि) ५ देहाशीं ६ संबंध ७ नाहीं. ८ यास्तव ९ त्या (सूक्ष्मदेहाचे) धर्म (जे) १० जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति (ते निर्लेप जो मी त्या) ११ माझे १२ कसे (होतील)? ॥ ५०२ ॥

पूर्वश्लोकांतील आकाशाच्या दृष्टांताचें स्पष्टीकरण केलें आहे. ॥ ५०२ ॥

**उपाधिरायाति स एव गच्छति स एव कर्माणि**
**करोति भुङ्क्ते । स एव जीर्यन् म्रियते सदाहं**
**कुलाद्रिवन्निश्चल एव संस्थितः ॥ ५०३ ॥**

उपाधिः । आयाति । सः । एव । गच्छति । सः । एव ।

---

✠ "मद्धर्मा" ह्मणजे "माझे धर्म" असा हि पाठ आहे.

**कर्माणि । करोति । भुंक्ते ॥ सः । एवं । जीर्यन् । म्रियते । सदा । अहं । कुलाद्रिवत् । निश्चलः । एव । संस्थितः ॥ ५०३ ॥**

**अर्थः**–१ सूक्ष्मदेह ( स्थूल शरीरांत ) २ येतो. ३ तो ४ च ( प्रारब्ध भोग संपला ह्मणजे स्थूल शरीरांतून निघून ) ५ जातो. ६ तो ७ च ( शुभाशुभ ) ८ कर्मे ९ करितो, ( आणि स्थूल शरीरांत राहून व बुद्धींत चैतन्याचें प्रतिबिंब घेऊन ) १० सुखादिकांचा अनुभव करितो. ११ तो १२ च ( ह्या जन्मांत व जन्मांतरांत ) १३ वार्द्धक्याच्या दुःखाचा अनुभव घेऊन १४ मरण पावतो १५ मी १६ सर्वकाळ १७ * कुलपर्वतांप्रमाणें १८ निश्चल-कूटस्थ-( असा ) १९ च २० आहें. ॥ ५०३ ॥

५०१ ह्या श्लोकांतील तिसऱ्या चरणांतील दृष्टांताचेंच विवरण केलें आहे. ५०३

**न मे प्रवृत्तिर्न च मे निवृत्तिः सदैकरूपस्य निरंशकस्य । एकात्मको यो निबिडो निरन्तरो व्योमेव पूर्णः स कथं नु चेष्टते ॥ ५०४ ॥**

**न । मे । प्रवृत्तिः । न । च । मे । निवृत्तिः । सदा । एकरूपस्य । निरंशकस्य ॥ एकात्मकः । यः । निबिडः । निरन्तरः । व्योम । इव । पूर्णः । सः । कथं । नु । चेष्टते ॥ ५०४ ॥**

**अर्थः**–१ सर्वदा २ एकरस ( आणि ) ३ निरवयव ( असा जो मी त्या ) ४ माझी ( बाह्य व अभ्यंतर इष्ट पदार्थांच्या ठायीं ) ५ प्रवृत्ति ६ नाहीं, ७ आणि ( अनिष्ट पदार्थांपासून ) ८ माझी ९ निवृत्ति हि १० नाहीं. ११ जो ( ब्रह्मवेत्ता ) १२ आकाशा १३ प्रमाणें १४ अद्वैत, १५ निर्भेद, ( मिठाच्या खड्यासारखा आंत बाहेर ) घनदाट १६ एकरस ( आणि ) १७ पूर्ण ( आहे ) १८ तो १९ कसा २० बरें २१ व्यवहार करील? ॥ ५०४ ॥

---

* " महेंद्रो मलयः सह्यः शुक्तिमान् ऋक्षपर्वतः । विंध्यश्च पारियात्रश्च सप्तैते कुलपर्वताः ॥ १ ॥ "—महेंद्र, मलय, सह्य, शक्तिमान्, ऋक्ष, विंध्य आणि पारियात्रा हे सात कुलपर्वत होत–

मी आकाशासारखा पूर्ण व एकरस आहे. ॥ ५०४ ॥

**पुण्यानि पापानि निरिन्द्रियस्य निश्चेतसो निर्विकृ-**
**तेर्निराकृतेः । कुतो ममाखण्डसुखानुभूते-**
**र्ब्रूते ह्यनन्वागतमित्यपि श्रुतिः ॥ ५०५ ॥**

पुण्यानि । पापानि । निरिन्द्रियस्य । निश्चेतसः । निर्विकृतेः । निराकृतेः ॥ कुतः । मम । अखण्डसुखानुभूतेः । ब्रूते । हि । अनन्वागतं । इति । अपि । श्रुतिः ॥ ५०५ ॥

अर्थः—१ ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें यां विरहित, २ चित्तरहित, ३ निर्विकार, ४ निराकार ( आणि ) ५ नित्यानंदानुभवरूप ( अशा ) ६ मला ७ पुण्यें ( व ) ८ पापें ९ कोठून ( असणार )? १० कारण "११ अनन्वागतं "-( आत्म्याला पापपुण्याचा ) संबंध नाहीं-१२ अशा ( आरंभाची ) १३ श्रुति १४ देखील ( हेंच ) १५ सांगत आहे. ॥५०५॥

माझ्या ठायीं पुण्य व पाप नाहीं हें श्रुति हि सांगत आहे. ॥ ५०५ ॥

**छायया स्पृष्टमुष्णं वा शीतं वा सुष्ठु दुष्ठु वा ।**
**न स्पृशत्येव यत्किञ्चित्पुरुषं तद्विलक्षणम् ॥५०६॥**

छायया । स्पृष्टं । उष्णं । वा । शीतं । वा । सुष्ठु । दुष्ठु । वा ॥ न । स्पृशति । एव । यत् । किञ्चित् । पुरुषं । तद्विलक्षणम् ॥ ५०६ ॥

अर्थः—( पुरुषाच्या शरीराच्या ) १ छायेशीं २ संबंध झालेला ३ उष्ण ४ किंवा ५ शीत, ६ किंवा ७ अनुकूल ८ किंवा ९ प्रतिकूल १० जो ११ कांहीं ( पुण्यपापाला किंवा सुखदुःखाला हेतूभूत पदार्थ असतो तो ) १२ त्या ( छायेहून ) भिन्न १३ पुरुषाला १४ स्पर्श करीत १५ नाहीं १६ च-देहाच्या छायेला स्पर्श केलेला पदार्थ जसा देहाला स्पर्श करीत नाहीं, तद्वत् चेतनात्मा जो मी त्या मला पापपुण्याचा संबंध नसून तो छायारूप चिदाभासाला आहे. ॥ ५०६ ॥

आत्मस्वरूपीं पापपुण्यांचा संबंध नाहीं हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. ॥ ५०६ ॥

**न साक्षिणं साक्ष्यधर्माः संस्पृशन्ति विलक्षणम् ।**
**अविकारमुदासीनं गृहधर्माः प्रदीपवत् ॥ ५०७ ॥**

न[9] । साक्षिणं[7] । साक्ष्यधर्माः[3] । संस्पृशन्ति[8] । विलक्षणम्[4] ॥
अविकारं[5] । उदासीनं[6] । गृहधर्माः[2] । प्रदीपवत्[1] ॥ ५०७ ॥

**अर्थः**—१ ज्याप्रमाणें दिव्याला ( श्यामत्वादि ) २ घराचे धर्म ( ८ स्पर्शकरीत ९ नाहींत. तद्वत् स्वतांकडून ) ३ प्रकाशित होणाऱ्या ( अंतःकरणादिकांचे ) धर्म ( साक्ष्य पदार्थांहून ) ४ भिन्न, ५ निर्विकार ( आणि ) ६ उदासीन ( अशा ) ७ साक्षीला ८ स्पर्श करीत ९ नाहींत. ५०७

दीपदृष्टांतानें आपलें असंग साक्षित्व सांगितलें. ॥ ५०७ ॥

**रवेर्यथा कर्मणि साक्षिभावो वह्नेर्यथा दाहनि**
**यामकत्वम् । रज्जोर्यथारोपितवस्तुसङ्ग-**
**स्तथैव कूटस्थचिदात्मनो मे ॥ ५०८ ॥**

रवेः[3] । यथा[1] । कर्मणि[2] । साक्षिभावः[4] । वह्नेः[6] । यथा[5] । दाह-
नियामकत्वम्[7] ॥ रज्जोः[9] । यथा[8] । आरोपितवस्तुसङ्गः[10] । तथा[11] ।
एव[12] । कूटस्थचिदात्मनः[13] । मे[14] ॥ ५०८ ॥

**अर्थः**—१ ज्याप्रमाणें ( सूर्यप्रकाशांत लोकांनीं केलेल्या पापपुण्यरूप ) २ कर्माच्या ठिकाणीं ३ सूर्याचा ४ साक्षीपणा ( असतो ), ५ ज्याप्रमाणें ( सुजन दुर्जन कोणाचाहि स्पर्श झाला असतां ) ६ अग्नीचा ( त्याला ) ७ भाजण्याचा निश्चित स्वभाव असतो, ( परंतु भाजण्यापासून होणाऱ्या हानीचा संबंध नसतो, किंवा ) ८ ज्याप्रमाणें ९ रज्जूचा ( दोषदूषित दृष्टीच्या पुरुषानें ) १० कल्पित केलेल्या ( सर्पादि ) वस्तूशीं संबंध ( मिथ्याच असतो ) ११ त्या प्रमाणें १२ च १३ निर्विकार ( व )१४ चिद्रूप ( अशा ) १५ माझा ( साक्षीपणाच आहे. ) ॥ ५०८ ॥

स्वसाक्षित्व दुसऱ्या दृष्टांतांनीं दाखविलें आहे. ॥ ५०८ ॥

**कर्तापि वा कारयितापि नाहं भोक्तापि वा भोजयितापि नाहम्। द्रष्टापि वा दर्शयितापि नाहं सोऽहं स्वयंज्योतिरनीदृगात्मा ॥ ५०९ ॥**

कर्ता । अपि । वा । कारयिता । अपि । न । अहं । भोक्ता । अपि । वा । भोजयिता । अपि । न । अहम् ॥ द्रष्टा । अपि । वा । दर्शयिता । अपि । न । अहं । सः । अहं । स्वयंजोतिः । अनीदृक् । आत्मा ॥ ५०९ ॥

अर्थः—१ मी निरनिराळ्या क्रियांचा उत्पादक ३ हि ४ किंवा ५ प्रेरक ६ हि ७ नाहीं. ८ मी ९ सुखादिकांच्या अनुभवाचा आश्रय १० हि ११ किंवा १२ इतरांच्या सुखादिकांचा हेतु १३ हि १४ नाहीं. १५ मी १६ पाहणारा १७ हि १८ किंवा १९ दाखविणारा २० हि २१ नाहीं. २२ असा तसा नसलेला-इंद्रियांना अविषय-२३ स्वयंप्रकाश ( असा जो ) २४ परमात्मा २५ तो २६ मी ( आहें ). ॥ ५०९ ॥

सूर्यादिकांप्रमाणें मी स्वतंत्र स्वप्रकाश आहें. ॥ ५०९ ॥

**चलत्युपाधौ प्रतिबिम्बलौल्यमौपाधिकं मूढधियो नयन्ति। स्वबिम्बभूतं रविवद्विनिष्क्रियं कर्तास्मि भोक्तास्मि हतोऽस्मि हेति ॥ ५१० ॥**

चलति । उपाधौ । प्रतिबिम्बलौल्यं । औपाधिकं । मूढधियः । नयन्ति ॥ स्वबिम्बभूतं । रविवत् । विनिष्क्रियं । कर्ता । अस्मि । भोक्ता । अस्मि । हतः । अस्मि । हा । इति ॥ ५१० ॥

अर्थः—१ विवेकहीन पुरुष ( बुद्ध्यादि ) २ उपाधि ३ विकार पावला असतां ( मी ) ४ कर्ता ५ आहें, ( मी ) ६ भोक्ता ७ आहें,

८ हाय हाय ( माझे स्त्रीपुत्रादि मरण पावल्यामुळें मी ) ९ सर्वस्वी बुडालों १० आहें, ११ अशा प्रकारचें ( त्या ) १२ उपाधीमुळें झालेलें १३ चिदाभासाच्या वृत्तीचें चंचलत्व १४ त्या ( चिदाभासाचा ) बिंब-रूप ( साक्षी जो ) १५ निर्विकार ( आत्मा त्याच्या ठिकाणीं, जलादि उपाधि चलन पावला असतां उपाधीमुळें होणारें जलांत पडलेल्या सूर्याच्या प्रतिबिंबाचें चंचलत्व त्या प्रतिबिंबाचें कारण जो बिंबभूत निर्विकार ) १६ सूर्य ( त्याच्या ठिकाणीं नेतात-आरोपित करितात- ) त्याप्रमाणें १७ नेतात-आरोपित करितात. ॥ ५१० ॥

उपाधीमुळें चिदाभासाच्या ठायीं आलेलें चापल्य स्वरूपीं आरोपित करणें मूर्खत्व आहे हें दृष्टांत पूर्वक सांगितलें. ॥ ५१० ॥

**जले वापि स्थले वापि लुठत्वेष जडात्मकः ।**
**नाहं विलिप्ये तद्धर्मैर्घटधर्मैर्नभोयथा ॥ ५११ ॥**

**जले । वा । अपि । स्थले । * वा । अपि । लुठतु । एषः । जडात्मकः ॥ न । अहं । विलिप्ये । तद्धर्मैः । घटधर्मैः । नभः । यथा ॥ ५११ ॥**

**अर्थः**–१ हा २ जडरूप ( स्थूल देह गंगेच्या ) ३ उदकांत ४ हि ५ किंवा ( कोणत्या ) ६ देशांत ७ हि ८ पडो. ९ जसें १० घटाच्या ( रूपादि ) धर्मांनीं ११ आकाश ( १४ लिप्त होत १५ नाहीं तद्वत् ) १२ त्या ( देहाच्या ) धर्मांनीं १३ मी १४ लिप्त होत १५ नाहीं. ५११

देहधर्मांनीं आत्मा लिप्त होत नाहीं हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. ॥ ५११ ॥

**कर्तृत्वभोक्तृत्वखलत्वमत्तताजडत्वबद्धत्वविमुक्त-**
**तादयः । बुद्धेर्विकल्पा न तु सन्ति वस्तुतः**
**स्वस्मिन् परे ब्रह्मणि केवलेऽद्वये ॥ ५१२ ॥**

---

* संस्कृतांत " वा " ह्मणजे " अथवा " व " च " ह्मणजे " आणि " हीं अव्ययें प्रत्येक शब्दापुढें हि घालतात.

कर्तृत्वभोक्तृत्वखलत्वमत्तताजडत्वबद्धत्वविमुक्ततादयः ॥ बुद्धेः । विकल्पाः । न । तु । सन्ति । वस्तुतः । स्वस्मिन् । परे । ब्रह्मणि । केवले । अद्वये ॥ ५१२ ॥

अर्थः—१ कर्तृत्व, भोक्तृत्व, दुष्टता, उन्मत्तता, जडता, बद्धता, मुक्तता इत्यादि २ धर्म ३ बुद्धीचे ४ आहेत, ५ आणि ६ वास्तविक ( पाहतां आकाशाप्रमाणें ) ७ केवल, ८ अद्वैत ( व ) ९ पर १० ब्रह्मरूप ( जो मी त्या ) ११ मजमध्यें १२ नाहींत. ॥ ५१२ ॥

कर्तृत्वादि बुद्धीचे धर्म माझे नाहींत. ॥ ५१२ ॥

**सन्तु विकाराः प्रकृतेर्दशधा शतधा सहस्रधा वापि ।**
**किं मेऽसङ्गचितस्तैर्न घनः क्वचिदम्बरं स्पृशति ।५१३।**

सन्तु । विकाराः । प्रकृतेः । दशधा । शतधा । सहस्रधा । वा । अपि ॥ किं । मे । असङ्गचितः । तैः । न । घनः । क्वचित् । अम्बरं । स्पृशति ॥ ५१३ ॥

अर्थः— माझ्या ) १ मायाशक्तीचे २ दहा प्रकारचे, ३ शंभरप्रकारचे ४ किंवा ५ हजार प्रकारचे ६ हि-अनंत प्रकारचे-७ विकार ८ असोत. ९ निःसंग चिद्रूप ( जो मी त्या ) १० माझें ११ त्या ( विकारांनीं ) १२ काय ( व्हावयाचें आहे ? )-मी त्या विकारांनीं लिप्त होणार नाहीं-१३ मेघ कोठें १४ हि १५ आकाशाला १६ स्पर्श करीत १७नाहीं. ५१३

प्रकृतीच्या धर्मांनीं मी लिप्त होत नाहीं. ॥ ५१३ ॥

**अव्यक्तादि स्थूलपर्यंतमेतद्विश्वं यत्राभासमात्रं**
**प्रतीतम् । व्योमप्रख्यं सूक्ष्ममाद्यन्तहीनं**
**ब्रह्माद्वैतं यत्तदेवाहमस्मि ॥ ५१४ ॥**

अव्यक्तादि । स्थूलपर्यंतं । एतत् । विश्वं । यत्र । आभास-

मात्रं । प्रतीतम्[7] ॥ व्योमप्रख्यं[11] । सूक्ष्मं[9] । आद्यन्तहीनं[10] । ब्रह्म[15] । अद्वैतं[14] । यत्[8] । तत्[12] । एव[13] । अहं[16] । अस्मि[17] ॥ ५१४ ॥

अर्थः—१ ज्या ( ब्रह्माच्या ठायीं , २ मायेपासून ( तों ) ३ स्थूल-देहापर्यंत ४ हें ५ प्रतीतिमात्रस्वरूप ६ जग ( अज्ञजनांच्या ) ७ अनुभवास येतें, ( आणि ) ८ जें ९ सूक्ष्म, १० आद्यन्तवर्जित, ( व ) ११ आकाशासारखें ( आहे ) १२ तें १३ च १४ अद्वैत १५ ब्रह्म १६ मी १७ आहें. ॥ ५१४ ॥

सर्व विश्व ज्याच्या ठिकाणीं केवळ आभासमात्र आहे असें जें अद्वैत ब्रह्म तेंच मी आहें ॥ ५१४ ॥

सर्वाधारं सर्ववस्तुप्रकाशं सर्वाकारं सर्वगं
सर्वशून्यम् । नित्यं शुद्धं निश्चलं निर्विकल्पं
ब्रह्माद्वैतं यत्तदेवाहमस्मि ॥ ५१५ ॥

सर्वाधारं[1] । सर्ववस्तुप्रकाशं[2] । सर्वाकारं[3] । सर्वगं[4] । सर्वशून्यम्[5] । नित्यं[6] । शुद्धं[7] । निश्चलं[8] । निर्विकल्पं[9] । ब्रह्म[12] । अद्वैतं[11] । यत्[10] । तत्[13] । एव[14] । अहं[15] । अस्मि[16] ॥ ५१५ ॥

अर्थः—१ सर्व ( कल्पित जगाचें ) अधिष्ठान, ( ज्यापासून ) २ सर्व वस्तूंचें स्फुरण होतें, ३ अपरिच्छिन्नस्वरूप, ( मण्यामध्यें जसें सूत्र तद्वत् ) ४ सर्वत्र अनुस्यूत, ५ सर्ववर्जित, ६ नित्य, ७ शुद्ध, ८ निश्चल ( आणि ) ९ निर्विकल्प ( असें ) १० जें ११ अद्वैत १२ ब्रह्म १३ तें १४ च १५ मी १६ आहें. ॥ ५१५ ॥

मी ब्रह्म आहें हेंच सांगितलें आहे. ॥ ५१५ ॥

यत्प्रत्यस्ताशेषमायाविशेषं प्रत्यग्रूपं प्रत्यया-
गम्यमानम् । सत्यज्ञानानन्तमानन्दरूपं
ब्रह्माद्वैतं यत्तदेवाहमस्मि ॥ ५१६ ॥

यंत् । प्रत्यस्ताशेषमायाविशेषं । प्रत्यग्रूपं । प्रत्ययागम्यमानम् ॥ सत्यज्ञानानन्तं । आनन्दरूपं । ब्रह्म । इ० पूर्ववत् ५१६

अर्थः–१ जें २ संपूर्णमाया आणि मायेचें कार्य यांविरहित, ३ प्रत्यग्रूप, ४ वृत्तिप्रतिबिंबित चेतनालाहि अविषय, ५ सत्य, ज्ञानरूप, अनंत, ( आणि ) ६ आनंदरूप ( असें इ० पूर्ववत् ). ॥ ५१६ ॥

मी ब्रह्म आहें ह्याचेंच निरूपण केलें. ॥ ५१६ ॥

**निष्क्रियोऽस्म्यविकारोऽस्मि निष्कलोऽस्मि निराकृतिः । निर्विकल्पोऽस्मि नित्योऽस्मि निरालम्बोऽस्मि निर्द्वयः ॥ ५१७ ॥**

निष्क्रियः । अस्मि । अविकारः । अस्मि । । निष्कलः । अस्मि । निराकृतिः ॥ निर्विकल्पः । अस्मि । नित्यः । अस्मि । निरालम्बः । अस्मि । निर्द्वयः ॥ ५१७ ॥

अर्थः–( मी ) १ क्रियारहित २ आहें, ३ निर्विकार ४ आहें, ५ निरवयव ६ आहें, ७ निराकार ( आहें ), ८ निःसंकल्प ९ आहें, १० सत्य ११ आहें ( आणि ) १२ निराश्रय ( व ) १३ द्वैतवर्जित १४ आहें ॥ ५१७ ॥

आत्मस्वरूपाचेंच वर्णन केलें आहें. ॥ ५१७ ॥

**सर्वात्मकोऽहं सर्वोऽहं सर्वातीतोऽहमद्वयः । केवलाखण्डबोधोऽहमानन्दोऽहं * निरन्तरम् ५१८**

सर्वात्मकः । अहं । सर्वः । अहं । सर्वातीतः । अहं । अद्वयः ॥ केवलाखण्डबोधः । अहं । आनन्दः । अहं । निरन्तरम् ।५१८।

---

* " निरन्तरः " ह्मणजे " भेदरहित " असाहि पाठ आहे. हें " अहं " ह्याचें विशेषण.

अर्थः–१ मी २ परिच्छेदरहित ( आहें ), ३ मी ( व्यापक असल्यामुळें ) ४ अनल्प ( आहें ), ५ मी ( वाणी, मन इत्यादिकांना ६ अविषय ( व ) ७ द्वैतरहित ( आहें ), ८ मी ९ नित्यचेतनमात्र ( आहें आणि ) १० मी ११ निरंतर १२ आनंदरूप ( आहें ). ॥ ५१८ ॥

स्वरूपस्थितिच सांगितली आहे. ॥ ५१८ ॥

**स्वाराज्यसाम्राज्यविभूतिरेषा भवत्कृपाश्रीमहिमप्रसादात् । प्राप्ता मया श्रीगुरवे महात्मने नमो नमस्तेऽस्तु पुनर्नमोऽस्तु ॥ ५१९ ॥**

स्वाराज्यसाम्राज्यविभूतिः । एषा । भवत्कृपाश्रीमहिमप्रसादात् ॥ प्राप्ता । मया । श्रीगुरवे । महात्मने । नमः । नमः । ते । अस्तु । पुनः । नमः । अस्तु ॥ ५१९ ॥

अर्थः–( हे श्रीगुरो ), १ हें २ स्वर्गसुखांचा राजा जो ब्रह्मानंद त्याचें निरंकुश ऐश्वर्यरूप वैभव ३ आपल्या कृपेनें ( प्राप्त झालेल्या ) ईश्वरी ✻ प्रसादानें ४ मीं ५ मिळविलें आहे. ( ह्मणून ) ६ महा उपकार ९ करणारे ( जे आपण ) ७ श्रीगुरुमहाराज त्या ८ आपणांस ९ नमस्कार ( असो, पुनः ) १० नमस्कार ११ असो, ( आणखी ) १२ पुनः ( असा त्रिवार-अनंतवेळां ) १३ नमस्कार १४ असो. ॥ ५१९ ॥

श्रीगुरुमहाराजांचे उपकार स्मरून त्यांस पुनः पुनः नमस्कार केला आहे. ।५१९।

**महास्वप्ने मायाकृतजनिजरामृत्युगहने
भ्रमन्तं क्लिश्यन्तं बहुलतरतापैरनुदिनम् ।
अहंकारव्याघ्रव्यथितमिममत्यन्तकृपया
प्रबोध्य प्रस्वापात्परमवितवान्मामासि गुरो ॥५२०॥**

---

✻ " श्रीमहिमप्रसादात् " ह्याचा " उत्कृष्ट माहात्म्याच्या प्रसादानें " असाहि अर्थ आहे.

महास्वप्ने । मायाकृतजनिजरामृत्युगहने । भ्रमन्तं । क्लिश्यन्तं । बहुलतरतापैः । अनुदिनम् ॥ अहंकारव्याघ्रव्यथितं । इमं । अत्यन्तकृपया । प्रबोध्य । प्रस्वापात् । परं । अवितवान् । मां । असि । गुरो ॥ ५२० ॥

अर्थः—१ गुरुमहाराज, २ मायेनें केलेल्या जन्म, जरा व मृत्यु ह्यांच्या अरण्यांत ( अज्ञानी लोकांनीं जागृति म्हटलेल्या ) दीर्घ ३ स्वप्नांत ४ भ्रमण करणाऱ्या, ५ प्रतिदिवशीं ( आध्यात्मिकादि ) ६ अनेक दुःखांच्या योगानें ७ क्लेश पावणाऱ्या ( आणि त्या जन्मादि वृक्षांच्या स्वप्नांतील अरण्यांत ) ८ अहंकाररूप व्याघ्रानें भयभीत केलेल्या ( आपल्या चरणांपाशीं शरण आलेल्या ) ९ ह्या १० मला ( आपण इह पर लोकांच्या लाभाची अपेक्षा न करितां ) ११ केवळ १२ अत्यंत कृपाळुपणानें च ( महामोहरूप ) १३ निद्रेंतून १४ जागृत करून ( व सर्व अनर्थांपासून सोडवून ) १५ रक्षिलें १६ आहे. ॥ ५२० ॥

अनर्थ निवृत्तिरूप उपकाराचें निरूपण केलें आहे ॥ ५२० ॥

**नमस्तस्मै सदैकस्मै कस्मैचिन्महसे नमः ।**
**यदेतद्विश्वरूपेण राजते गुरुराज ते ॥ ५२१ ॥**

नमः । तस्मै । सदा । एकस्मै । कस्मैचित् । महसे । नमः ॥ यत् । एतत् । विश्वरूपेण । राजते । गुरुराज । ते ॥ ५२१ ॥

अर्थः—१ गुरुराज, २ जें ३ हें ( ब्रह्म ) ४ जगदाकारानें ( किंवा गुरु, शिष्य, शिष्यप्रशिष्य इत्यादि नाना रूपांनीं ) ५ प्रकाशित झालें आहे, ६ त्या कोणी ७ एका-मन व वाणी यांस अगोचर अशा-( आणि ) ८ निरंतर ९ एकरूप ( व ) १० तेजोरूप ( अशा ) ११ आणांपस १२ नमस्कार, १३ नमस्कार-पुनः पुनः नमस्कार असो. ॥ ५२१ ॥

श्रीगुरु निरपेक्ष असल्यामुळें विरक्त शिष्य नमस्कारांनींच त्यांची पूजा करीत आहे. ॥ ५२१ ॥

**इति नतमवलोक्य शिष्यवर्यं समाधिगतात्मसुखं**
**प्रबुद्धतत्त्वम् । * प्रमुदितहृदयः स देशिकेन्द्रः**
**पुनरिदमाह वचः परं महात्मा ॥ ५२२ ॥**

इति । नतं । अवलोक्य । शिष्यवर्यं । समाधिगतात्मसुखं । प्रबुद्धतत्त्वम् ॥ प्रमुदितहृदयः । सः । देशिकेन्द्रः । पुनः । इदं । आह । वचः । परं । महात्मा ॥ ५२२ ॥

अर्थः–( ज्याला ) १ निजानंदाचा साक्षात्कार झाला आहे, ( व ज्याला निरावरण ) २ ब्रह्मरूप कळलें आहे ( अशा त्या ) ३ उत्तम सच्छिष्याला ४ अशाप्रकारें-पुनः पुनः-५ नमस्कार करितांना ६ पाहून ( ज्यांच्या ) ७ हृदयांत आनंद झाला आहे ( असे ) ८ ते ९ महात्मे १० श्रीगुरु महाराज ११ पुनः १२ हें-पुढील-१३ उत्कृष्ट १४ वचन १५ बोलत झाले. ॥ ५२२ ॥

शिष्याचा अनुभव ऐकून गुरुमहाराज पुढें सांगितलया प्रमाणें ह्मणतात. ॥५२२॥

**ब्रह्मप्रत्ययसंततिर्जगदतो ब्रह्मैव * सत्सर्वतः**
**पश्याध्यात्मदृशा प्रशान्तमनसा सर्वास्ववस्थास्वपि**
**रूपादन्यदवेक्षितं किमभितश्चक्षुष्मतां दृश्यते**
**तद्वद्ब्रह्मविदः सतः किमपरं बुद्धेर्विहारास्पदम् ५२३**

ब्रह्मप्रत्ययसन्ततिः । जगत् । अतः । ब्रह्म । एव । सत् । सर्वतः । पश्य । अध्यात्मदृशा । प्रशान्तमनसा । सर्वासु । अवस्थासु । अपि ॥ रूपात् । अन्यत् । अवेक्षितं । किं । अभितः ।

* " प्रमुदितहृदयं " असाहि एका प्रतींत पाठ आहे. " ज्याच्या हृदयांतील शोक नष्ट झाला आहे " असा अर्थ करून " शिष्यवर्यं " ह्याचें विशेषण केलें आहे.

* " सत् " ह्या पदाबद्दल " तत् " ह्मणजे " तें-जग-" असा पाठ एका ठिकाणीं आहे.

चक्षुष्मतां । दृश्यते । तद्वत् । ब्रह्मविदः । सतः । किं । अपरं । बुद्धेः । विहारास्पदम् ॥ ५२३ ॥

अर्थः–( जाग्रदादि ) १ सर्व २ अवस्थांमध्यें ३ हि ४ विश्व ( घट आहे, पट आहे इत्यादि "आहे" ह्या रूपानें-सद्रूपानें- ) ५ ब्रह्माच्या प्रतीतीचाच प्रवाह ( आहे ), ६ ह्मणून ७ सर्व बाजूंनीं ( हें जग ) ८ सद्रूप ९ ब्रह्म १० च ( आहे, त्याहून वेगळें नाहीं असें ) ११ आत्मदृष्टि करून १२ रागद्वेषरहित चित्तानें १३ जाण. ( अविवेकी पुरुषांनीं नील, पीत इत्यादि ) सर्व १४ बाजूंस १५ पाहिलेला ( पदार्थ विवेकरूप ) १६ दृष्टि असणाऱ्या पुरुषांना १७ रूपाहून १८ दुसरा-वेगळा-१९ दिसतो २० काय ? नीलपीतादिरूपानें रूपच सामान्य असल्यामुळें तो रूपप्रत्ययाचाच प्रवाह आहे-२१ त्याप्रमाणेंच २२ ब्रह्मनिष्ठ पुरुषाच्या ( विवेकरहित नानारूप जग पाहणाऱ्या )२३ बुद्धीला २४ विहाराचें स्थान वृत्तिगोचर झालेलें जग-२५ सद्रूप ब्रह्माहून २६ दुसरें-वेगळें-२७ काय ( दिसणार ? कांहीं हि वेगळें न दिसतां सर्व ब्रह्मच दिसेल ). ॥ ५२३ ॥

तत्त्ववेत्त्याला सर्व ब्रह्मच दिसतें ॥ ५२३ ॥

**कस्तां परानन्दरसानुभूतिमुत्सृज्य शून्येषु रमेत विद्वान् । चन्द्रे महाह्लादिनि दीप्यमाने चित्रेन्दुमालोकयितुं क इच्छेत् ॥ ५२४ ॥**

कः । तां । परानन्दरसानुभूतिं । उत्सृज्य । शून्येषु । रमेत । विद्वान् ॥ चन्द्रे । महाह्लादिनि । दीप्यमाने । चित्रेन्दुं । आलोकयितुं । कः । इच्छेत् ॥ ५२४ ॥

अर्थः–१ कोणता २ विवेकी पुरुष ३ त्या ४ सारभूत आत्मानंदसाक्षात्काराला ५ सोडून ( ब्रह्माहून भिन्न मानल्यामुळें ) ६ कल्पित अशा विषयांच्या ठायीं ७ आसक्त होईल ? ८ अत्यानंद देणारा ९ चंद्र १० प्रकाशमान असतां ( भिंतीवर वगैरे काढिलेला ) ११ चित्रांतील चंद्र १२ पाहावयास १३ कोण १४ इच्छील ? ॥ ५२४ ॥

ब्रह्मभिन्न कल्पित दृश्याच्या ठिकाणीं विवेकी पुरुष रममाण होणार नाहीं, हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. ॥ ५२४ ॥

**असत्पदार्थानुभवेन किञ्चिन्नह्यस्ति तृप्तिर्न**
**च दुःखहानिः । तदद्वयानन्दरसानुभूत्या**
**तृप्तः सुखं तिष्ठ सदात्मनिष्ठया ॥ ५२५ ॥**

असत्पदार्थानुभवेन[1] । किञ्चित्[2] । न[6] । हि[3] । अस्ति[5] । तृप्तिः[4] । न[9] । च[7] । दुःखहानिः[8] ॥ तत्[10] । अद्वयानन्दरसानुभूत्या[11] । तृप्तः[12] । सुखं[14] । तिष्ठ[15] । सदात्मनिष्ठया[13] * ॥ ५२५ ॥

**अर्थः**–( सद्रूप ब्रह्माहून भिन्न अशा कोणत्याहि ) १ मिथ्या पदार्थाच्या अनुभवानें २ अल्प ३ देखील ४ तृप्ति ५ होत ६ नाहीं, ( तर इच्छा अधिकच वाढते ), ७ आणि ८ अत्यंत दुःखनिवृत्ति हि ( होत ) ९ नाहीं १० यास्तव ११ अद्वैतात्मानंदरसाच्या अनुभवानें १२ निरिच्छ ( होऊन ) १३ सद्रूप ब्रह्माहून प्रत्यगात्मा भिन्न नाहीं अशा ज्ञाननिष्ठेनें १४ आनंदानें-विक्षेपरहित होऊन-१५ रहा. ॥ ५२५ ॥

मिथ्यापदार्थांनीं कधींच तृप्ति होणार नाहीं, ह्मणून आत्मनिष्ठेनेंच रहावें. ॥५२५॥

**स्वमेव सर्वथा पश्यन् मन्यमानः स्वमद्वयम् ।**
**स्वानन्दमनुभुञ्जानः कालं नय महामते ॥ ५२६॥**

स्वं[6] । एव[7] । सर्वथा[5] । पश्यन्[8] । मन्यमानः[4] । स्वं[2] । अद्वयम्[3] ॥ स्वानन्दं[9] । अनुभुञ्जानः[10] । कालं[11] । नय[12] । महामते[1] ॥ ५२६ ॥

**अर्थः**–हे १ विशालबुद्धिमान् ( शिष्य, तूं ), २ स्वतांला ३ अद्वैत ४ मानून-आपण अद्वैत आहों असा निश्चय करून,- ५ सर्वकाळ सर्व पदार्थ ६ आपण ७ च ( आहों असें ) ८ पाहून-आत्माभिन्न मति टाकून -( रागद्वेषांचा अभाव असल्यामुळें केवळ ) ९ आत्मानंदाचा १० अनुभव घेऊन ( प्रारब्ध भोगानुसार आयुष्याचा ) ११ काल १२ व्यतीत कर. ५२६

---

* " सदा । आत्मनिष्ठया । " ह्मणजे " निरंतर आत्मनिष्ठेनें " अशीं दोन पदें हि पडतात.

बाह्य व्यापार न करितां वेळ कसा घालवावा तें सांगितलें. ॥ ५२६ ॥

**अखण्डबोधात्मनि निर्विकल्पे विकल्पनं व्योम्नि पुरप्रकल्पनम् । तदद्वयानन्दमयात्मना सदा शान्तिं परामेत्य भजस्व मौनम् ॥ ५२७॥**

अखण्डबोधात्मनि । निर्विकल्पे । विकल्पनं । व्योम्नि । पुरप्रकल्पनम् ॥ तत् । अद्वयानन्दमयात्मना । सदा । शान्तिं । परां । एत्य । भजस्व । मौनम् ॥ ५२७ ॥

अर्थः—१ भेदशून्य ( व ) २ अखंडबोधरूप अशा आत्म्याच्या ठायीं ३ भेद मानणें ( हें ) ४ आकाशांत ५ नगराची कल्पना ( करण्यासारखें आहे ). ६ म्हणून ( तूं ) ७ सर्वकाळ ८ अद्वैतानंदरूपानें ९ उत्कृष्ट १० शांतीप्रत ११ पावून-मनाची निश्चलता संपादून-१२ बाह्यदृष्टीच्या अभावाचा १३ अंगीकार कर-सर्वकाळ समाधि करून रहा. ५२७

वेळ घालविण्याचाच प्रकार सांगितला. ॥ ५२७ ॥

**तूष्णीमवस्था परमोपशान्तिर्बुद्धेरसत्कल्पविकल्पहेतोः । ब्रह्मात्मना ब्रह्मविदो महात्मनो यत्राद्वयानन्दसुखं निरन्तरम् ॥ ५२८ ॥**

तूष्णीं । अवस्था । परमा । उपशान्तिः । बुद्धेः । असत्कल्पविकल्पहेतोः ॥ ब्रह्मात्मना । ब्रह्मविदः । महात्मनः । यत्र । अद्वयानन्दसुखं । निरन्तरम् ॥ ५२८ ॥

अर्थः—१ ब्रह्मनिष्ठ २ महात्म्याची ३ मिथ्याभूत कल्पनांस हेतूभूत ( अशी जी बुद्धि त्या ) ४ बुद्धीची ५ ब्रह्मरूपतेनें ( चेतनाच्या ठायीं जी ) ६ लयरूप ७ अवस्था ( ती ) ८ उत्कृष्ट ९ शांति-सर्वथा द्वैतविस्मृतिरूप विक्षेपरहित अवस्था-( आहे ). १० त्या ( अवस्थेंत ) ११ बाह्याभ्यंतर अनात्मप्रत्ययांचें व्यवधान नसून ( सहज ) १२ अद्वयानंदाचा अनुभव ( होतो ). ॥ ५२८ ॥

पूर्व श्लोकांतील " मौनं भजस्व " ह्या पदांचें विवरण केलें आहे. ॥ ५२८ ॥

**नास्ति निर्वासनान्मौनात्परं सुखकृदुत्तमम् ।**
**विज्ञातात्मस्वरूपस्य स्वानन्दरसपायिनः ॥ ५२९ ॥**

न[9] । अस्ति[8] । निर्वासनात्[3] । मौनात्[4] । परं[5] । सुखकृत्[6] ।
उत्तमम्[7] ॥ विज्ञातात्मस्वरूपस्य[1] । स्वानन्दरसपायिनः[2] ॥ ५२९ ॥

**अर्थः**–( ज्यानें ) १ आत्मतत्वाचा साक्षात्कार केला आहे, ( व जो ) २ सारभूत स्वानंदाचा अनुभव घेऊं लागला आहे, ( अशा पुरुषाला बाह्याभ्यंतर ) ३ वासनारहित ( पूर्वोक्त ) ४ मौनाहून ५ दुसरें ( श्रमपरिहार करून ) ६ सुख देणारें ७ उत्कृष्ट ( साधन ) ८ विद्यमान ९ नाहीं. ॥ ५२९ ॥

पूर्वोक्त अर्थच विस्तारानें सांगितला आहे. ॥ ५२९ ॥

**गच्छंस्तिष्ठन्नुपविशञ्छयानो वाऽन्यथापि वा ।**
**यथेच्छया वसेद्विद्वानात्मारामः सदा मुनिः ।५३०।**

गच्छन्[4] । तिष्ठन्[5] । उपविशन्[6] । शयानः[8] । वा[7] । अन्यथा[10] ।
अपि[11] । वा[9] ॥ यथा[13] । इच्छया[14] । वसेत्[15] । विद्वान्[3] । आत्मारामः[1] ।
सदा[12] । मुनिः[2] ॥ ५३० ॥

**अर्थः**–१ स्वरूपीं तृप्त असलेला, २ मननशील ३ ब्रह्मवेत्ता ( तीर्थाला ) ४ जावो, ( निर्जन वनांत ) ५ असो, ( स्थिरसुखादि आसनांवर ) ६ बसो, ७ किंवा ( पृथ्वी तलावर ) ८ शयन करो; ९ अथवा १० ह्याच्या उलट ११ हि ( निषिद्ध देशाला जावो, सभेंत असो, मूर्खांत बसो, किंवा मोठ्या वाड्यांत शयन करो; तो ) १२ सर्वकाळ १३ ज्याप्रमाणें ( इच्छा होईल त्या आपल्या १४ इच्छानुसार १५ वागेल, ( कधींहि परतंत्रतेनें वागणार नाहीं ). ॥ ५३० ॥

ब्रह्मवेत्त्याची सर्वकाळ समाधिस्थिति असून तो निरंकुश असतो, ह्मणून त्याच्या चेष्टा नियमित नसतात. ॥ ५३० ॥

**न देशकालासनदिग्यमादिलक्ष्याद्यपेक्षाऽप्रति बद्धवृत्तेः । संसिद्धतत्त्वस्य महात्मनोऽस्ति स्ववेदने का * नियमाद्यवस्था ॥ ५३१ ॥**

न[6] । देशकालासनदिग्यमादिलक्ष्याद्यपेक्षा[4] । अप्रतिबद्धवृत्तेः[1] ॥ संसिद्धतत्त्वस्य[2] । महात्मनः[3] । अस्ति[5] । स्ववेदने[7] । का[9] । नियमाद्यवस्था[8] ॥ ५३१ ॥

**अर्थः**–( ज्याची ) १ प्रतिबंधरहित वृत्ति आहे ( व ज्यानें ) २ आत्मस्वरूपाचा यथार्थ निश्चय केला आहे ( अशा क्षोभरहित चित्ताच्या ) ३ महात्म्याला ( अरण्यादि ) ४ देश, ( दर्श अमावास्यादि ) काल, ( स्थिरसुखादि ) आसनें, ( उत्तरादि ) दिशा, ( यमनियमादि ) यम, ( व स्थूल सुक्ष्मादि ) लक्ष्याच्याठायीं ( धारणादि ), यांची अपेक्षा ५ राहत ६ नाहीं. ७ ब्रह्मात्मज्ञानाविषयीं ( देशकालादि ) ८ नियमादिकांची व्यवस्था ९ कोणती ( असणार ? कोणतीहि नसणार ). । ५३१।

आत्मज्ञानी पुरुषाला देशकालादिकांची अपेक्षा नाहीं ॥ ५३१ ॥

**घटोऽयमिति विज्ञातुं नियमः *कोन्ववेक्ष्यते । विना प्रमाणसुष्ठुत्वं यस्मिन् सति पदार्थधीः ॥ ५३२ ॥**

घटः[2] । अयं[1] । इति[3] । विज्ञातुं[4] । नियमः[8] । कः[7] । नु । अवेक्ष्यते[10] ॥ विना[6] । प्रमाणसुष्ठुत्वं[5] । यस्मिन्[11] । सति[12] । पदार्थधीः[13] ५३२

**अर्थः**–१ हा २ घट ( आहे ) ३ असा ४ साक्षात्कार होण्याला ( नेत्रादि ) ५ प्रमाणाच्या निर्दोषत्वा ६ शिवाय ७ कोणता ८ बरें

* " नियमाद्यपेक्षा " ह्मणजे " नियमादिकांची आवश्यकता " असाहि पाठ आहे.

* " कोन्वपेक्ष्यते " ह्मणजे " कोणता बरें अवश्य आहे ? " असाहि पाठ आहे.

( देशादिकांचा ) ९ नियम १० पाहण्यांत येतो ? ११ तें ( नेत्रादिकांचें निर्दोषत्व ) १२ असलें ह्मणजे १३ पदार्थज्ञान ( होतें, व तें नसलें तर होत नाहीं ). ॥ ५३२ ॥

ज्ञानहोण्याला प्रमाणाचीच अपेक्षा असते, हें उदाहरणानें दाखविलें आहे. ५३२

**अयमात्मा नित्यसिद्धः प्रमाणे सति भासते । न देशं नापि वा कालं न शुद्धिं वाप्यपेक्षते ।५३३।**

अयं । आत्मा । नित्यसिद्धः । प्रमाणे । सति । भासते ॥ न । देशं । न । अपि । वा । कालं । न । शुद्धिं । वा । अपि । अपेक्षते ॥ ५३३ ॥

**अर्थः**–१ हा-सर्वांच्या अनुभवाला येणारा-२ आत्मा ३ नित्य सिद्ध-स्वरूप ( आहे. तो )४ प्रमाण ५ असलें ह्मणजे ६ प्रतीत होतो-प्रमाणजन्य ज्ञानाचा विषय होतो-( तो ) ७ देशाची ८ अपेक्षा करीत ९ नाहीं, १० किंवा ११ कालाची १२ हि ( करीत ) १३ नाहीं, १४ अथवा १५ शुद्धीची १६ देखील ( अपेक्षा करीत ) १७ नाहीं. ( यागयागादि क्रियारूप असल्यामुळें त्यांच्या सिद्धीला कालादिकांची अपेक्षा असते, आणि आत्मा नित्यसिद्ध असल्यामुळें त्याला देशकालादिकांची अपेक्षा नाहीं, परंतु त्याच्या प्रकटते साठीं प्रमाणांच्या प्रवृत्तीची अपेक्षा आहे. नाहीं-तर प्रमाणापेक्षेच्या अभावीं सर्वच पुरुष आत्मज्ञानी झाले पाहिजेत ). ५३३

प्रमाणांची अपेक्षा असणें व नसणें ह्यांचें कारण सांगितलें ॥ ५३३ ॥

**देवदत्तोऽहमित्येतद्विज्ञानं निरपेक्षकम् । तद्वद् ब्रह्मविदोऽप्यस्य ब्रह्माहमिति वेदनम् ॥ ५३४ ॥**

देवदत्तः । अहं । इति । एतद् । विज्ञानं । निरपेक्षकम् ॥ तद्वत् । ब्रह्मविदः । अपि । अस्य । ब्रह्म । अहं । इति । वेदनम् ॥ ५३४ ॥

अर्थः–१ मी २ देवदत्त ( आहें ) ३ असा ४ हा-व्यक्तिमात्र विषयक ५ साक्षात्कार ( देशकालादिकांच्या ) अपेक्षे ६ विरहित आहे ७ त्या प्रमाणेंच ८ ह्या ९ ब्रह्मवेत्त्याचा १० देखील ११ मी १२ ब्रह्म ( आहें ) १३ असा १४ साक्षात्कार ( देशकालादिकांच्या अपेक्षेवांचून आहे. दोहोंकडेहि स्वरूपज्ञान सारखेंच आहे. ) ॥ ५३४ ॥

लौकिक ज्ञानाप्रमाणें ब्रह्मज्ञानालाहि देशकालादिकांची अपेक्षा नाहीं. ॥ ५३४ ॥

**भानुनेव जगत्सर्वं भासते यस्य तेजसा । अनात्मकमसत्तुच्छं किं नु तस्यावभासकम् ॥ ५३५ ॥**

**भानुना । इव । जगत् । सर्वं । भासते । यस्य । तेजसा ॥ अनात्मकं । असत् । तुच्छं । किं । नु । तस्य । अवभासकम् ५३५**

अर्थः––१ ज्याप्रमाणें २ सूर्याच्या योगानें ( ५ सर्व ६ जग १० प्रकाशित होतें, त्याप्रमाणें ) ३ ज्या ( नित्य स्फुरद्रूप ब्रह्माच्या ) ४ प्रकाशानें ५ सर्व ६ जग ७ आत्मभिन्न, ८ मिथ्याभूत ( आणि ) ९ तुच्छ ( असें ) १० प्रत्ययाला येतें, ११ त्या ( सर्वांना प्रकाशित करणाऱ्या ब्रह्माला ) १२ प्रकाशित करणारें १३ काय १४ बरें ( असणार ? कांहीं हि नसणार ). ॥ ५३५ ॥

स्वयंप्रकाश आत्म्याला प्रकाशित करणारें कांहीं हि नाहीं. ॥ ५३५ ॥

**वेदशास्त्रपुराणानि भूतानि सकलान्यपि । येनार्थवन्ति तं किंनु विज्ञातारं प्रकाशयेत् ॥ ५३६ ॥**

**वेदशास्त्रपुराणानि । भूतानि । सकलानि । अपि ॥ येन । अर्थवन्ति । तं । किं । नु । विज्ञातारं । प्रकाशयेत् ॥५३६॥**

अर्थः–+ ( चार ) १ वेद, ( ✽ सहा ) शास्त्रें, ( ɸ अठरा ) पुराणें

---

+ ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद आणि अथर्ववेद. ✽ सांख्य, योग, न्याय, वैशेषिक मीमांसा आणि वेदांत.

ɸ ब्राह्मं पाद्मं वैष्णवं च शैवं भागवतं तथा । तथान्यन्नारदीयं च मार्कंडेयं च सप्तमम् ॥ १ ॥ आग्नेयमष्टकं प्रोक्तं भविष्यन्नवमं तथा । दशमं ब्रह्मवैवर्तं लिंगमेकादशं तथा ॥ २ ॥ वाराहं द्वादशं प्रोक्तं स्कांदं चात्र त्रयोदशम् । चतुर्दशं वामनं च कौर्मं पंचदशं तथा ॥ ३ ॥ मात्स्यं च गारुडं चैव ब्रह्मांडाष्टादशं तथा । ( ब्राह्मं ह्मणजे ब्रह्मपुराण, पाद्मं ह्मणजे पद्मपुराण इत्यादि ).

( आणि आकाशादि पांच ) २ भूतें ( हीं ) ३ सर्व ४ हि ५ ज्या ( ज्ञानस्वरूप आत्म्याकडून ६ सार्थ-तो तो अर्थ प्रतिपादन करण्यास समर्थ-होतात ), ७ त्या ८ ज्ञानस्वरूप ( आत्म्याला ) ९ काय १० बरें ११ प्रकाशित करील ? ॥ ५३६ ॥

सर्वांना प्रकाशित करणाऱ्या आत्म्याला प्रकाशित करणारें कांहीं नाहीं. ॥५३६॥

**एष स्वयंज्योतिरनन्तशक्तिरात्माऽप्रमेयः सकलानुभूतिः । यमेव विज्ञाय विमुक्तबन्धो जयत्ययं ब्रह्मविदुत्तमोत्तमः ॥ ५३७ ॥**

एषः[8] । स्वयंज्योतिः[10] । अनन्तशक्तिः[11] । आत्मा[9] । अप्रमेयः[12] । सकलानुभूतिः[13] ॥ यं[3] । एव[4] । विज्ञाय[5] । विमुक्तबन्धः[6] । जयति[7] । अयं[1] । ब्रह्मविदुत्तमोत्तमः[2] ॥ ५३७ ॥

**अर्थः**-१ हा २ उत्तम ब्रह्मज्ञान्यांहून हि उत्तम ब्रह्मवेत्ता ३ ज्या ( आत्म्याचा ) ४ च ५ साक्षात्कार करून ( अविद्या व अविद्याकार्यरूप ) ६ बंधविरहित ( होऊन ) ७ उत्कर्ष पावतो, ( तो ) ८ हा ९ आत्मा १० स्वप्रकाश, ११ त्रिविधसामर्थ्ययुक्त, १२ प्रमाणांचा अविषय ( आणि ) १३ सर्वांना अनुभवरूप ( असा आहे ). ॥ ५३७ ॥

स्वयंप्रकाश आत्मा सर्वांना अनुभवरूप आहे. ॥ ५३७ ॥

**न खिद्यते नो विषयैः प्रमोदते न सज्जते नापि विरज्यते च । स्वस्मिन् सदा क्रीडति नन्दति स्वयं निरन्तरानन्दरसेन तृप्तः ॥ ५३८ ॥**

न[2] । खिद्यते[1] । नो[5] । विषयैः[3] । प्रमोदते[4] । न[7] । सज्जते[6] । न[11] । अपि[10] । विरज्यते[9] । च[8] ॥ स्वस्मिन्[12] । सदा[13] । क्रीडति[14] । नन्दति[16] । स्वयं[15] । निरन्तरानन्दरसेन[17] । तृप्तः[18] ॥ ५३८ ॥

अर्थः—( द्रव्यादिकांचा वियोग झाला असतां तो उत्तम ब्रह्मवेत्ता ) १ खेद पावत २ नाहीं, ( द्रव्यादि ) ३ विषयांच्या ( लाभानें ) हर्ष ४ पावत ५ नाहीं, ( कोणत्या हि सुखसाधनाच्या ठायीं ) ६ आसक्त होत ७ नाहीं, ८ आणि ( कोणत्या हि दुःखसाधनामुळें ) ९ उद्वेगाला १० हि प्राप्त होत ११ नाहीं. ( तो ) १२ आत्म्याच्या ठायींच १३ सर्वकाळ १४ रममाण असतो, ( बाह्यक्रीडांपासून उपरत होतो ), १५ आत्मस्वरूपींच १६ आनंद पावतो, ( आणि ) १७ नित्यानंदाच्या अनुभवानेंच १८ कृतार्थ होतो. ॥ ५३८ ॥

उत्तम ब्रह्मवेत्ता स्वरूपींच रत असून स्वरूपानंदानेंच कृतार्थ असतो. ॥ ५३८ ॥

**क्षुधां देहव्यथां त्यक्त्वा बालः क्रीडति वस्तुनि ।**
**तथैव विद्वान् रमते निर्ममो निरहं सुखी ॥५३९॥**

क्षुधां[2] । देहव्यथां[3] । त्यक्त्वा[4] । बालः[1] । क्रीडति[6] । वस्तुनि[5] ॥
तथा[7] । एव[8] । विद्वान्[9] । रमते[12] । निर्ममः[10] । निरहं[11] । सुखी[13] ५३९

अर्थः—१ लहान मुलगा ( ज्याप्रमाणें ) २ भूक ( आणि ) ३ शारीरिक श्रम ४ सोडून-त्यांविषयीं चिंतन न करून-( चेंडू वगैरे ) ५ पदार्थांबरोबर ६ खेळत असतो; ७ त्याप्रमाणें ८ च ९ ब्रह्मवेत्ता १० ममताशून्य ( व ) ११ अहंकाररहित ( होऊन ५ ब्रह्मात्मस्वरूपीं ) १२ रममाण होतो, ( आणि स्वरूपानंदानेंच ) १३ सुखी ( होतो. बाह्य भोगांनीं सुखी होत नाहीं ). ॥ ५३९ ॥

ब्रह्मवेत्ता स्वरूपींच रत असतो हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. ॥ ५३९ ॥

**चिन्ताशून्यमदैन्यभैक्षमशनं पानं सरिद्वारिषु**
**स्वातन्त्र्येण निरङ्कुशा स्थितिरभीर्निद्रा श्मशाने वने ।**
**वस्त्रं क्षालनशोषणादिरहितं दिग्वास्तु शय्या मही**
**संचारो निगमान्तवीथिषु विदां क्रीडा परे ब्रह्मणि ५४०**

चिन्ताशून्यं । अदैन्यभैक्षं । अशनं । पानं । सरिद्वारिषु । स्वातन्त्र्येण । निरङ्कुशा । स्थितिः । अभीः । निद्रा । श्मशाने । वने ॥ वस्त्रं । क्षालनशोषणादिरहितं । दिक् । वा । अस्तु । शय्या । मही । संचारः । निगमान्तवीथिषु । विदां । क्रीडा । परे । ब्रह्मणि ॥ ५४० ॥

अर्थः-१ ब्रह्मवेत्त्यांचें २ भोजन ( पीठ आणणें, मळणें वगैरे ) ३ चिंतनरहित ( आणि यजमानापुढें ) ४ दीनता न दाखवितां भिक्षा मागून मिळविलेलें ( असतें ); ५ पिणें ( गंगा, गोदावरी इत्यादि ) ६ नद्यांचें पाणीं ( असतें; ७ राहणें ८ स्वच्छंदानें ९ पराधीनतावार्जित ( व ) १० निर्भय ( असतें ); ११ झोंप घेणें ( वैराग्याला हेतुभूत अशा ) १२ स्मशानांत ( किंवा निर्जन ) १३ वनांत ( असतें ); १४ वस्त्र धुणें, १५ वाळविणें, इत्यादिकांची गरज नसलेलें १६ दिशारूप १७ असो, १८ किंवा ( काषायादिक अथवा वृक्षांच्या सालीचें असो ); १९ शय्या २० भूमि ( असते ), २१ फिरणें २२ वेदांतरूप मार्गांत ( आणि ) २३ खेळणें २४ निर्गुण २५ ब्रह्माच्या ठायीं ( असतें ).-ते ब्रह्मविचारांत, ब्रह्मध्यानांत व ब्रह्मज्ञानांतच तत्पर असतात. ॥ ५४० ॥

ब्रह्मवेत्त्यांच्या भोजनादि क्रियांचा व क्रीडेचा प्रकार सांगितला. ॥ ५४० ॥

**विमानमालम्ब्य शरीरमेतद् भुनक्त्यशेषान्**
**विषयानुपस्थितान् । परेच्छया बालवदात्मवेत्ता**
**योऽव्यक्तलिङ्गोऽननुषक्तबाह्यः ॥ ५४१ ॥**

विमानं । आलम्ब्य । शरीरं । एतद् । भुनक्ति । अशेषान् । विषयान् । उपस्थितान् ॥ परेच्छया । बालवत् । आत्मवेत्ता । यः । अव्यक्तलिङ्गः । अननुषक्तबाह्यः ॥ ५४१ ॥

अर्थः-१ ब्रह्मवेत्ता २ ह्या ३ शरीराचा ४ विमाना प्रमाणें ५ आश्रय करून ( प्रारब्धानुसार ) ६ प्राप्त झालेल्या ७ सर्व ( अन्नपानादि ) ८

विषयांचा ९ दुसऱ्यांच्या इच्छेनें १० लहान मुलाप्रमाणें ११ भोग घेतो. १२ त्या ( ब्रह्मवेत्त्याचें वर्णाश्रमादि ) १३ लक्षण प्रकट नसतें, ( आणि त्याचें चित्त ) १४ बाह्य ( विषयांच्या ठायीं ) आसक्त नसतें. ५४१

प्रारब्धानुसार प्राप्त झालेल्या विषयांचें सेवन ब्रह्मवेत्ता लहान मुलाप्रमाणें करितो. ५४१

दिगम्बरो वापि च साम्बरोवा त्वगम्बरो वापि
चिदम्बरस्थः । उन्मत्तवद्वापि च बालवद्वा
पिशाचवद्वापि चरत्यवन्याम् ॥ ५४२ ॥

दिगम्बरः । वा । अपि । ×च । साम्बरः । *वा । त्वगम्बरः । वा । अपि । चिदम्बरस्थः ॥ उन्मत्तवत् । वा । अपि । च । बालवत् । ф वा । पिशाचवत् । वा । अपि । चरति । अवन्याम ५४२

**अर्थः**—( स्वेच्छेनें ) १ दिशारूप वस्त्र धारण करणारा-नग्न २ किंवा ( परेच्छेनें ) ३ वस्त्र धारण करणारा ४ हि, ५ किंवा ( झाडांच्या ) ६ सालींचें वस्त्र धारण करणारा ७ हि, ८ आणि ९ चिदाकाशांत राहून ( लोकांचा संग होऊं नये ह्मणून ) १० वेड्यासारखा ११ किंवा ( ब्रह्मवेत्त्यांच्या समागमांत ) १२ मुलासारखा १३ हि १४ किंवा ( वाईट लोकांचा उपसर्ग न व्हावा ह्मणून ) १५ पिशाचाप्रमाणें १६ हि ( ब्रह्मवेत्ता ह्या ) १७ पृथ्वीवर. १८ संचार करितो. ॥ ५४२ ॥

ब्रह्मवेत्ता वायूप्रमाणें निर्लेप राहून आपल्या इच्छेप्रमाणें पृथ्वीवर संचार करितो. ५४२

कामान्निष्कामरूपी संश्चरत्येकचरो मुनिः ।
स्वात्मनैव सदा तुष्टः स्वयं सर्वात्मना स्थितः ५४३

---

× " च ", " वा " इत्यादि अव्ययें संस्कृतांत पुष्कळ वेळां नुसतीं पादपूरणार्थ असतात.

* वरील टीप पहा.

ф वरील टीप पहा.

कामान् । निष्कामरूपी । सन् । चरति । एकचरः । मुनिः ॥
स्वात्मना । एव । सदा । तुष्टः । स्वयं । सर्वात्मना । स्थितः ५४३

अर्थः-१ एकटा फिरणारा, ( भोगांनीं नव्हे तर ) २ स्वरूपाच्या योगानें ३ च ४ सर्वकाळ ५ संतुष्ट असणारा ( आणि परिच्छेद बुद्धि टाकून ) ६ आत्मस्वरूपालाच ७ सर्वात्मा ( जाणून ) ८ राहणारा ९ ब्रह्मवेत्ता १० निष्काम ११ होऊन १२ भोग १३ भोगितो. ॥ ५४३ ॥

ब्रह्मवेत्ता निष्कामतेनें विषय सेवन करितो. ॥ ५४३ ॥

क्वचिन्मूढो विद्वान् क्वचिदपि महाराजविभवः
क्वचिद्भ्रान्तः सौम्यः क्वचिदजगराचारकलितः ।
क्वचित्पात्रीभूतः क्वचिदवमतः क्वाप्यविदित-
श्चरत्येवं प्राज्ञः सततपरमानन्दसुखितः ॥ ५४४ ॥

क्वचित् । मूढः । विद्वान् । क्वचित् । अपि । महाराजविभवः ।
क्वचित् । भ्रान्तः । सौम्यः । क्वचित् । अजगराचारकलितः ॥
क्वचित् । पात्रीभूतः । क्वचित् । अवमतः । क्व । अपि । अविदितः ।
चरति । एवं । प्राज्ञः । सततपरमानन्दसुखितः ॥ ५४४ ॥

अर्थः-( अंतरांत ) १ सतत निरतिशयानंदरूप आत्मलाभानें विक्षेप व शोक यांनीं विरहित ( असा ) २ ब्रह्मवेत्ता ३ कोठें ( मूर्खांना लक्षण न कळल्यामुळें ) ४ मूर्ख ( होतो, व कोठें विद्वानांस ओळख पटल्यामुळें ) ५ विद्वान् ( होतो ). ६ कोठें ( श्रीमंत मुमुक्षूंनीं अर्पण केलेल्या वैभवामुळें ) ७ राजासारखें ऐश्वर्य भोगणारा ८ हि ( होतो ). ९ कोठें ( देशांतरांत ) १० भ्रमण करणारा ( होतो, व कोठें ) ११ प्रियदर्शन ( होतो ). १२ कोठें ( दृष्टीचा संकोच करून ) १३ अजगरवृत्ति धारण करितो. १४ कोठें ( विद्वानांच्या समाजांत ) १५ सत्कार पावतो १६ कोठें ( मूर्खांकडून ) १७ अपमान पावतो. १८ कोठें १९ अज्ञात २० हि ( असतो ), २१ अशारीतीनें ( तो ) २२ संचार करीत असतो. ॥ ५४४ ॥

ब्रह्मवेत्ता अनेक प्रकारांनीं पृथ्वीवर संचार करितो. ॥ ५४४ ॥

**निर्धनोऽपि सदा तुष्टोऽप्यसहायो महाबलः ।**
**नित्यतृप्तोप्यभुञ्जानोप्यसमः समदर्शनः ॥ ५४५ ॥**

निर्धनः । अपि । सदा । तुष्टः । अपि । असहायः । महाबलः ॥ नित्यतृप्तः । अपि । अभुञ्जानः । अपि । असमः । समदर्शनः ॥ ५४५ ॥

अर्थः–( ब्रह्मवेत्ता ) १ निर्धन ( असून ) २ हि ( स्वात्मलाभरूप धनानें ) ३ सर्वदा ४ संतुष्ट ( असतो सजातीय ) ५ साहाय्यकर्ता नसून ६ हि ( विवेकधैर्यादिरूप ) प्रबलशक्तियुक्त ( असतो ). ८ बाह्य भोग भोगीत नसून ९ हि ( स्वात्मानंदानुभवानें ) १० नित्यतृप्त ( असतो ) ११ उपमारहित ( असून ) १२ हि ( सर्वत्र शत्रुमित्रांच्या ठायीं ) १३ सारखी दृष्टि ठेवणारा ( असतो ). ॥ ५४५ ॥

ब्रह्मवेत्याच्या विचित्र वैभवाचें वर्णन केलें आहे. ॥ ५४५ ॥

**अपि कुर्वन्नकुर्वाणश्चाभोक्ता फलभोग्यपि ।**
**शरीर्यप्यशरीर्येष परिच्छिन्नोऽपि सर्वगः ॥ ५४६ ॥**

अपि । कुर्वन् । अकुर्वाणः । च । अभोक्ता । फलभोगी । अपि ॥ शरीरी । अपि । अशरीरी । एषः । परिच्छिन्नः । अपि । सर्वगः ॥ ५४६ ॥

अर्थः–१ हा ( ब्रह्मवेत्ता प्राकृत जनांच्या दृष्टीनें क्रिया ) २ करीत असतां ३ हि ( आत्मा अकर्ता आहे ह्या ज्ञानामुळें स्वदृष्टीनें ) ४ अकर्ता ( आहे ); ५ आणि ( आपल्या अदृष्टानुसार भोगी जनांच्या दृष्टीनें सुख-दुःखादि ) ६ फल भोगीत असतां ७ हि ( स्वतां ) ८ अभोक्ता ( आहे. लोक दृष्टीनें ) ९ देहधारी असतां १० हि ( स्वतां ) ११ शरीरसंबंध-शून्य ( आहे, आणि मूर्खांच्या दृष्टीनें एकादेशांत कोठें तरी राहणारा )

१२ परिच्छिन्न असतां ) १३ हि ( सर्व आत्माच आहे असा निश्चय असल्यामुळें स्वतां ) १४ सर्वव्यापक ( आहे ). ॥ ५४६ ॥

ब्रह्मवेत्त्याचें विचित्र वैभवच सांगितलें. ॥ ५४६ ॥

**अशरीरं सदा सन्तमिमं ब्रह्मविदं क्वचित् । प्रिया-**
**प्रिये न स्पृशतस्तथैव च शुभाशुभे ॥ ५४७ ॥**

**अशरीरं । सदा । सन्तं । इमं । ब्रह्मविदं । क्वचित् ॥**
**प्रियाप्रिये । न । स्पृशतः । तथा । एव । च । शुभाशुभे । ५४७ ।**

**अर्थः**–१ ह्या २ ब्रह्माला आपला आत्मा जाणणाऱ्या ( आणि ह्मणूनच ) ३ शरीराभिमान नसणाऱ्या ( व ) ४ सर्वकाळ ५ विद्यमान असणाऱ्या ( ब्रह्मवेत्त्याला ) ६ केव्हांही ७ सुखदुःखें ८ आणि ९ तशीं १० च ११ पुण्यपापें १२ स्पर्श करीत १३ नाहींत. ॥ ५४७ ॥

ब्रह्मवेत्त्याला शरीराभिमान नसतो, ह्मणून सुखदुःखादिकांचा संबंध नसतो. ५४७

**स्थूलादिसम्बन्धवतोऽभिमानिनः सुखं च दुःखं च**
**शुभाशुभे च । विध्वस्तबन्धस्य सदात्मनो मुनेः**
**कुतः शुभं वाप्यशुभं फलं वा ॥ ५४८ ॥**

**स्थूलादिसम्बन्धवतः । अभिमानिनः । सुखं । च । दुःखं ।**
*** च । शुभाशुभे । च ॥ विध्वस्तबन्धस्य । सदात्मनः । मुनेः ।**
**कुतः । शुभं । वा । अपि । अशुभं । फलं । वा ॥ ५४८ ॥**

**अर्थः**–१ स्थूल शरीरादिकांचा संबंध असणाऱ्या ( व त्यांचा ) २ अभिमान धरणाऱ्या ( पुरुषाला ) ३ सुख ४ आणि ५ दुःख ६ आणि ७ पुण्यपापें ( स्पर्श करितात. परंतु ज्याचा अभिमानरूप ) ८ बंध नष्ट झाला आहे, ( व ज्यानें ) ९ आपणास सद्रूप ब्रह्म ( जाणलें आहे अशा ) १० ब्रह्मवेत्त्याला ११ पुण्य १२ किंवा १३ पाप १४ हिं किंवा ( त्यांची ) १५ फळें ( सुखदुःखें हीं ) १६ कोठून ( होणार )? ५४८

---

* पानावरील टीप पहा.

सुखदुःखादिकांचा संबंध कोणाला असतो व तो ब्रह्मवेत्त्याला कां नसतो हें सांगितलें.५४८

तमसा ग्रस्तवद्भानादग्रस्तोऽपि रविर्जनैः ।
ग्रस्त इत्युच्यते भ्रान्त्या ह्यज्ञात्वा वस्तुलक्षणम् ५४९
तद्वद्देहादिबन्धेभ्यो विमुक्तं ब्रह्मवित्तमम् ।
पश्यन्ति देहवन्मूढाः शरीराभासदर्शनात् ॥५५०॥

तमसा । ग्रस्तवत् । भानात् । अग्रस्तः । अपि । रविः । जनैः ॥ ग्रस्तः । इति । उच्यते । भ्रान्त्या । हि । अज्ञात्वा । वस्तुलक्षणम् ॥ ५४९ ॥ तद्वत् । देहादिबन्धेभ्यः । विमुक्तं । ब्रह्मवित्तमम् ॥ पश्यन्ति । देहवत् । मूढाः । शरीराभासदर्शनात् ५५०

**अर्थः**–( ज्याप्रमाणें ) १ वस्तूचें निर्मल सूर्याचें लक्षण-स्वच्छ स्वरूप-२ न जाणून ( प्राकृत ) ३ जन, ४ आच्छादित न झालेला ५ हि ६ सूर्य ७ आच्छादित झाल्यासारखा ८ भासल्यामुळें, ९ राहूनं १० ग्रासलेला ( आहे ) ११ असें १२ भ्रमानें १३ च १४ ह्मणतात; १५ तद्वत् १६ आत्मज्ञानशून्य ( पुरुष ) १७ देहादिबंधनांहून १८ विरहित ( अशा ) १९ ब्रह्मवेत्त्याला ( ज्याचा अभिमान सुटला आहे अशा त्याच्या ) २० आभासमात्र शरीराला पाहून २१ देहवान् २२ समजतात. ।५४९।५५०।

ब्रह्मवेत्त्याला देहाभिमान नसतोच हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. ॥ ५४९ ॥ ५५० ॥

अहिर्निर्ल्वयनीं वायं मुक्त्वा देहं तु तिष्ठति ।
इतस्ततश्चाल्यमानो यत्किञ्चित्प्राणवायुना ॥५५१॥

अहिः । निर्ल्वयनीं । वै । अयं । मुक्त्वा । देहं । तु । तिष्ठति ॥ इतः । ततः । चाल्यमानः । यत् । किञ्चित् । प्राणवायुना ।५५१।

**अर्थः**– १ जसा २ सर्प ३ कंचुक-कांत-मेंग-( ६ टाकून १४ राहतो, तसा ) ४ हा ( ब्रह्मवेत्ता ) ५ देहाला ६ टाकून ७ च-मी देह नाहीं

व देह माझा नाहीं अशा पूर्ण निश्चयानें देहाभिमान सोडून च-८ प्राणवायूच्या योगानें ९ इकडे १० तिकडे ११-१२ अल्पमात्र १३ हालचाल करून १४ असतो-किंचित् चेष्टा करीत आहे असा प्रत्ययाला येतो, परंतु तो त्या चेष्टांकडे पहात हि नाहीं. ॥ ५५१ ॥

ब्रह्मवेत्त्याचा देहाभिमान सुटलेला असून देह केवळ प्रारब्धाधीन असतो हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. ॥ ५५१ ॥

**स्रोतसा नीयते दारु यथा निम्नोन्नतस्थलम् ।**
**दैवेन नीयते देहो यथाकालोपभुक्तिषु ॥ ५५२ ॥**

स्रोतसा । नीयते । दारु । यथा । निम्नोन्नतस्थलम् ॥
दैवेन । नीयते । देहः । यथाकालोपभुक्तिषु ॥ ५५२ ॥

**अर्थः**–१ ज्याप्रमाणें २ नदीच्या प्रवाहानें ३ लांकूड ४ उंच नीच स्थलीं ५ प्राप्त होतें, ( त्या प्रमाणें ब्रह्मवेत्त्याचा ) ६ देह हि ७ यथाकाळीं ( प्राप्त झालेल्या भोजनादि ) क्रियांच्या ठायीं प्रारब्ध कर्मानें प्राप्त होतो; ( त्यांमध्यें त्याचा लेशमात्राहि अभिमान नसतो ). ॥ ५५२ ॥

ब्रह्मवेत्त्याच्या देहांतील प्राणांच्या क्रियाहि प्रारब्धानुसार होतात हें सदृष्टांत सांगितलें. ॥ ५५२ ॥

**प्रारब्धकर्मपरिकल्पितवासनाभिः संसारि-**
**वच्चरति भुक्तिषु मुक्तदेहः । सिद्धः स्वयं**
**वसति साक्षिवदत्र तूष्णीं चक्रस्य**
**मूलमिव कल्पविकल्पशून्यः ॥ ५५३ ॥**

प्रारब्धकर्मपरिकल्पितवासनाभिः । संसारिवत् । चरति । भुक्तिषु । मुक्तदेहः ॥ सिद्धः । स्वयं । वसति । साक्षिवत् । अत्र । तूष्णीं । चक्रस्य । मूलं । इव । कल्पविकल्पशून्यः ५५३

**अर्थः**–ज्यानें १ देहाभिमान सोडिला आहे ( असा हा ब्रह्मवेत्ता ) २ प्रारब्ध कर्मांनीं कल्पिलेल्या भोगसंस्कारांच्या योगानें ( अन्नपानादि )

३ भोगांच्या ठायीं ( अभिमानरहित होऊन ) ४ अज्ञानी पुरुषाप्रमाणें ५ प्रवृत्त होतो; ( आणि ) ६ संकल्पविकल्पवर्जित होऊन ( ज्यानें आत्मतत्त्वाचा निश्चय केला आहे असा ) हा ७ सिद्ध ( घटाची रचना करण्याच्या ) ८ चाकाच्या ९ मूळा १० प्रमाणें-मध्यबिंदूप्रमाणें-( होणाऱ्या गोष्टीविषयीं उदासीन असणाऱ्या निरपेक्ष निष्क्रिय तिऱ्हाइत ) ११ साक्षीसारखा १२ आपण १३ ह्या ( देहांत ) १४ मुकाट्यानें-मनानेंहि दृश्याचा संकल्प न करितां-( लोकदृष्टीनें सापेक्ष व सक्रिय असा ) १५ राहतो. ५५३

ब्रह्मवेत्त्याच्या शारीरिक क्रिया अभिमानरहित प्रारब्धानुसार घडतात हें दृष्टांतानें सांगितलें. ॥ ५५३ ॥

**नैवेन्द्रियाणि विषयेषु नियुङ्क्त एष नैवापयुङ्क्त उपदर्शनलक्षणस्थः । नैव क्रियाफलमपीषदवेक्षते स * सानन्दसान्द्ररसपानसुमत्तचित्तः ॥ ५५४ ॥**

न[६] । एव[७] । इन्द्रियाणि[४] । विषयेषु[३] । नियुङ्क्ते[५] । एषः[२] । न[९] । एव[१०] । अपयुङ्क्ते[८] । उपदर्शनलक्षणस्थः[१] ॥ न[१७] । एव[१८] । क्रियाफलं[१३] । अपि[१५] । ईषत्[१४] । अवेक्षते[१६] । सः[१२] । सानन्दसान्द्ररसपानसुमत्तचित्तः[११] ५५४

**अर्थः**–( इंद्रियांच्या प्रवृत्तींत किंवा निवृत्तींत ) १ साक्षिस्वरूपानें-निर्विकारत्वानें-राहणारा २ हा ( ब्रह्मवेत्ता ) ३ भोग्य पदार्थांच्या ठायीं ( बाह्याभ्यंतर ) ४ इंद्रियें ५ प्रवृत्त करीत ६ नाहीं ७ च. ( किंवा त्यांपासून त्यांस ) ८ निवृत्त करीत ९ नाहीं १० च. ( ज्यांत इंद्रादिकांच्या अल्पानंदांचा अंतर्भाव आहे अशा ) ११ सानंद व सघन ब्रह्मानंदाच्या ( अनुभवरूप ) पानानें उन्मत्ताप्रमाणें ( स्वभानरहित ज्याचें ) चित्त ( झालें आहे असा ) १२ तो ( नेत्रादि इंद्रियांच्या प्रवृत्तिनिवृत्तींच्या सुखदुःखरूप ) १३ फलाकडे १४ लेशमात्र १५ हि १६ पहात १७ नाहीं १८ च. ॥ ५५४ ॥

---

* " सानन्द......," ह्याबद्दल " स्वानन्द......" असाहि पाठ आहे. "स्वानंद " ह्मणजे " आत्मानंद ".

पूर्वश्लोकांत साक्षीसारखा राहतो असें ह्मटलें आहे त्याचें विवरण केलें आहे. ।५५४।

लक्ष्यालक्ष्यगतिं त्यक्त्वा यस्तिष्ठेत्केवलात्मना ।
शिव एव स्वयं साक्षादयं ब्रह्मविदुत्तमः ॥ ५५५ ॥

लक्ष्यालक्ष्यगतिं । त्यक्त्वा । यः । तिष्ठेत् । केवलात्मना ॥
शिवः । एव । स्वयं । साक्षात् । अयं । ब्रह्मविदुत्तमः ॥५५५॥

**अर्थः**–( ध्यानधारणादिकांना हें ) १ लक्ष्य ( आहे किंवा लक्ष्याच्या ध्यानधारणादिकांस विघ्न करणारें हें ) अलक्ष्य ( आहे; किंवा हें शुद्ध ब्रह्म लक्ष्य आहे, व हें सगुण वाच्य ब्रह्म अलक्ष्य आहे, अशा प्रकारच्या ) चित्तवृत्तीला २ टाकून ३ अद्वैतात्मस्वरूपानें ४ जो ( निःसंकल्प होऊन ) ५ राहतो, ६ तो ७ साक्षात् ८ स्वतः ( अद्वैतब्रह्मस्वरूप ) ९ सदाशिव १० च ( आहे, व तोच ) ब्रह्मवेत्त्यांत श्रेष्ठ आहे. ॥ ५५५ ॥

श्रेष्ठ ब्रह्मवेत्ता कोणाला ह्मणावें हें सांगितलें. ॥ ५५५ ॥

जीवन्नेव सदा मुक्तः कृतार्थो ब्रह्मवित्तमः ।
उपाधिनाशाद् ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति निर्द्वयम् ५५६

जीवन् । एव । सदा । मुक्तः । कृतार्थः । ब्रह्मवित्तमः ॥ उपाधि-
नाशात् । ब्रह्म । एव । सन् । ब्रह्म । अपि । एति । निर्द्वयम् ॥५५६॥

**अर्थः**–१ उत्तम ब्रह्मवेत्ता ( लोक दृष्टीनें ) २ जिवंत असतां ३ च ४ सर्वकाळ ५ मुक्त ( आणि ) ६ कृतार्थ ( आहे. तो ) ७ ब्रह्म ८ च ९ असून ( लोकदृष्टीनें भासणाऱ्या पंचकोशादि ) १० उपाधीचा नाश झाला असतां ११ अद्वैत १२ ब्रह्माप्रत १३ च १४ प्राप्त होतो-ब्रह्माहून कधीं भिन्नच नसतो. ॥ ५५६ ॥

उत्तम ब्रह्मवेत्त्याचेंच वर्णन केलें. ॥ ५५६ ॥

शैलूषो वेषसद्भावाभावयोश्च यथा पुमान् ।
तथैव ब्रह्मविच्छ्रेष्ठः सदा ब्रह्मैव नापरः ॥ ५५७ ॥

शैलूषः । वेषसद्भावाभावयोः । च । यथा । पुमान् ॥ तथा । एव । ब्रह्मविच्छ्रेष्ठः ( ब्रह्मवित् श्रेष्ठः ) । सदा । ब्रह्म । एव । न । अपरः ॥ ५५७ ॥

**अर्थः**–१ ज्याप्रमाणें ( स्त्री, पशु इत्यादि इतरांचें अनुकरण करितांना अगर न करितांना निरनिराळ्या ) २ वेषांचें ग्रहण असो किंवा त्यांचा त्याग असो, ३ नट ४ पुरुष ५ च ( असतो, व वेषाच्या ग्रहणानें किंवा त्यागानें बदलत नाहीं ), ६ त्याप्रमाणें ७ च ८ श्रेष्ठ ब्रह्मवेत्ता ( देव, मनुष्य, पशु इत्यादि २ वेष धारण करो अगर न करो, तो ) ९ सर्व-काळ १० ब्रह्म ११ च ( आहे ), १२ इतर-जीव-१३ नाहीं. ॥५५७॥

ब्रह्मवेत्ता सर्वावस्थांत ब्रह्मच आहे हें दृष्टांतपूर्वक सांगितलें ॥ ५५७ ॥

**यत्र क्वापि विशीर्णं सत्पर्णमिव तरोर्वपुः पततात् । ब्रह्मीभूतस्य यतेः प्रागेव तच्चिदग्निना दग्धम् ५५८**

यत्र । क्व । अपि । विशीर्णं । सत् । पर्णं । इव । तरोः । वपुः । पततात् । ब्रह्मीभूतस्य । यतेः । प्राक् । एव । तत् । चिदग्निना । दग्धम् ॥ ५५८ ॥

**अर्थः**–१ ब्रह्माला आत्मरूपानें जाणणाऱ्या २ ब्रह्मज्ञान्याचें ३ शरीर, ४ गळून पडलेल्या ५ अशा ६ झाडाच्या ७ पाना ८ प्रमाणें, ९ जेथें १० कोठें ११ हि ( पडेल तेथें ) १२ पडो. ( झाडाला पान अमुक ठिकाणीं पडावें वगैरेची जशी गरज नसते, तद्वत् त्याला देहत्यागाच्या वेळीं देशकालादिकांची अपेक्षा नसते ). १३ तें ( त्याचें शरीर ) १४ ज्ञानाग्नीनें ( पडण्या ) १५ पूर्वीं १६ च १७ जाळून टाकिलेलें असतें, ( ह्मणून प्रेतसंस्कारांची हि त्याला आवश्यकता नसते ). ॥ ५५८ ॥

ब्रह्मवेत्त्याचा देह कोठें हि पडो. त्याला देशकालादिकांची अपेक्षा नसते हें दृष्टांत पूर्वक सांगितलें. ॥ ५५८ ॥

**सदात्मनि ब्रह्मणि तिष्ठतो मुनेः पूर्णाद्वयानन्दम-**

यात्मना सदा । न देशकालाद्युचितप्रतीक्षा
त्वङ्मांसविट्पिण्डविसर्जनाय ॥ ५५९ ॥

सदात्मनि । ब्रह्मणि । तिष्ठतः । मुनेः । पूर्णाद्वयानन्दमयात्मना । सदा ॥ न । देशकालाद्युचितप्रतीक्षा । त्वङ्मांसविट्पिण्डविसर्जनाय ॥ ५५९. ॥

**अर्थः**–१ सद्रूप २ ब्रह्माच्या ठायीं ३ अपरिच्छिन्न व अद्वैत सुखरूप तेनें ४ सर्वदा ५ स्थित असणाऱ्या ६ ब्रह्मवेत्त्याला ७ त्वचा, मांस, विष्ठा यांच्या पिंडाला-अपवित्र देहाला-टाकण्याला ८ देशकालादिकांची अपेक्षा उचित ९ नाहीं. ( मलत्यागाला जशी उत्तम देशादिकांची कोणीं अपेक्षा करीत नाहीं, तशी मलाप्रमाणें मानलेल्या देहास टाकण्यासहि ज्ञान्याला क्षेत्रादिकांची अपेक्षा नसते ). ॥ ५५९ ॥

ब्रह्मवेत्त्याला देहत्यागसमयीं कालादिकांची अपेक्षा नसते हें सकारण सांगितलें ५५९

देहस्य मोक्षो नो मोक्षो न दण्डस्य कमण्डलोः ।
अविद्याहृदयग्रन्थिमोक्षो मोक्षो यतस्ततः ॥५६०॥

देहस्य । मोक्षः । नो । मोक्षः । न । दण्डस्य । कमण्डलोः । अविद्याहृदयग्रन्थिमोक्षः । मोक्षः । यतः । ततः ॥ ५६० ॥

**अर्थः**–( काश्यादि उत्तम क्षेत्रांत ) १ देहाचा २ त्याग करणें ( कैवल्यरूप ) ३ मोक्ष ४ नाहीं; ( अथवा उत्तराखंडांत ) ५ दंडाचा ( व ) ६ कमंडलूचा ( त्याग करणें हि मोक्ष साधन ) ७ नव्हे; ( तर ८ अज्ञानानें ( प्राप्त झालेल्या ) हृदयांतील ( चिज्जडतादात्म्यरूप ) ग्रंथीची निवृत्तिच ९ मोक्ष ( होय ). १० ज्या अर्थी ( हें असें आहे ) ११ त्या अर्थी ( ब्रह्मवेत्त्याला देहत्यागसमयीं देशकालादिकांची अपेक्षा नाहीं ). ५६०

चिज्जडग्रंथीचा भेद होणें ह्याचेंच नांव खरा मोक्ष असल्यामुळें देशकालादिकांची मोक्षाला आवश्यकता नाहीं. ॥ ५६० ॥

**कुल्यायामथ नद्यां वा शिवक्षेत्रेऽपि चत्वरे ।**
**पर्णं पतति चेत्तेन तरोः किं नु शुभाशुभम् ॥५६१॥**

कुल्यायां । अथ । नद्यां । वा । शिवक्षेत्रे । अपि । चत्वरे ॥
पर्णं । पतति । चेत् । तेन । तरोः । किं । नु । शुभाशुभम् ॥ ५६१ ॥

**अर्थः**–( वृक्षावरून गळून पडलेलें ) १ पान २ कालव्यांत ३ किंवा ( भागीरथ्यादि ) ४ नदींत ५ आणि ६ काशींत ( किंवा ) ७ चव्हाट्यावर ८ हि ९ जर १० पडेल, ( तर ) ११ त्या ( शुभाशुभस्थानीं पडण्यानें त्या ) १२ वृक्षाचें १३ काय १४ बरें शुभ १५ किंवा अशुभ ( होईल )? ॥ ५६१ ॥

५५८ व्या गीतींतील वृक्षपर्णाच्या दृष्टांताचेंच विवरण केलें आहे. ॥ ५६१ ॥

**पत्रस्य पुष्पस्य फलस्य नाशवद्देहेन्द्रियप्राणधियां**
**विनाशः । नैवात्मनः स्वस्य सदात्मकस्या-**
**नन्दाकृतेर्वृक्षवदस्ति चैषः ॥ ५६२ ॥**

पत्रस्य । पुष्पस्य । फलस्य । नाशवत् । देहेन्द्रियप्राणधियां ।
विनाशः ॥ न । एव । आत्मनः । स्वस्य । सदात्मकस्य । आन-
न्दाकृतेः । वृक्षवत् । अस्ति । च । एषः ॥ ५६२ ॥

**अर्थः**–१ पानाच्या, २ फुलाच्या ( व ) ३ फळाच्या ४ नाशाप्रमाणें ५ देह, इंद्रियें, प्राण ( आणि ) बुद्धि ( ह्या उपाधींचाच ) ६ नाश ( होतो ). ७ आणि ८ हा ( असा नाश ) ९ ज्याप्रमाणें वृक्षाचा ( होत नाहीं तद्वत् ) १० स्वरूपभूत, ११ सद्रूप ( आणि ) १२ आनंदस्वरूप ( असा जो ) १३ आत्मा त्याचा १४ होत १५ च १६ नाहीं. ॥ ५६२ ॥

पूर्वश्लोकांतील दृष्टांतसिद्ध अर्थ दार्ष्टांतांत योजून दाखविला आहे. ॥ ५६२ ॥

**प्रज्ञानघन इत्यात्मलक्षणं सत्यसूचकम् ।**
**अनूद्यौपाधिकस्यैव कथयन्ति विनाशनम् ॥५६३॥**

प्रज्ञानघनः । इति । आत्मलक्षणं । सत्यसूचकम् ॥ अनूद्य । औपाधिकस्य । एव । कथयन्ति । विनाशनम् ॥ ५६३ ॥

अर्थः-( आत्मा ) १ प्रज्ञानघन-केवल ज्ञप्तिमात्र-( आहे ) २ असें ( आत्म्याच्या ) ३ अविनाशित्वाचें सूचक ४ आत्म्याचें स्वरूप ५ सांगून ( श्रुति ) ६ उपाधिविशिष्ट रूपाचा ७ च ८ नाश ९ कथन करीत आहेत. ॥ ५६३ ॥

श्रुतींनीं उपाधिनाशाचा अनुवाद केला आहे, आत्मनाश सांगितला नाहीं. ।५६३

**अविनाशी वा अरेऽयमात्मेति श्रुतिरात्मनः ।**
**ब्रवीत्यविनाशित्वं विनश्यत्सु विकारिषु ॥ ५६४ ॥**

अविनाशी । वा । अरे । अयं । आत्मा । इति । श्रुतिः । आत्मनः ॥ ब्रवीति । अविनाशित्वं । विनश्यत्सु । विकारिषु ५६४

अर्थः-" १ हे ( मैत्रेयी ) २ हा ३ आत्मा ४ अविनाशी ५ च ( आहे ) ६ अशा ( अर्थाची ) ७ श्रुति ( देहादि ) ८ विकारी पदार्थ ९ नाश पावत असतां हि १० आत्म्याचें अविनाशित्व ११ च १२ सांगत आहे. ॥ ५६४ ॥

" अविनाशी वा अरेऽयमात्मा " ह्याश्रुतींत याज्ञवल्क्य मैत्रेयीला उपाधीचा नाश होतो व आत्मा अविनाशी आहे असें च सांगतात. ॥ ५६४ ॥

**पाषाणवृक्षतृणधान्यकडङ्गराद्या* दग्धा भवन्ति**
**हि मृदेव यथा तथैव । देहेन्द्रियासुमन आदि सम-**
**स्तदृश्यं ज्ञानाग्निदग्धमुपयाति परात्मभावम् ५६५**

पाषाणवृक्षतृणधान्यकडङ्गाराद्याः । दग्धाः । भवन्ति । हि । मृद् । एव । यथा । तथा । एव ॥ देहेन्द्रियासुमन आदि । समस्तदृश्यं । ज्ञानाग्निदग्धं । उपयाति । परात्मभावम् । ५६५ ।

* " कडङ्कर " असा शब्दहि आहे व पाठहि आहे.

**अर्थः**—१ ज्याप्रमाणें, २ दगड, ३ झाडें, गवत, धान्य, पेंढा इत्यादि ( पदार्थ ) ३ जळाले असतां ( भस्मरूपानें ) ४ माती ५ च ६ केवळ ७ होतात; ८ त्याप्रमाणें ९ च १० देह, इंद्रियें, प्राण मन इत्यादि ११ सर्व दृश्य १२ ज्ञानरूप अग्नीनें जळालें असतां १३ परमात्मस्वरूपाप्रत १४ प्राप्त होतें-त्याहून वेगळें राहत नाहीं. ॥ ५६५ ॥

यथार्थज्ञानानें पाहिलें ह्मणजे देहेंद्रियादि स्वरूपाहून भिन्न नाहींत, हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. ॥ ५६५ ॥

**विलक्षणं यथा ध्वान्तं लीयते भानुतेजसि ।**
**तथैव सकलं दृश्यं ब्रह्मणि प्रविलीयते ॥ ५६६ ॥**

विलक्षणं । यथा । ध्वान्तं । लीयते । भानुतेजसि ॥ तथा । एव । सकलं । दृश्यं । ब्रह्मणि । प्रविलीयते ॥ ५६६ ॥

**अर्थः**—१ जसा २ अंधकार ( सूर्यापासून अगदीं )३ विजातीय असतांहि ( सूर्योदय होतांच ) ४ सूर्याच्या प्रकाशांत ५ लय पावतो-त्याहून वेगळा दिसत नाहीं-६ तसा ७ च ८ सर्व ( कल्पित विकारी ) ९ जडप्रपंच १० ब्रह्माच्या ठायीं ११ लय पावतो-प्रकाशाचें अभान ह्मणजेच अंधकार, तो जसा प्रकाशाचें भान होतांच नाहीं असाच अनुभवास येतो. तद्वत् ब्रह्माचें अभान ह्मणजेच जग, तें ब्रह्मभावाबरोबर अत्यंताभावरूप होतें- ॥ ५६६ ॥

जग ब्रह्माच्या ठायीं लीन होतें ह्मणजे ब्रह्मांत जग झालेंच नाहीं, हें दृष्टांतानें सांगितलें आहे. ॥ ५६६ ॥

**घटे नष्टे यथा व्योम व्योमैव भवति स्फुटम् ।**
**तथैवोपाधिविलये ब्रह्मैव ब्रह्मवित्स्वयम् ॥ ५६७ ॥**

घटे । नष्टे । यथा । व्योम । व्योम । एव । भवति । स्फुटम् । तथा । एव । उपाधिविलये । ब्रह्म । एव । ब्रह्मविद् । स्वयम् ५६७

**अर्थः**–१ ज्याप्रमाणें २ घट ३ फुटला असतां ( त्यांत असणारें ) ४ आकाश-घटाकाश-( परिच्छिन्नसल्यामुळें ) ५ आकाश-महाकाश-६ च ७ निःसंशय ८ असतें निरवयव असल्यामुळें घटाबरोबर नाश पावत नाहीं-९ त्याप्रमाणें १० च ११ उपाधीचा नाश झाला असतां १२ ब्रह्मवेत्ता १३ आपण १४ ब्रह्म १५ च ( असतो ). ॥ ५६७ ॥

उपाधीचा नाश झाला असतां ब्रह्मवेत्ता स्वरूपभूतच आहे हें दृष्टांतपूर्वक सांगितलें.५६७

**क्षीरं क्षीरे यथा क्षिप्तं तैलं तैले जलं जले ।**
**संयुक्तमेकतां याति तथात्मन्यात्मविन्मुनिः ।५६८।**

क्षीरं । क्षीरे । यथा । क्षिप्तं । तैलं । तैले । जलं । जले ॥ संयुक्तं । एकतां । याति । तथा । आत्मनि । आत्मविद् । मुनिः ॥ ५६८ ॥

**अर्थः**–१ जसें ( दुधांतून काढून घेतलेलें ) २ दूध ( पुनः ) ३ दुधांत ४ तेल तेलांत ( किंवा ) ६ पाणी ७ पाण्यांत ८ घातलें असतां ( तें त्या आपल्या मूळ अंशीबरोबर ) ९ संयोग पावून १० एकत्वाला ११ प्राप्त होतें-अभेदरूप होतें;- १२ तसा १३ ब्रह्मवेत्ता १४ मुनि १५ ब्रह्माच्या ठायीं ( कल्पित भेद करणाऱ्या उपाधीच्या त्यागानें ऐक्यता पावतो ).५६८

उपाधीमुळें भासलेला अंशांशिभाव उपाधित्यागानें नष्ट होऊन मूळचेंच ऐक्य प्रत्ययाला येतें हें सदृष्टांत सांगितलें. ॥ ५६८ ॥

**एवं विदेहकैवल्यं सन्मात्रत्वमखण्डितम् ।**
**ब्रह्मभावं प्रपद्यैष यतिर्नावर्तते पुनः ॥ ५६९ ॥**

एवं । विदेहकैवल्यं । सन्मात्रत्वं । अखण्डितम् ॥ ब्रह्मभावं । प्रपद्य । एषः । यतिः । न । आवर्तते । पुनः ॥ ५६९ ॥

**अर्थः**–१ केवळ सद्रूपता ( व ) २ अविनाशी ३ ब्रह्मरूपता ( हा जो ) ४ विदेहमोक्ष-देहादि उपाधित्यागानें ब्रह्मैकभाव-त्याप्रत ५ पूर्वोक्त रीतीनें ६ हा ७ ब्रह्मवेत्ता ८ प्राप्त होऊन ९ पुनः १० परत येत ११ नाहीं-पुनः लिंग देहप्रवेश करीत नाहीं. ॥ ५६९ ॥

स्वर्गादिसुखें भोगणारांना जसा पुनर्जन्म आहे, तसा विदेहमुक्त ब्रह्मवेत्त्याला नाहीं.५६९

**सदात्मैकत्वविज्ञानदग्धाविद्यादिवर्ष्मणः ।**
**अमुष्य ब्रह्मभूतत्वाद् ब्रह्मणः कुत उद्भवः ॥५७०॥**

सदात्मैकत्वविज्ञानदग्धाविद्यादिवर्ष्मणः ॥ अमुष्य । ब्रह्मभूतत्वात् । ब्रह्मणः । कुतः । उद्भवः ॥ ५७० ॥

**अर्थः**–१ ब्रह्मात्मैक्यसाक्षात्कारानें ज्याचीं अविद्यादि-अज्ञानादि-कारणादि-तीन शरीरें भस्म झालीं आहेत ( अशा ) २ ह्या ३ ब्रह्मवेत्त्याला ४ ब्रह्मरूप झाल्यामुळें ५ कोठून ( स्वर्गादिसुखभोगणारांप्रमाणें ) ६ पुनर्जन्म ( होणार )? ॥ ५७० ॥

ज्याचे तिन्ही देह ज्ञानाग्नीनें दग्ध झाले आहेत अशा ब्रह्मस्वरूप ब्रह्मवेत्त्याला पुनरावृत्ति नाहीं. ॥ ५७० ॥

**मायाक्लृप्तौ बन्धमोक्षौ न स्तः स्वात्मनि वस्तुतः ।**
**यथा रज्जौ निष्क्रियायां सर्पाभासविनिर्गमौ ।५७१।**

मायाक्लृप्तौ । बन्धमोक्षौ । न । स्तः । स्वात्मनि । वस्तुतः ॥ यथा । रज्जौ । निष्क्रियायां । सर्पाभासविनिर्गमौ ॥ ५७१ ॥

**अर्थः**–१ निश्चल २ दोरीवर ३ जसा ४ प्रातिभासिक सर्प व त्याचा नाश ( हे कल्पित आहेत सत्य नाहींत, तद्वत् परमार्थभूत ) ५ आत्मस्वरूपीं ६ बंध आणि मोक्ष ( हे ) ७ अविद्येनें कल्पिलेले आहेत, ८ वास्तविक ९ असलेले १० नाहींत. ॥ ५७१ ॥

स्वस्वरूपाच्या ठायीं बंध आणि मोक्ष हे केवळ कल्पित आहेत, हें दृष्टांतपूर्वक सांगितलें. ॥ ५७१ ॥

**आवृतेः सदसत्त्वाभ्यां वक्तव्ये बन्धमोक्षणे ।**
**नावृतिर्ब्रह्मणः काचिदन्याभावादनावृतम् ॥५७२॥**
**यद्यस्त्यद्वैतहानिः स्याद् द्वैतं नो सहते श्रुतिः ॥**

आवृतेः । सदसत्त्वाभ्यां । वक्तव्ये । बन्धमोक्षणे ॥ न । आवृतिः । ब्रह्मणः । काचित् । अन्याभावात् । अनावृतम् ॥ ५७२ ॥ यदि । अस्ति । अद्वैतहानिः । स्यात् । द्वैतं । नो । सहते । श्रुतिः ॥

**अर्थः**–( शुद्ध ब्रह्माचें ) १ आवरण २ असल्यानें व नसल्यानें ३ बंध आणि मोक्ष ( आहेत असें ) ४ ह्मणावें. ( आवरण करणाऱ्या ब्रह्माहून ) ५ दुसऱ्या वस्तूचा अभाव असल्यामुळें ( स्वतः शुद्ध, स्वयंज्योति व अद्वितीय अशा ) ६ ब्रह्माचें ७ कोणतें हि ८ आवरण ९ नाहीं, ( ह्मणून तें ) १० आवरणरहित आहे. ( आणि जर आवरणरूप बंधच नाहीं, तर मग मोक्ष तरी कशाचा? ११ जर ( ब्रह्माहून भिन्न दुसरें कांहीं ) १२ आहे ( असें ह्मणावें, तर ) १३ अद्वैतरूप ( ब्रह्म आहे ह्या सिद्धांताची ) हानि १४ होईल. ( आणि ) १५ श्रुति तर ( सजातीय, विजातीय, स्वगत असें कोणतें हि ) १६ द्वैत १७ सहन करीत १८ नाहीं. ॥ ५७२ ॥

बन्धमोक्षांच्या स्वरूपनिरूपणावरूनच ते कल्पित व मिथ्या ठरतात. ॥ ५७३ ॥

**बन्धं च मोक्षं च मृषैव मूढा बुद्धेर्गुणं वस्तुनि कल्पयन्ति । दृगावृतिं मेघकृतां यथा रवौ यतोऽद्वयासङ्गचिदेतदक्षरम् ॥ ५७३ ॥**

बन्धं । च । मोक्षं । च । मृषा । एव । मूढाः । बुद्धेः । गुणं । वस्तुनि । कल्पयन्ति ॥ दृगावृतिं । मेघकृतां । यथा । रवौ । यतः । अद्वयासङ्गचित् । एतत् । अक्षरम् ॥ ५७३ ॥

**अर्थः**–१ ज्याप्रमाणें २ अविवेकी पुरुष ३ मेघांनीं केलेल्या ४ नेत्रांच्या आवरणाला ( स्वयंप्रकाश ) ५ सूर्याच्या ठिकाणीं ( १४ कल्पित करितात )-मेघांनीं सूर्यास आच्छादिलें असें ह्मणतात-( तद्वत् ते मायाकार्यरूप ) ६ बुद्धीच्या ७ बंध ८ आणि ९ मोक्ष ( ह्या ) १० गुणांला ( मायेहून विलक्षण अशा ) ११ आत्मस्वरूपीं १२ मिथ्या १३ च-आपल्या कल्पनेनेंच–१४ मानितात. १५ कारण १६ हें १७ अविनाशी ब्रह्म अद्वैत, असंग आणि चेतनरूप आहे. ॥ ५७३ ॥

बंधमोक्ष कल्पित आहेत हें दृष्टांतानें सांगितलें. ॥ ५७३ ॥

**अस्तीति प्रत्ययो यश्च यश्च नास्तीति वस्तुनि ।**
**बुद्धेरेव गुणावेतौ न तु नित्यस्य वस्तुनः ॥५७४॥**

अस्ति । इति । प्रत्ययः । यः । च । यः । च * । न । अस्ति । इति । वस्तुनि ॥ बुद्धेः । एव । गुणौ । एतौ । न । तु । नित्यस्य । वस्तुनः ॥ ५७४ ॥

अर्थः–१ आत्मस्वरूपांत ( बंध ) २ आहे ३ असा ४ जो ५ प्रत्यय, ६ आणि ( बंध ) ७ राहिला ८ नाहीं-निवृत्त झाला ९ असा १० जो ( प्रत्यय ) ११ हे दोन्ही १२ बुद्धीचे १३ च १४ परिणाम ( आहेत ), १५ आणि १६ परिणामाला न पावणाऱ्या १७ ब्रह्माचे १८ नव्हत. ५७४

बंधमोक्षांचा प्रत्यय बुद्धिगत आहे. स्वरूपीं बंधमोक्षांची कल्पनाच संभवत नाहीं. ॥ ५७४ ॥

**अतस्तौ मायया क्लृप्तौ बन्धमोक्षौ न चात्मनि ।**
**निष्कले निष्क्रिये शान्ते निरवद्ये निरञ्जने ।५७५।**
**अद्वितीये परे तत्त्वे व्योमवत्कल्पना कुतः ॥**

अतः । तौ । मायया । क्लृप्तौ । बन्धमोक्षौ । न । च । आत्मनि ॥ निष्कले । निष्क्रिये । शान्ते । निरवद्ये । निरञ्जने ॥ ५७५ ॥ अद्वितीये । परे । तत्त्वे । व्योमवत् । कल्पना । कुतः ।

अर्थः–१ यास्तव २ ते ३ बंध आणि मोक्ष ४ मायेकडून ५ प्रसिद्ध ( आहेत ) ६ आणि ७ आत्मस्वरूपीं ८ नाहींत. ९ निरवयव, १० निष्क्रिय, ११ रागद्वेषशून्य, १२ निर्दोष, १३ अविद्यावरणरहित, १४ अद्वैत ( आणि ) १५ आकाशाप्रमाणें ( असंग असणाऱ्या ) १६ उत्कृष्ट १७ आत्मस्वरूपांत ( बंधमोक्षांची ) १८ कल्पना १९ कोठून ( असणार )? ॥ ५७५ ॥

---

* पानावरील टीप पहा.

आकाशाप्रमाणें असंग असलेल्या ब्रह्मांत बंधमोक्षांची कल्पना संभवत नाहीं. ५७५

**न निरोधो न चोत्पत्तिर्न बन्धो न च साधकः ।**
**न मुमुक्षुर्न वै मुक्त इत्येषा परमार्थता ॥ ५७६ ॥**

न । निरोधः । न । च । उत्पत्तिः । न । बन्धः । न । च । साधकः ॥ न । मुमुक्षुः । न । वै । मुक्तः । इति । एषा । परमार्थता ॥ ५७६ ॥

**अर्थः**–( बीजच नसल्यामुळें कोणत्याहि पदार्थांची ) १ उत्पत्ति २ नाहीं, ३ आणि ( ह्मणूनच कशाचा ) ४ नाश ५ नाहीं. ( आत्मा स्वयंप्रकाश असल्यामुळें अविद्यारूप ) ६ बंध ७ नाहीं, ८ आणि ( बंधाच्या अभावीं बंधनिवृत्त्यर्थ ) ९ यत्न करणारा जिज्ञासुहि १० नाहीं. ( बंधनिवृत्तिरूप मोक्ष नाहीं ह्मणून ) ११ मुमुक्षु १२ नाहीं ( आणि ह्मणूनच ) १३ मुक्त हि १४ नाहीं १५ च. १६ याप्रमाणें १७ हा १८ गुह्यार्थ ( आहे. अंधकारांत पिशाचकल्पना करून लहान मुलगें भ्यालें असतां त्याचें भय घालविण्याकरितां दिवा पाहिजे, तद्वत् आपल्याच अज्ञानानें कल्पिलेल्या बंधनास भिऊन शरण आलेल्या जिज्ञासूच्या बोधार्थ श्रुतिशास्त्राची सार्थकता आहे ). ॥ ५७६ ॥

उत्पत्ति, लय, बद्ध, मुमुक्षु इत्यादि स्वरूपांत नाहीं. ॥ ५७६ ॥

**सकलनिगमचूडास्वान्तसिद्धान्तरूपं**
**परमिदमतिगुह्यं दर्शितं ते मयाद्य ।**
**अपगतकलिदोषं कामनिर्मुक्तबुद्धिं**
**स्वसुतवदसकृत्त्वां भावयित्वा मुमुक्षुम् ॥ ५७७ ॥**

सकलनिगमचूडास्वान्तसिद्धान्तरूपं । परं । इदं । अतिगुह्यं । दर्शितं । ते । मया । अद्य ॥ अपगतकलिदोषं । कामनिर्मुक्तबुद्धिं । स्वसुतवत् । असकृत् । त्वां । भावयित्वा । मुमुक्षुम् ५७७

अर्थः–( हे शिष्य, दंभलोभादि ) १ कलियुगाचे दोष ज्याचे गेले आहेत अशा, २ निष्काम चित्ताच्या ( आणि ) ३ मोक्षाची इच्छा करणाऱ्या ४ तुला ५ आपल्या पुत्राप्रमाणें ६ मानून ७ मी ८ सर्व वेदांतांतील सारभूत सिद्धांतरूप, ९ उत्कृष्ट ( आणि अल्पबुद्धीच्या माणसांना यत्न करून हि न मिळणारें असें ) १० अतिगुप्त ११ हें ( विवेकचूडामणि नांवाचें आत्मानात्मविवेक प्रकरण ) १२ तुला १३ आज १४ वारंवार १५ उपदेश करून सांगितलें आहे. ( म्हणून हें तुझ्या आदरास पात्र आहे ). ॥ ५७७ ॥

उक्त प्रकरणाची योग्यता सांगून श्रीगुरुमहाराज उपसंहार करितात. ॥५७७ ॥

**इति श्रुत्वा गुरोर्वाक्यं प्रश्रयेण कृतानतिः ।**
**स तेन समनुज्ञातो ययौ निर्मुक्तबन्धनः ॥ ५७८॥**

इति । श्रुत्वा । गुरोः । वाक्यं । प्रश्रयेण । कृतानतिः ॥ सः । तेन । समनुज्ञातः । ययौ । निर्मुक्तबन्धनः ॥ ५७८ ॥

अर्थः–१ असा २ श्रीगुरूंनीं सांगितलेला ३ वाक्यसमूह ४ ऐकून ५ तो ( शिष्य ) ६ प्रेमानें ७ नमस्कार करून ८ त्या ( गुरूंची ) ९ आज्ञा घेऊन १० जीवन्मुक्त होत्साता ( स्वच्छंदानें प्रारब्धानुसार कोठें तरी ) ११ गेला. ॥ ५७८ ॥

उपदेशग्रहणाचें फळ सांगितलें. ॥ ५७८ ॥

**गुरुरेव सदानन्दसिन्धौ निर्मग्नमानसः ।**
**पावयन् वसुधां सर्वां विचचार * निरन्तरः ॥५७९॥**

गुरुः । एव । सदानन्दसिन्धौ । निर्मग्नमानसः ॥ पावयन् । वसुधां । सर्वां । विचचार । निरन्तरः ॥ ५७९ ॥

अर्थः–१ ब्रह्मानंदरूप समुद्रांत ज्यांचें २ मन बुडून गेलें आहे असे, ज्यांचें ३ भेदभान नष्ट झालें आहे असे, ( आणि ४ सर्व ५ पृथ्वीला

* " निरन्तरं " म्हणजे " सर्वकाळ " असाहि पाठ आहे. त्याचा अन्वय " निर्मग्नमानसः " या पदाशीं करावा.

६ पवित्र करीत ७ च-आपल्या दर्शनस्पर्शनानें पृथ्वीवरी लोकांचा अज्ञानांधकार घालवीत-८ गुरु हि ( स्वच्छंदानें ) ९ जाते झाले. ॥ ५७९ ॥

गुरु हि आपल्या इच्छेप्रमाणें गमन करिते झाले ॥ ५७९ ॥

**इत्याचार्यस्य शिष्यस्य संवादेनात्मलक्षणम् ।**
**निरूपितं मुमुक्षूणां सुखबोधोपपत्तये ॥ ५८० ॥**

**इति । आचार्यस्य । शिष्यस्य । संवादेन । आत्मलक्षणम् । निरूपितं । मुमुक्षूणां । सुखबोधोपपत्तये ॥ ५८० ॥**

**अर्थः**–१ मुमुक्षूंना २ सहज ज्ञानप्राप्ति व्हावी म्हणून ३ गुरूंच्या ( आणि ) ४ शिष्याच्या ५ संवादरूपानें ६ आत्मस्वरूपाचें ७ निरूपण केलेलें ८ अशा रीतीनें ( समाप्त झालें ). ॥ ५८० ॥

गुरुशिष्यसंवादरूपानें आत्मनिरूपण केलें आहे तें समाप्त झालें. ॥ ५८० ॥

**हितमिममुपदेशमाद्रियन्तां विहितनिरस्तसमस्तचित्तदोषाः । भवसुखविरताः प्रशान्तचित्ताः श्रुतिरसिका यतयो मुमुक्षवो ये ॥ ५८१ ॥**

**हितं । इमं । उपदेशं । आद्रियन्तां । विहितनिरस्तसमस्तचित्तदोषाः ॥ भवसुखविरताः । प्रशान्तचित्ताः । श्रुतिरसिकाः । यतयः । मुमुक्षवः । ये ॥ ५८१ ॥**

**अर्थः**–( ज्यांनीं ) यज्ञशमादि बाह्याभ्यंतर ) १ शास्त्रोक्त साधनांच्या योगानें ( बोधाला प्रतिबंध करणारे मलविक्षेपादि ) चित्तांतील सर्व दोष घालविले आहेत, २ संसारसुखाचा ज्यांना वीट आला आहे, ( निस्तरंग महासागराप्रमाणें ज्यांचें ३ चित्त निश्चल आहे, ४ वेदांतश्रवणरूप अमृतपानाची गोडी ज्यांना लागली आहे, ( आणि जे ) ५ यत्नशील आहेत ( असे ) ६ जे ७ मुमुक्षु ( ते ) ८ ह्या ९ मोक्षप्राप्ति करून देणाऱ्या १० आत्मानात्मविवेकबोध प्रकरणाचा ११ मोठ्या प्रेमानें अंगीकार करोत. ॥ ५८१ ॥

ग्रंथसंग्रहणाला योग्य अधिकारी कोण तें सांगितलें आहे. ॥ ५८१ ॥

**संसाराध्वनि तापभानुकिरणप्रोद्भूतदाहव्यथाखिन्नानां**
**जलकाङ्क्षया मरुभुवि भ्रान्त्या परिभ्राम्यताम् ।**
**अत्यासन्नसुधाम्बुधिं सुखकरं ब्रह्माद्वयं दर्शयन्त्येषा**
**शङ्करभारती विजयते निर्वाणसंदायिनी ॥ ५८२ ॥**

संसाराध्वनि । तापभानुकिरणप्रोद्भूतदाहव्यथाखिन्नानां । जलकाङ्क्षया । मरुभुवि । भ्रान्त्या । परिभ्राम्यताम् ॥ अत्यासन्नसुधाम्बुधिं । सुखकरं । ब्रह्म । अद्वयं । दर्शयन्ती । एषा । शङ्करभारती । विजयते । निर्वाणसंदायिनी ॥ ५८२ ॥

अर्थः—१ संसाररूप मार्गांत २ त्रिविधतापरूप सूर्यकिरणांपासून होणाऱ्या दाहव्यथेनें खेदपावलेल्या ( आणि सुखरूप ) ३ जलाच्या इच्छेनें ( संसाररूप ) ४ निर्जल प्रदेशांत-नाना योनींत-( सुखरूप जलाच्या ) ५ भ्रांतीनें वारंवार ६ भ्रमण करणाऱ्या ( जनांना ) ७ अतिशय समीप असलेल्या-स्वतांहून भिन्न नसलेल्या-अमृताच्या समुद्रासारख्या ( व ) ८ सर्व तापांचें शमन करणाऱ्या ९ अद्वैत १० ब्रह्माचा ११ बोध करणारी ( आणि मोक्षरूप ) १२ कल्याण करणारी १३ ही-विवेकचूडामणिरूप-१४ शंकराचार्यांची वाणी १५ सर्वोत्कर्ष पावत आहे. ॥ ५८२ ॥

संसारदुःखानें कष्ट पावलेल्या मुमुक्षूंच्या हितासाठींच ह्या ग्रंथाचें प्रयोजन आहे हें सांगितलें. ॥ ५८२ ॥

**इति श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यश्रीमच्छंकरभगवतः कृतौ विवेकचूडामणिः समाप्तः ॥**



# शुद्धिपत्र.

| अशुद्ध. | शुद्ध. | पृष्ठ. | ओळ |
|---|---|---|---|
| लाहे. | आहे. | २ | २० |
| वृत्ते; | वृत्तेः | १२ | १९ |
| भुमुक्षुत्वाची | मुमुक्षुत्वाची | १५ | शेवटली |
| तत्त्वयथार्थता– | तत्त्वयथार्थता | १७ | ३ |
| वाद्यांनीं | वाद्यांनीं– | ,, | ९ |
| निखाऱ्याप्रमाणें | निखाऱ्याप्रमाणें– | ,, | खालून |
| थार | थोर | २३ | २ |
| परं | पारं | ,, | खालून |
| अस्युपायो | अस्त्युपायो | २४ | १२ |
| शब्दाचा | शब्दाच्या | ३२ | ११ |
| निक्षेपः | निक्षेपः । | ३३ | १६ |
| सतत्व- | सतत्त्व- | ३६ | २ |
| ( इतक | ( इतकें | ,, | ११ |
| रागरूप प्रीतिरूप | रागरूप–प्रीतिरूप– | ३९ | ७ |
| मीन | मीन– | ,, | १९ |
| संसार | संसार– | ४१ | ९ |
| येतो न | येतो–न | ४२ | १२ |
| येतो | येतो– | ,, | १३ |
| विचारानें | –विचारानें - | ,, | १५ |
| टाळून | टाकून | ४३ | ५ |
| जो " | जो | ,, | खालून ७ |
| तादात्म्य ध्यासानें | तादात्म्याध्यासानें | ४४ | ९ |
| निवर्ताधिष्ठान | विवर्ताधिष्ठान | ४६ | ६ |
| देहाभिमानाची | देहाभिमानी | ,, | खालून ७ |
| स्वप्न | स्वप्नः | ,, | |

| | | | |
|---|---|---|---|
| कला—चें | कला—जें | ४८ | खालून ३ |
| पञ्चाभ्र | पञ्चाभ्र— | ५० | ३ |
| फुलावर | फूलवर | ५१ | ६ |
| कतृत्वादि | कर्तृत्वादि | ,, | ८ |
| क्षुत शिंक | क्षुत्—शिंक्—, | ५४ | ६ |
| आणि तहान | तहान | ,, | ८ |
| इंद्रियें व | व इंद्रियें | ५६ | १४ |
| अव्यक्तनाम्नि | अव्यक्तनाम्नी | ,, | खालून ५ |
| सङ्ग्गा | साङ्गा | ५७ | १४ |
| रज्यु- | रंज्जु— | ५८ | ९ |
| ब्रह्म | ब्रह्म | ,, | १२ |
| भासत्ते | भासते | ६० | २ |
| —नाहीं | नाहीं— | ६२ | १० |
| भगवद्गीतेचा | भगवद्गीतेच्या | ६३ | खालून १ |
| परमात्मनिष्ठा | परमात्मनिष्ठा— | ६४ | १२ |
| एतस्य | एतस्यं | ,, | खालून ७ |
| ८ | ८ ( | ६७ | ९ |
| स्वतः | स्वतः ) | ,, | १० |
| आकाश | आकाश (तसा हा आत्मा) | ७२ | २ |
| हें-७ | ७ हें— | ,, | खालून ७ |
| करीत आहे | करीत आहे— | ,, | ,, ५ |
| ब्रह्मरूपेण | ब्रह्मरूपेण | ७३ | ८ |
| बुध्या | बुध्द्या | ,, | खालून ९ |
| बुध्या | बुध्द्या | ७४ | २ |
| हाच ६ | हाच | ,, | ५ |
| बंध | ६ बंध | ,, | ६ |
| सर्वथैव तत्परायण | —सर्वथैव तत्परायण | ,, | १५ |
| राहुतम; | राहुतम | ७५ | खालून ८ |
| अवधारण | आवरण | ७६ | १४ |
| निमज्योन्म | निमज्ज्योन्म— | ,, | खालून ८ |

| | | | |
|---|---|---|---|
| सूय २ | २ सूर्य | ७७ | ,, १० |
| पार्णी | पार्णी ९ | ८१ | ,, २ |
| मुज्जा | मुञ्जा | ८३ | १४ |
| मुज्ज'त् | मुञ्जात् | ,, | १७ |
| मुज्ज | मुञ्ज | ,, | खालून ७ |
| भझण | भक्षण | ८४ | ११ |
| " देहो नास्मा " | देहोनात्मा | ८५ | खालून १ |
| स्वतः । | स्वतः– | ८६ | ९ |
| इत्यादि अवस्था इत्या– | इत्या– | ,, | १२ |
| वेत्ता | वर्त्ता | ,, | खालून ७ |
| ॥ १९२ ॥ | ॥ १६२ ॥ | ८[illegible] | ,, ७ |
| दोहत्मबुद्धि | देहात्मबुद्धि | ९० | १६ |
| प्रकट | १६ प्रकट | ९२ | खालून १[illegible] |
| नाहीं | ६ नाहीं | ९३ | १३ |
| बंधला | बंधाला | ९५ | १४ |
| मन | मनः | ,, | खालून ५ |
| बंधनाला.........इ० | हें वाक्य टीप नसून श्लोक तात्पर्य असल्यामुळें रेघेच्या वर वाचावें. | ९७ | खालून शेवटची |
| नसुन | नसून ते | ९८ | १३ |
| रजंस्तमो | रजस्तमो | ,, | खालून ९ |
| तत्वदर्शिनः | तत्त्वदर्शिनः | ९९ | ६ |
| तत्फालनि | तत्फलानि | १०२ | ४ |
| " मी " १ | १ " मी " | ,, | खालून १ |
| परिच्छेदमुपेह्य | परिच्छेदमुपेत्य | १०४ | ९ |
| मृषात्मन, | मृषात्मनः | ,, | १३ |
| वेगळे १२ | १२ वेगळे | ,, | खालून ० |
| पर ९ | ९ पर | १०५ | ९ |
| सर्वांचा ९ | ९ सर्वांचा | ,, | १० |
| विलक्षणाः | विलक्षणः | १०९ | ९ |

| | | | |
|---|---|---|---|
| बुध्यां | बुध्द्यां | १०९ | १० |
| बुध्यां | बुध्द्यां | ,, | १४ |
| " अन्यतः—" | " अन्यत् " | ,, | खालून ९ |
| " तत " | " ततः " | ,, | खालून २ |
| आत्म्याचा | आत्म्याच्या | ११२ | खालून ६ |
| विज्ञानानें | विद्वानानें | ११५ | ३ |
| पश्याम्यन्न | पश्याम्यत्र | ,, | १० |
| बुध्या | बुध्द्या | ११६ | ८ |
| स्फुरनैकधा | स्फुरन्नेकधा | ११७ | ५ |
| स्वतत्वागमं | स्वतत्त्वागमं | ११९ | खालून ९ |
| ( गगानादि ) | ( गगनादि ) | १२० | १६ |
| आंत ३१ | ३१ आंत | ,, | १७ |
| मृत्यूला हेतु ४२ | ४२ मृत्यूला हेतु अशा | ,, | ८ |
| अनंदस्वरूप | आनंदस्वरूप | १२१ | ८ |
| ( चन्मजरादिरूप ) | ( जन्मजरादिरूप ) | ,, | खालून १० |
| प्रमाण ७ | ७ प्रमाण | १२२ | २ |
| कूटस्थ | ९ कूटस्थ | ,, | ३ |
| तत्वज्ञो | तत्त्वज्ञो | १२६ | ८ |
| ॥ २४१ ॥ | ॥ २४२ ॥ | १२९ | १९ |
| घेतां २ | २ घेतां | ,, | खालून ७ |
| " उपाधिः एक " | " उपाधिः एषः " | १३१ | खालून २ |
| " आथात आदेशः " | " अथातआदेशः " | १३२ | ,, ६ |
| बुध्य.... | बुध्द्य.... | १४० | ३ |
| षड्भिरहित | षडूर्मिरहित | ,, | खालून १२ |
| आनात्म | अनात्म | १४९ | ,, ७ |
| ८ ह्मणून | ३ रजोगुणाचा ४ सत्वगुणानें ( व ) ५ सत्वाचा ६ शुद्धसत्वानें ७ नाश होते | | |
| | ८ ह्मणून | १५१ | ६ |
| जें तें | जें ७ तें | ,, | खालून ३ |

| | | | |
|---|---|---|---|
| ब्रह्म ७ नाहीं | ब्रह्म नाहीं | १९२ | २ |
| कर्तृतार्दीस्त्य वा | कर्तृत्वार्दीस्त्यक्त्वा | १५९ | खालून ५ |
| ब्रह्मरूपाहून | ब्रह्मरूप पाहून | १६९ | ,, ७ |
| र्यत्वतः | र्यत्नतः | १८२ | ,, १२ |
| यत्वतः | यत्नतः | ,, | खालून १२ |
| भ्रमारानें | भ्रमरानें | १९३ | ९ |
| परमात्मस्मरूपीं | परमात्मस्वरूपीं | २०४ | खालून ७ |
| गोळकांत | गोलकांत | ,, | ,, ६ |
| तद्विविवेके | तद्विवेके | २०९ | २ |
| ॥ ३०७ ॥ | ॥ ४०७ ॥ | २१८ | १३ |
| किमिच्छन | किमिच्छन् | २२५ | ३ |
| कचिदनन्त | कश्चिदनन्त | २२९ | ८ |
| शान्तसंसार कलनः । | शान्तसंसार कलनः | २६१ | खालून ६ |
| " जागृद्धर्मवर्जितः " | " जाग्रद्धर्मवर्जितः " | ,, | ,, २ |
| ॥ ९६९ ॥ | ॥ ४६५ ॥ | २४८ | ३ |
| निव- | २ निव- | २४९ | ८ |
| डून २ | डून | ,, | ९ |
| भाह्याभ्यंतरशून्यं | बाह्याभ्यंतरशून्यं | २६१ | ११ |
| * वरील टीप पहा. | ९२ पानावरील टीप पहा. | २८७ | खालून २ |
| वीं[१२] | वीं[१२] * | २९० | ,, ८ |
| * पानावरील | * ९२ पानावरील | ,, | शेवटची १ |
| स्डलीं | स्थलीं | २९२ | १३ |
| करा | करो | २९५ | ९ |
| * पानावरील | * ९२ पानावरील | ३०३ | शेवटची १ |
| पृथ्वीवरी | पृथ्वीवरील | ३०६ | २ |
| विवेछचुडामणि | विवेकचुडामणि | ३०७ | १ |

**टीप**—येण प्रमाणें कांहीं अशुद्धें दुरुस्त केलीं आहेत. काना मात्रा, ऱ्हस्व दीर्घ, अनुस्वार, अंक, रेषा, कंस इत्यादिकांत राहिलेलीं अशुद्धें वाचकांच्या सहज लक्ष्यांत येतील अशी आशा आहे.